पुणें

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ

पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक ४

# शिवचरित्र प्रदीप



द. वि. आपटे

स. म. दिवेकर

---

कागदी प्रत रु. ३॥ ]  शके १८४७  [ कापडी प्रत रु. ४

॥ श्री ॥

# पुरस्कार

शिवचरित्रप्रदीप नामे जो ग्रंथ प्रस्तुत पुरस्कृत करण्याचे श्रेय मंडळास घेतां येत आहे त्याविषयींचे धन्यवाद श्रीशिवचरित्रभक्तांनीं रा. सदाशिव महादेव दिवेकर व रा. दत्तात्रेय विष्णु आपटे या दोघास मुख्यतः दिले पाहिजेत. कारण रा. दिवेकर यांनी आर्थिक भार व रा. आपटे यांनी संपादनभार या कामीं आपापले शिरावर प्रमुखपणें घेऊन हा महत्त्वाचा चर्चाग्रंथ प्रसिद्ध केला आहे; आणि मंडळावरील प्रेमामुळें या प्रसिद्धीकरणाचें यश मंडळाचे पदरांत उदारपणें टाकिलें आहे.

पुरस्कृत ग्रंथमालेची योजना यशस्वी करण्यांत रा. दिवेकर यांनी मनोभावें साहाय्य करून श्रीपर्णालपर्वतग्रहणाख्यान, श्रीशिवभारत आणि प्रस्तुतचा शिवचरित्रप्रदीप असे तीन ग्रंथ त्यांनी एकट्यांनी प्रसिद्ध केले आहेत. यांत रा. दिवेकर यांचें मंडळावरील प्रेम जितकें प्रकट होतें तितकेंच श्रीशिवचरित्रावरीलहि त्यांचे प्रेम व्यक्त होत आहे. श्रीशिवचरित्रविषयक महत्त्वाचे तीन ग्रंथ महाराष्ट्रजनांच्या सेवेस रा. दिवेकर यांस सादर करता यावे हे त्यांचें अपूर्व भाग्य होय. या भाग्याचा वांटा त्यांनी स्वेच्छेने मंडळाचे पदरीं बांधला त्यामुळें मंडळास संतोष व्हावा हे साहजिकच आहे.*

प्रस्तुत ग्रंथप्रसिद्धीला श्रीशिवजन्मतिथिनिर्णयाचा विषय हा निमित्तकारण झाला हें खरें; आणि असे दिसण्यात लहान दिसणारे कारणच पुष्कळ प्रसंगीं महत्कार्यसिद्धीस प्रोत्साहक होते असे इतिहासाचे दृष्टांत बहुत आहेत.

श्रीशिवजन्मतिथिनिर्णय हा राष्ट्रीयदृष्ट्या एक फार महत्त्वाचा विषय आहे आणि त्याचा निर्णयहि जितका निःसंदेहरीत्या ठरेल तितके सर्वांसच इष्ट आहे; किंबहुना तत्प्रीत्यर्थ लागतील ते श्रम आपण कळकळीनें व प्रामाणिकपणें केले पाहिजेत. जेधे शकावलींतील शके १५५१ ची नूतन शिवजन्मतिथि प्रकट होण्यापूर्वी श्रीशिवजन्मतिथि अनिश्चित होती हे लक्षांत ठेवावयास पाहिजे. शक १५४९ हा शक सत्यशोधकांनी उपलब्ध प्रमाणावरून ग्राह्य केला होता. परंतु १५५१ ची सूक्ष्म, गणितसिद्ध अपि कुलपूत अशी तिथि पुढें येतांच मोठाच प्रश्न संशोधकांस पडला. मग पूर्वप्रमाणाची द्वितीय-

---

* टीपः—पुरस्कृत ग्रंथमालेंतील पांचवा ग्रंथ रा. सा. वझेकृत हिंदी शिल्पशास्त्र खंड १ ला हा छापून झाला आहे. खरे जंत्री हा सहावा ग्रंथ या मालेंत गोंवण्याचें ठरलें आहे. सातवा ग्रंथ श्रीभूतेश आख्यान रा. त्र्यं. ह. आवटे छापीत आहेत. आणखी एकदोन ग्रंथ या मालेस लवकरच लाभतील.

चिकित्सा मध्यंतरीं उपलब्ध झालेल्या नूतन साधनांचें साहाय्य घेऊन करण्यास प्रारंभ झाला. या नूतनोपलब्ध साहित्यांत श्रीकवींद्रपरमानंदकृत श्रीशिवभारत हा परमरमणीय व प्रमाणग्राह्य ग्रंथ मिळून त्यांतहि जेव्हां नूतन मितीच दिलेली आढळली तेव्हां अनेक परस्परविसंवादि गणितप्रमादसंकुल असे लंगडेपांगळे आधार सोडून देऊन प्रामाण्यबलिष्ठ अशी नूतन तिथि स्वीकारावी असें पुष्कळांचे मनांत येऊं लागले. तथापि जुनें निरंतरचें सोडून काडी मोडण्यापूर्वी सावकाशीनें विचार करून प्रमाणपरीक्षा कसून व्हावी म्हणजे रुखरुख राहणार नाहीं. नाहींतर 'जुनेंहि नाहीं आणि नवेंहि नाहीं,' दोन्ही संशयित राहिलीं म्हणजे राष्ट्राचा जीव या प्रकरणीं टांगल्यासारखा होईल. यासाठीं सावधानपणें, संयमपणें, व सूक्ष्मपणें अनेकवार परीक्षून, संशोधून, तावूनसुलाखून मगच राष्ट्रास याचा निर्णय मिळावा, हें धोरणच या प्रकरणीं हितावह होय यांत संशय नाहीं. १५५१ पक्ष हा प्रस्तुत पुरस्कार लिहिणाऱ्यास तर सिद्धांततुल्य वाटतो; परंतु निर्णयपत्रावर शेवटची मुद्रा करण्यापूर्वीं प्रमाणदृष्ट्या एकदोन पावलें अधिक पुढें सरकतां आलें तर सिद्धांत अचल होण्याचे दृष्टीनें इष्ट आहे असें त्यास वाटतें. मात्र १५५१ पक्ष अग्राह्य करणारास तितकेंच कांटेतोल वागावयाचें असल्यास, सापेक्षतया अतीव दुर्बल असा १५४९ पक्ष अधिकच अग्राह्य धरावा लागेल आणि संशयात्म्याची कोटि स्वीकारणें न्यायतः प्राप्त होईल. परंतु उत्सवादि कार्यें करणाऱ्यास ही निरंजन दृष्टि व संशयात्मवृत्ति कामीं येत नाहीं. त्यांस येथें एकच मार्ग राहतो आणि तो म्हणजे 'येनेष्टं तेन गम्यताम्' हा होय.

श्रीशिवजन्माचा प्रश्न अनिश्चित आहे असें जें वर सुचविलें आहे त्याचा अभिप्राय असा नव्हे कीं येथें अनुमानावरच सर्व भार आहे. असला तर १५४९ कीं १५५१ एवढाच काय तो वाद आहे. तिसरा शक कल्पिण्याचें कारण नाहीं.

या जन्मतिथीच्या प्रश्नाचा निर्णय मंडळाकडून व्हावा अशाविषयीं पुष्कळ सूचना कानीं आलेल्या आहेत. परंतु मंडळानें तदनुसार या प्रकरणीं अधिकारयुक्त निर्णय करणें विचाराअंतीं सुयुक्तिक ठरणार नाहीं. कारण मंडळाचे दृष्टीनें हा प्रश्न संशोधनाचा आहे; व्यावहारिक नाहीं. इतिहासक्षेत्रांतील मतांचा किंवा निश्चितींचा ठामपणा केव्हांहि तात्कालिकच समजावा लागतो. अधिक प्रमाणें पुढें आलीं आणि तीं बलिष्ठ असलीं तर तात्काल अंगीकृत केलेले सिद्धांत फिरवावे लागतात. तुतानखामेनचें थडगें उकरलें किंवा सिंधांत मर्हेजदडो येथील उत्खातनगर पाहिलें म्हणजे प्राचीन इतिहासाची जुनी मांडणी तेवढ्यापुरती विसकटून नवी मांडणी करणें प्राप्त होतें. प्राचीन इतिहास अधिक तमसावृत असल्यानें त्या क्षेत्रांत हे प्रसंग बहुतच येतात. परंतु जों जों आपण प्रस्तुत

कालाकडे जवळ जवळ येऊं लागूं तों तों इतिहासाची मांडणी अधिकाधिक पक्की असण्याचा संभव अधिक असतो आणि त्यामुळें सापेक्षतया फिरवा-फिरवीचे प्रसंग तितके आणि तसे येत नाहींत. तितके आणि तसे म्हणण्याचें कारण उघड आहे; तें असें कीं, अर्वाचीन काळांतील व्यक्तिप्रसंगाचें आपलें ज्ञान दिवसेंदिवस अधिक सूक्ष्म, विस्तृत, आणि निश्चित होत चाललें आहे. प्रस्तुतच पाहिलें तर शिवकुल व शिवजन्म हीं दोन ऐतिह्यें निश्चित आहेत. शिवजन्मशकाविषयीं द्वैत आहे. आणि शिवजन्मतिथि वादचक्रांत सांपडली असून शिवजन्मभूमि निश्चित असली तरी शिवजन्मस्थान डळमळीत आहे. असले अनिश्चित प्रश्न प्रमाणांची अपेक्षा करीत असतात आणि प्रमाणांची भूक थांबून ते पूर्ण निश्चित आणि चालतेबोलते होण्याला कालावधिहि बराच लागतो.

रोग्याच्या रोगासंबंधीं ज्याप्रमाणें चार तज्ज्ञ प्रसंगीं चार प्रकारचीं मतें देतात तसाच प्रकार येथें होतो. वास्तव मंडळानें साधारण सभा भरवून बहु-मतानें असले शास्त्रीय प्रश्न निर्णीत न करतां आपलें तज्ज्ञमंडळ नेमून त्यांचा एकमती किंवा बहुमती होईल तो व तसा निर्णय प्रकट करावा आणि त्यावरून त्या निर्णयाची अपेक्षा असणारांनीं आपलें कार्य यथामति उरकावें. मंडळाला नूतनप्रमाणांचा आगमनमार्ग सतत उघडा ठेवला पाहिजे. चर्चा कोणी करील त्यास सदैव मोकळीक दिली पाहिजे. त्या वाटा मंडळानें कधींच बंद करतां कामा नये. ज्ञानाचीं व सत्यनिर्णयाचीं द्वारें मंडळासारख्या शोधसंस्थेनें निरंतर उघडींच ठेविलीं पाहिजेत.

याच शास्त्रपरंपरापूत मार्गास अनुसरून पूर्वी चतुर्थसंमेलनवृत्तांतील कांहीं निबंधासंबंधानें वादचक्र उद्भवलें असतां अन्यमतीयांस मंडळाचीं द्वारें पूर्वमतग्राह्यांप्रमाणेंच मोकळीं असल्याचें कळविलें आणि प्रस्तुतहि त्याच शिष्ट मार्गाचा अवलंब करून १५५१ विरोधीपक्ष जर आपलें म्हणणें सप्रमाण पुढें मांडील व रा. दिवेकरांप्रमाणें कोणी त्या चर्चेचें श्रेय मंडळास उदारपणें देऊं करील तर मंडळ अत्यंत आनंदानें त्याहि ग्रंथाचा असाच पुरस्कार करील यांत अगदीं संशय नाहीं.

हा शिवचरित्रप्रदीप ग्रंथ स्फुट स्वरूपाचा चर्चा-ग्रंथ आहे. जेव्हां पांच-सहा संशोधक वर्षसहा महिने सतत खपले तेव्हां हा ग्रंथ या स्वरूपाला आला. शिवकालीन इतिहास-विरचनेला उपयोगी असें जें नूतन साहित्य यांत प्रकट झालें आहे त्यांत जेधेकरीना हा सर्वश्रेष्ठ होय. मंडळांतील उत्साही संशोधक रा. सखाराम गणेश जोशी मालवणकर यांनीं जेधे देशमुख यांजकडून हा करीना मिळवून मंडळास सादर केला. तो रा. दिवेकर यांचे विनंतीवरून मंड-ळाकडून या ग्रंथांत प्रसिद्धीस दिला. याचे प्रसिद्धीकरणामुळें कांहीं शिवकालीन प्रसंगाविषयीं आपल्या ज्ञानांत विशेष अपूर्व भर पडत आहे. त्याचप्रमाणें चतुर

साबाजीचा सेंडकरपाटीलांचा महजर मंडळांतील दुसरे उत्साही संशोधक रा. कृष्णाजी बासुदेव पुरदरे—चांबळी यांनी आणिला. त्याचे मूळ परवांच हातीं आलें आणि तें पाहतां सेंडकर पाटील मंडळीस एवढें जीर्ण पत्र जिवापलीकडे जपून ठेवण्याबद्दल धन्यवाद दिले.

जेधे मंडळीचे तर महाराष्ट्रावर फारच उपकार झाले आणि आम्हांस भरंवसा आहे कीं याहूनहि अधिक भार ते आम्हांवर घालतील. त्यांच्या उदाहरणामुळें जागृत होऊन सिळंबकर, पासलकर, बांदल प्रभृति बारा मावळचे देशमूख, व शिवापूरकर, वाल्हेकर, पुणेकर प्रभृति देशपांडे मंडळी जागृत होऊन श्रीशिवछत्रपतींचा इतिहास स्वराष्ट्रास, त्याचें देणे मानून आपण होऊन पुढे येऊन अर्पण करतील तर श्री छत्रपतींच्या रम्य, स्फुरणदायक, पवित्र व उज्वल चरित्रकथेची महाराष्ट्रास लागलेली पिपासा सत्वर तृप्त करतां येईल. शके १८५१ वर्षी नूतन तिथीप्रमाणें श्रीशिवरायांस ३०० वर्षे होतील. त्या वेळेपावेतों जर चांगल्याच उठावाचा प्रयत्न झाला तर बरेंच कार्य होईल. अद्यापि कोंकणांत शिर्के, मोहिते, महाडिक, मोरे, सुर्वे प्रभृति शिवकालीन व शिवपूर्वकालीन इतिहासप्रसिद्ध घराणीं आहेत. त्यांच्या वंशजांत जागृति व्हावयास पाहिजे. शिवचरित्रसंशोधनाचे क्षेत्र दिवसेंदिवस व्यापक होत आहे. शिवचरित्रविषयक मूळ लेख प्रसिद्ध करण्याचे श्रेय राजवाडे यांस आहे. या पत्रांची हेटाळणी तेलातुपाचीं पत्रें म्हणून चांगल्या चांगल्या विद्वानांनींहि केली आणि अद्यापिहि हा भ्रम लोकांत आहे. या मंडळीच्या हे लक्षात येत नाहीं कीं शिवकालीन राजकीय पत्रव्यवहार प्रस्तुत तर लुप्तप्राय दिसतो. तथापि तो नव्हताच असें एक अनुमान कोणी करतात ते मात्र जेधे संग्रहावरून भ्रामक व उपेक्षणीय ठरत आहे. तीं साधनें निःसंशय होतीं आणि कांहीं आहेतही. परंतु तीं तळच्या थरांत सांपडतील. तेथें उतावीळ कामाची नाही. यामुळें कुळकटें, महजर, करीने, वंशावळया, इनामदेणग्या वगैरे फुटकळ पत्रें मिळताहेत तींच आधीं घेऊन त्यांचीच सूक्ष्म चिकित्सा करकरूनच इतिहासविरचनेचें महत्कर्म तोंवर होईल तसें सिद्धीला न्यावें लागणार ! मग होईल तो उपहास आणि सोसतील ते कष्ट यासाठीं केले पाहिजेत. धन्यवादाची आशाच ठेवूं नये. ते आज मिळोत वा उद्यां मिळोत वा न मिळोत ! राजवाडे यांनी छापिलेल्या १५।१६।१७।१८ २०।२१ या खंडांची व इतरत्र प्रसिद्ध झालेल्या शिवकालीन इतिहाससाधनांची विचिकित्सा अद्यापिहि कसून झाली नाहीं. प्रो. सरकारांना त्याचें महत्त्व कळूनहि त्यांनीं तो उपक्रम टाळलाच आहे. कारण त्यांस मोडी वाचतां येत नसल्यामुळें त्यांची स्थिति परावलंबी होऊन त्यांची प्रमाणचिकित्सा अपूर्ण व एकदेशीच राहिली आहे हें स्पष्ट आहे. फारसी साधनचिकित्सा त्यांनी सूक्ष्मपणें केली आहे तशी महाराष्ट्रीय संशोधकांनी केली नाहीं. तथापि

तो उपक्रम मूळ फारसी साधनें प्रसिद्ध करून भा. इ. सं. मंडळानें केला आहे हें विश्रुत आहे. मराठी व फारसी या दोन साधनक्षेत्रांत आतां पूर्तकाली साहित्यसंग्रहाची भर पडण्याचा रंग दिसत आहे. लातिन व इतर भाषेंतहि जेझूट पाद्री मंडळानें केलेलें लिखाण तत्कालीन आहे, त्याचे थोडकेंसे स्वरूप फादर हिरास यांचा निबंध मंडळ प्रसिद्ध करीत आहे त्यावरून दिसेल. साक्षात् पूर्तकाली साधनसंग्रह पिसुर्लेकर, सेनप्रभृति संशोधित आहेत आणि डच, फ्रेंच, इंग्लिश, स्पानिश, जर्मन, इतालियन भाषांतूनहि कांहीं शिवचरित्रोपयोगी साधनें सांपडतील. कलकत्ता विद्यापीठाकडून डॉ. सेन सांप्रत युरोपांत फिरतीवर याचसाठीं गेले आहेत. शिवेतिहाससाधनक्षेत्र असें सतत वृद्धिंगत होत आहे. यांत अद्यापि एक ओघ येऊन मिळावयास पाहिजे आहे, तो द्राविडसाहित्यसंग्रह होय. आणि शिवेतिहासविरचनेच्या कामीं द्राविडी साहित्याचा उपयोग सढकून व्हावा असा तर्क आहे. बेंगळूर हें शहाजी महाराजांचें केंद्र झाल्यापासून पुढें चंदीचंदावराकडे आम्हां मराठ्यांची स्थापना झाली. यास्तव थेट विजापूर, गोवळकोंडा, प्रस्तुतचा निजामी मराठवाडा व आंध्रभूमि येथपासून ते खालीं श्रीरंगपट्टणाच्या लगत्याच्या प्रदेशापावेतों शोध होऊन तीं तामीळ आणि तेलगू साधनें कसून शोधून अभ्यासिलीं गेलीं पाहिजेत. काशीच्या जेधेशकावलीला तंजावरच्या बृहदीश्वरकार वा शिवभारत यांचा जो मेळ बसला त्यावरून काय संभव निघतो ? हे उपक्रम हातीं घेण्यासाठीं नूतन महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना होणें अत्यंत अवश्य आहे.

असो, हा व्यापक विषय आहे आणि गेल्या वर्षसहस्रांत भारतीय इतिहासांत भरतखंडभर पसरल्या अशा ज्या दोनच सत्ता त्यांतील मराठी सत्ता ही ज्या अर्थी एक आहे आणि ज्या अर्थी तिचा स्पर्श रामेश्वरापासून पेशावरापर्यंत आणि ढाक्क्यापासून गोव्यापर्यंत होत राहिल्याचें स्पष्ट आहे त्याअर्थी त्या पराक्रमी सत्तेच्या इतिहासरचनेसाठींहि व्यापकच प्रयत्न आवश्यक व्हावे हें क्रमप्राप्तच आहे. यास्तव तसे प्रयत्न आपण आपले पोटापाण्याचे, सामाजिक संघटनेचे, व राजकीय मुक्तीचे अनेकविध प्रश्न सोडविण्यास झटत असतांनाच आपणांस केले पाहिजेत. यास्तव श्री शिवचरित्रप्रदीप ग्रंथाचा स्वीकार ही दूरदृष्टि ठेवून परमप्रेमानें केला जाईल असा भरंवसा वाटतो.

मार्गशीर्ष वद्य ३ शके १८४७ पुणें. — दत्तो वामन पोतदार, चिटणीस भा. इ. सं. मंडळ.

# विषयानुक्रमणिका

# प्रस्तावना.

प्रस्तुत ग्रंथांत शिवचरित्रावर प्रकाश पाडणारीं लहान मोठीं मिळून ४२ प्रकरणें असून त्यापैकीं १५ निबंधात्मक, ७ अवतरणात्मक आणि २० साधनात्मक आहेत. निबंध लिहिण्याच्या कामीं बारा विद्वानांनीं परिश्रम केले असून त्यांतील विषयांची मांडणी सुबोध असल्यामुळें त्यांचा परिचय या प्रस्तावनेंत करून देण्याची विशेष आवश्यकता नाहीं. पण प्रत्येक निबंधांतील मुद्दा आजपर्यंत इतरत्र कोठेंहि न मांडला गेलेला असा आहे एवढें सांगितलें म्हणजे शिवचरित्राविषयीं अद्याप आपणांस किती संशोधन केलें पाहिजे याची कल्पना येण्याजोगी आहे. शिवजन्मतिथि, बखरींचें परीक्षण, श्री शिवछत्रपतींची राजमुद्रा, श्रीसमर्थ व महाबळेश्वर, शिवाजीमहाराजांची स्वराज्यकल्पना, फलज्योतिष व गणितज्योतिष यांच्यादृष्टीनें जेधेमितीचा विचार, भूषणकवीचा काल, शकावल्यांची उपपत्ति व पोर्तुगीजांचा शिवाजीमहाराजांशीं संबंध हे या ग्रंथांतील निबंधांचे विषय शिवशाहीसंबंधीं गेल्या दहा वीस वर्षांत झालेल्या नवीन माहितीचें व चिकित्सक दृष्टीचें निदर्शक आहेत. बखरकारांनीं प्रचलित केलेल्या शिवचरित्रविषयक समजुती अनेक ठिकाणीं चुकीच्या ठरून त्यांच्या जागीं विश्वसनीय आधारांवर ठरविलेली माहिती नमूद करणें भाग आहे असें या निबंधांवरून वाचकांच्या निदर्शनास येईल असा भरंवसा आहे. कित्येक विषयांचें येथें नुसतें दिग्दर्शन मात्र झालें आहे व त्यांचा मनाजोगा छडा लावण्यास अनेक विद्वानांच्या सहकार्याची अवश्यकता दाखवून दिली आहे. उदाहरणार्थ रा. शंकरराव जोशी यांनीं बखरींचें कालनिर्देशांच्याच दृष्टीनें तेवढें परीक्षण केलें आहे; पण हें परीक्षण अनेक दृष्टीने होणें अवश्यक आहे; त्याचप्रमाणें पोर्तुगीजांचा मराठ्यांशीं आलेला संबंध व चौथाईची व्युत्पत्ति* या ग्रंथांत मराठींतून व इंग्रजींतून मांडण्यांत आली आहे; पण तिचा सांगोपांग विचार करण्यास उपयोगी पडणारी सामुग्री गोव्यापासून दमणपर्यंतच्या कोकणपट्टींत बारकाईचा शोध केल्यास कालांतरानें मोठ्या प्रमाणांत उपलब्ध होण्याजोगी आहे. शिवकालीन शकावल्या तर मावळांत व पुरंदरपासून पुणें ते नाशिकपर्यंतच्या टापूत अनेक ठिकाणीं सांपडतील अशी खात्री वाटते. सारांश शिवचरित्रविषयक जुन्या सामुग्रीचें चिकित्सक दृष्ट्या परीक्षण व नवीन सामुग्रीचा शोध करण्याची दिशा पूर्वीपेक्षां स्पष्टतर होण्यास या ग्रंथांतील निबंध उपयोगी पडतील.

---

* चौथ शब्दाची व्युत्पत्ती या निबंधांत 'चोथ' या विशेष नामारूवन सुचविली आहे तें विशेषनाम मराठी लेखांतून आढळतें खं. २० पृ. ३९९ पहा.

**साधनात्मक** प्रकरणांत शकावल्या, करीना, पत्रें, राजव्यवहारकोश, शिवशाहींतील ग्रंथांचा परिचय वगैरेंचा समावेश होतो. शकावल्यांपैकीं शिवजन्मतिथि ठरविण्यास उपयोगी पडणारी '**जेधे शकावली**' पुढे आणण्याचें श्रेय कै. लोकमान्याचें आहे. ही शकावली 'चतुर्थ संमेलन वृत्तांत' पूर्वी प्रसिद्ध झाली होती. तथापि तिच्यांत क्वचित नकलेच्या चुका झाल्या असतील अशी शंका प्रसिद्ध झाली.यासाठीं मूळ हस्तलिखित प्रत श्रीमंत रा.सर्जेराव जेधे यांजकडून रा. स. ग. जोशी यांचे मार्फत आणून कसोसीनें तपासून या ग्रंथांत ही शकावली छापली आहे. ती इतिहासाभ्यासकांना संदर्भास चांगली उपयोगी पडेल. या शकावल्या शालिवाहन शकांत व मराठी महिन्यांत लिहिल्या असल्या, तरी शिवकालीन अस्सल कागदांत अनेक जागी सूरसन वापरलेला असे ही गोष्ट शकावलीच्या सूक्ष्म अध्ययनानें निश्चित होते; व त्यावरून शकावलींत आढळणाऱ्या बारीकसारीक चुका कोठें आहेत व कोठें नाहींत; असतील तर त्या दुरुस्त करण्याचे मार्ग कोणतें आणि संदिग्धता राहील त्या ठिकाणीं देखील चुकीची कालमर्यादा कोणत्या स्वरूपाची आहे हें निश्चित करण्यास उत्तम साधन मिळतें. उदाहरणार्थ पृ० २७ वरील राज्याभिषेक प्रसंगाची नोंद पहा. तिच्यांत तिथि नक्षत्रादिक तपशील दिल्यानतर सूरसन खमस सबैन १० रबिलावल ही मुसलमानी तारीख व वर्ष दिलें आहे; त्याचप्रमाणें शिवाजीमहाजांच्या मुंजीची मिती देतांना ज्येष्ठ शु० ४च्या पुढें 'अवलसालीं' हे शब्द जोडले आहेत. सूरसनांत ज्येष्ठांतलि (क्वचित् वैशाखांतीलहि) कांहीं मित्या दरसाल दोन वेळां येतात; यामुळें त्यांच्या निर्देशांतील संदिग्धता घालविण्यास 'अवलसाल' किंवा 'अखेरसाल' हे शब्द स्पष्टतेसाठीं योजावे लागतात. केवळ शकांत लिहिलेल्या शकावलींत अशी संदिग्धता उत्पन्नच होत नाहीं. सारांश देशी चळवळीनें प्रेरित झालेल्या लोकांच्या लिहिण्यांत देखील ज्याप्रमाणें इंग्रजी शब्द व इंग्रजी तारखा न कळत डोकावतात व त्यावरून आजकालचे इंग्रजी वातावरण शुद्ध 'देशी' वाङ्मयांतूनहि दृग्गोचर होते; त्याप्रमाणें शके १५९६मध्यें राज्याभिषेकाच्या वेळीं सर्व मांडणी संस्कृत शब्दांतून व आर्यकालगणनेनुसार व्हावी अशी जी आर्यसंस्कृतीची महाराष्ट्रांतील कांहीं लोकांच्या अंतःकरणांत भावना बळावली तिचेंच एक अंग या शकावल्याच्या रूपानें आज आपणापुढें आलेलें आहे. त्याचें परीक्षण करतांना यावनी वातावरणांतील सामुग्रीवरून कालनिर्देशाच्या बाबतींत आर्यसंस्कृतीकडे धांवण्याचा हा पहिला उमाळा होता हें लक्षांत घेऊन या पहिल्या प्रयत्नांत त्यांना कोणत्या अडचणींशीं झगडावें लागलें याची कल्पना दृष्टी आड होऊं देतां कामा नये. या शिवकालीन प्रयत्नांचे अंतरंग समजून घेण्यास आपणास पुष्कळ खटपट पडणार आहे; परंतु ती गुंतागुंत सोडविली पाहिजे. ही गुंतागुंत सोडवितांना शका-

बल्यांतील हस्तदोष व वास्तविक चुका यांची तपासणी करण्यास काय कसोटी योजावी व प्रत्यंतर पुराव्यासाठीं कोठें थांबावें याचाहि तलास लावला पाहिजे. उदाहरणार्थ (पृ० ३७ वर) सीत तिसैन अलफ या सुरसनास शके १६१६ हा आंकडा आहे. पण गणिताच्या दृष्टीनें यांत एक आंकडा चूक आहे असें निश्चयानें ह्मणतां येईल; आणि या खालच्या नोंदींत वार दिला असता तर शकाचा आंकडा चूक कीं सुरसनाचा चूक हें सहज ठरवितां आलें असतें. पण वार दिलेला नसल्यामुळें येथें प्रत्यंतर पुराव्यानें कोणतें साल निश्चित होतें तें पाहण्यासाठीं थांबणें प्राप्त आहे.

त्याचप्रमाणें 'सहा कलमी शकावलींत' (पृ. ७०) शके १५५१ मध्यें मुरार जगदेव यास दिवाणगिरी मिळाल्याचें सांगतांना इंदलशाही सुलतानाचें नाव 'शिकंदर' असें दिलें आहे तें चूक असून 'महमदशाहा' असें नाव पाहिजे हें विजापूरच्या इतिहासावरून ठरतें. त्यांतच शके १५५३ मध्यें मुरार जगदेव व निजामशाही मलिकंबर यांचें ह्मसवड नजीकचें युद्ध दिलें आहे तें सकृद्दर्शनी अशक्य कोटींतलें भासतें; पण अस्सल पत्रांवरून, इतिहासप्रसिद्ध मलिकंबराच्या मागून, निजामशाही दरबारांत वागणारा आणखी एक 'मलिकंबर' होता असें निश्चित होतें (खंड २० पृ. ५) व शकावलींतील हकीकत शक्य कोटींत येते.

आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या शकावल्यांत शिवापूरकर देशपांडे वहींतली राज्याभिषेक शकावली (पृ. ५३) ही सर्वांत प्रथम लिहिली गेली असें अंतर्गत पुराव्यावरून म्हणतां येते. १८ व्या खंडांत राजवाडे यांनी छापलेली त्रुटित शकावली व ही बहुतेक एकसारखी आहे. राजवाड्यांची म्हणजे होनप देशपांडे यांच्या संग्रहांतली प्रत जुनी असावी असें भाषेवरून ठरतें; आणि सवाशें वर्षांनंतर नकललेल्या शिवापूरकर वहींतील येथें दिलेल्या प्रतीवरून नकलकार कशा प्रकारच्या चुका करतात तें ठरवितां येते.

यानंतरची शिवापूर दप्तरांतली यादी म्हणजे शिवनिधन शकावली (पृ. ५०). शकावली लिहिण्याचा स्वतंत्र असा हा दुसरा प्रयत्न राज्याभिषेक किंवा जेधे शकावली यांहून अगदीं निराळ्या पद्धतीचा आहे व त्यांत पुष्कळसा तपशील निराळा आहे हें या शकवल्या ताडून पाहणाऱ्यास सहज कळण्याजोगें आहे. हा निराळा तपशील स्पष्टपणें ध्यानांत येण्यासाठीं जाड्या ठशाची योजना ठिकठिकाणीं केली आहे. या शकावलींत वार कोठेंहि दिलेला नसला तरी 'सिंहगड पहावयास गेले' 'कल्याणकडे गड पहावयास गेले' 'सिवापटणास आले' 'प्रतापगडी देवावर वीज पडली' 'संभाजी राजे यास कारभार सांगितला' वगैरे बारकाईच्या गोष्टी इतक्या दिल्या आहेत कीं ती लिहिणारापुढें अस्सल शिवकालीन दाखले असले पाहिजेत अशी आपली खात्री होते. मात्र आपणास उपलब्ध झालेली या शकावलीची प्रत अवल इंग्रजींत म्हणजे शके १७४५ मध्यें केलेली असून

तिथ्यांत नकलकाराचे हस्तदोष शिरले आहेत. उदाहरणार्थ अफझलखान मारल्याची मिती या शकावलींत आश्वीन शु. ७ दिली आहे. पण त्या पैकीं 'अश्वीन' ज्या जागीं 'मार्गशीर्ष' पाहिजे असें जेधे व राज्याभिषेक शकावलींतील तिथीवारांच्या मेळावरून म्हणतां येते. उलटपक्षीं उमरखिंडीचे युद्ध जेधे शकावलींत शके १५८२ माघ शु. १४ मंगळवारीं दिलें आहे. (पृ. २१) पण चतुर्दशीचा, मंगळवाराशीं, मेळ बसत नाहीं. शिवनिघन शकावलींत या युद्धाची तिथि माघ शु॥ ४ ही दिली असून (पृ. ५१); राज्याभिषेक शकावलींत पौष मासी हें युद्ध घडल्याचें सांगून 'रुजु' माघ शु. १४ मंगळवार' असा शेवटीं शेरा आहे. त्यांत 'रुजु' याचा अर्थ नीटसा लागत नाहीं. पण बहुधा 'माघ शु. १४ मंगळवार' असें लिहिलेलें आढळलें तें चूक असून त्या ठिकाणीं 'पौष' पाहिजे असें म्हणण्याचा लेखकाचा आशय दिसतो.

तथापि या शब्दाची समाधानकारक फोड होण्यास आणखी कांहीं शकावल्या उपलब्ध झाल्या पाहिजेत. या सर्व शकावल्यांच्या तुलनात्मक अभ्यासापासून निष्पन्न होणारी माहिती व उत्पन्न होणारी शंकास्थानें स्वतंत्रपणें मांडण्याचें काम रा. वासुदेवराव बेंद्रे करीत आहेत; तेव्हां या ठिकाणीं त्याचा अधिक उहापोह करीत नाहीं. मात्र 'गदाधर प्रल्हाद शकावली' अथवा संपूर्ण शिवकालीन शकावली इच्या अप्रकाशित भागासंबंधानें चार शब्द लिहिले पाहिजेत. कारण जेध शकावकीनंतरचा म्हणजे १६१९ शकापासूनचा या शकावलींतला भाग या ग्रंथांत छापला आहे;पण या खेरीज शके १५९९पासून १६१८पर्यंतचा शकावलीतला बराच भाग शाबूत असून तो ढोकळ मानानें जेधे शकावलींत आला असल्यामुळें पुनः दिला नाहीं. पण ही व जेधे शकावली यांच्या हस्तलिखित प्रती ताडून पाहणें महत्वाचें आहे. या तुलनेनें दिसून येणारा बारीक बारीक फरक दिल्यास फार विस्तार होईल सबब तो प्रयत्न न करतां कांहीं महत्वाच्या नोंदी येथें नमूद करून ठेवतों:—

शके १६०० भाद्रपद वदि १४ बुधवारीं रात्रऊ २०।४४ शृंगारपुरी भवानीबाई लेक संभाजी राजे यासी जाली.

(शके १६०३ मधली २ व ४ कलमें (पृ. ३१) प्रथम १६०२ शकांत लिहिलीं होती; नंतर तीं खोडून पुनः १६०३ मध्यें नोंदली आहेत)

(शके १६०७ ते १६०८ पर्यंतची कलमें यांत मुळींच नाहींत.)

शके १६०९ भाद्रपद शुध १२ अवरंजबे भेद करून पीलगोडे* घेतले रुजु भागानगर घेतले कुतुबशाह जिवंतच दस्त केला.

---

* या ठिकाणीं 'पलिगोंडे घेतले' असें कांहीं ठिकाणीं आहे त्या ऐवजी 'भागानगर घेतले 'असें पाहिजे असा (किंवा उलट) अर्थ 'रुजु' या शब्दानें सुचविलेला दिसतो.

याखेरीज १४ व्या व १५ व्या प्रकरणांत दिलेल्या पत्रांचा समावेश प्रस्तुत ग्रंथांतील साधनात्मक भागांत करावा लागेल. १४ व्या प्रकरणांतील पहिलें पत्र अफझलखानानें मरणापूर्वीं दोन सवादोन महिने आधीं लिहिलें असून त्यांत 'परगणे तेरदळच्या विलायतीस सिवाजी तसवीस देतो' असें म्हटलें आहे. यावरून अफझलप्रसंगापूर्वीं महाराजाची मुलुखगिरी कृष्णेच्या दक्षिणेस कर्नाटकांत पोंचली होती असे दिसतें. चतुर्थ संमेलन वृत्तांत शके १५८१ मध्यें महाराज कर्नाटकच्या स्वारीवर गेल्याचा उल्लेख आहे तोच हा असावा. लेखांक २ चें फाजलखानाचें पत्र शके १५८२ च्या माघांतलें असून त्यांत सालगुदस्त म्हणजे शके १५८१ मध्ये मराठ्याची स्वारी रायबाग अडगल पावेतों झाल्याची व जाधवरावाशीं तेरदळचे कृष्णगौडा देसाई यानें लढाई केल्याची हकीकत आहे. या नंतर ले. ३ मध्यें शिवाजी राजे यांचे सुबेदार गंगाजी महादेऊ यानीं चार पांचशे घोडेस्वारानिशी शके १६००च्या सुमारास नंदेश्वर परगण्यावर हल्ला केल्याचा उल्लेख आहे.

पंधराव्या प्रकरणातील (ले. १८३) पत्रांवरून पंढरपूरची दिंडी व पालखी शके १५६०च्या पूर्वीपासून ठिकठिकाणीं चालू होती असें ठरतें. पंढरपुरास ज्ञानोबा व तुकाराम याची सामुदाइक पालखी नेण्याचा परिपाठ दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं हैबतरावानें सुरू केला अशी लोकांची परंपरागत समजूत आहे. आतां शके १५६० मधील या विषयींची अस्सल पत्रें सापड-ल्यामुळें पालखीचा सांप्रदाय पूर्वापार इतर गांवीं होता हें मान्य केलें पाहिजे. याखेरीज या पत्रसंग्रहांत मुरारजगदेव, यानतराव, नारो रुद्र हवालेदार, खंडोजी राजे घोरपडे वगैरेंचीं पत्रें असुन त्यावरून वाळव्यावरील अदिलशाही अंमलदारांची बदली शके १५४५–१५८७ पर्यंत किती वेळां झाली याचा तलास लावतां येण्या-जोगा आहे. परंतु यापेक्षा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे मुरारजगदेवाच्या पदवीसंबंधीचा आहे. मुरारजगदेवास दानपत्रात महाराज राजाधिराज व सार्वभौम-प्रतिनिधि हे किताब दिलेले (सनदापत्रे पृ. १९) इतिहासशाच्या वाचनांत होते. परंतु ते भिक्षुक ब्राह्मणानीं दात्यास लावलेले असून अतिशयोक्तीचे, औपचारिक किंवा तोंडपुजेपणाचे असावे असा संशय येत असे. पण आतां "महाराज राजाधिराज श्री मुरारी पंडित साहेब" असा उल्लेख सरकारी शिक्यानिशीं निघालेल्या हुकमांत असल्यामुळें मुरारपंताच्या सर्वा-धिकारीपणाचें दानपत्रांतील वर्णन यथार्थ असलें पाहिजे असें ठरतें.

यानंतर १६ व्या प्रकरणांतील उतारा म्हणजे सवाई माधवरावांच्या कार-कीर्दीत सुरु झालेल्या इतिहाससंशोधनाचा मासला आहे. पुणें येथील होनप देशपांडे घराण्यातल्या पुरुषाने हें टिपण तयार केलेलें असल्यामुळें सवाई

माधवरावांच्या वेळीं शिवकालीन कागदांचा उपयोग करून लुप्तप्राय झालेल
माहिती जुळविण्याच्या कामीं महाराष्ट्रांतलें संशोधन किती प्रथमावस्थेंत होतें त
दिसून येण्याजोगें आहे. अठराव्या खंडांतील शिवकालीन अस्सल
पत्रें व शकावली याच होनप देशपाड्यांच्या संग्रहांतली असून
त्यावरून शिवकालीन माहितींत संशोधकाना अलीकडे कितीतरी
विश्वसनीय भर टाकतां आली आहे. पण शके १७१४ ( इ. स. १७९२ )
मधील याच दप्तराच्या मालकाला राज्याभिषेकाचा शक १५९५ वाटल
( पृ० ११० पहा ) आणि 'राजाराम व संभाजीराजे हे सख्खे बंधु कीं सावत्र
बंधु' हा प्रश्न 'कलमाचा शोध होणें' या सदरांत घालावा लागला ! तथापि
संशोधनाचा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें त्याचें महत्व मोठें आहे. बहुतेक
बखरींचा हाच रचनाकाल आहे व चिटणिसांच्या बखरींची मूळ टिपणें सांपडलीं त
त्यावरून तत्कालीन इतिहास संशोधनाची बाल्यावस्थाच स्पष्ट होईल असें दिसतें
सभासदी बखर राजारामाच्या वेळीं लिहिली व चित्रगुप्तानें सभासदी बखरीच
अनुवाद त्यानंतर साठ वर्षांनें केला. पण शिवचरित्रविषयक या दोनहि बखरींतू
कालनिर्देश बहुतेक नाहींतच असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पण सवाई माध
रावांच्या कारकीर्दीपासून पुढें ज्या शिवचरित्रविषयक बखरी लिहिण्यांत
आल्या त्यांत कांहीं तरी प्रसंगांच्या मित्या देण्याचा प्रयत्न केला आहे ही विशेष
गोष्ट आहे. हे कालनिर्देश करतांना त्यांनीं काय आंकडेमोडी केली व त्यांन
परंपरेनें माहिती कशा प्रकारची मिळाली होती याचा तलास लावणें अवश्य
आहे. पैकीं त्यांना उपलब्ध असलेली माहिती किती स्थूल स्वरूपाची होती हें
सोळाव्या प्रकरणांतील टिपणावरून दिसून येईल. या खेरीज त्यांनीं शक
निश्चित करण्याची जी एक पद्धति अंगिकारली होती तिचा नमुना अत्रे वहींत
पाहण्यास मिळण्याजोगा आहे. तो सबंध उतारा देण्यानें विस्तार होण्याजोगा
असल्यामुळें त्याचें सामान्य स्वरूप येथें सांगून ठेवतों. या टिपण कर्त्यानें शके १५०
पासून आपल्या कालापर्यंतचे ठोकळ दोन विभाग पाडले: पहिला राज्याभिषेका
पूर्वीचा आणि दुसरा राज्याभिषेकानंतरचा. या वर्षांचा तपशील प्रथम दिल
आहे तो असाः—

| प्रतापी राज्य मेलविले. | राज्याभिषेक होऊन राज्य केलें |
|---|---|
| २५ मालोजी विठोजी भोसले. | ७ सिवाजी महाराज. |
| १५ शहाजी भोसले राजे. | १ राजाराम राजे. |
| ८ शहाजी भोसले पातशाही वजीर जाले. | ७ संभाजी राजे. |
| ६ शाहाजी भोसले बारा हजारी मनसब सरलस्कर जाले विजापुरी. | ११ पुनः राजाराम. |
| | ९ राजारामाचे पुत्र सिवाजी राजे |

| | |
|---|---|
| १२ शहाजीस पुणें सातारा वगैरे जागीर. | ४१ शाहुराजे. |
| २९ दादाजीच्या मृत्यूनंतर शिवाजी राजे यार्णी राज्य संपादलें | २३ रामराजे त ताराऊ. |
| | २३ शाहुराजे दत्तक सातारा आहेत. |
| ९५ | १२२ |
| | २१७ |

यानंतर मालोजी व शहाजी यांच्या कारकीर्दींतले मिळून १२ शक दिले असून पुढें शिवाजी महाराजांच्या २९ वर्षांचा तपशील दिला आहे. त्यांत धोरण असें दिसतें कीं दर वर्षास एक तरी गोष्ट नमूद करावयाची. ही हकीकत देण्यापूर्वी '१५६६पर्यंत दादाजी कोंडदेव व शिवाजी पुण्यांत आहेत' असें मागल्या कलमांत सांगितलें असून दादाजीच्या मृत्यूनंतर १५६७ पासून महाराज खजीना आटोपून कारभार करूं लागलें असें म्हटलें आहे. त्यापुढें १५६८पासूनच्या तपशीलाचा सारांश असा आहे.

१५६८ पुरंदर राजगड व तोरणा वगैरे किल्ले घेतले.
१५६९ चाकण घेतला. मोरोपंतास पेशवाई. गोकर्णापर्यंत स्वारी.
१५७० अफजल प्रसंग. पंताजी गोपिनाथास हिवरें इनाम.
१५७१ चंदन वगैरे किल्ले घेतले.
१५७२ फाजील अफजलखानाची स्वारी. बाजी प्रभूचा पराक्रम
१५७३ राजे यानीं राजगडी राहून तीन लग्नें केलीं.
१५७४ औरंगजेब दिल्लीस जावयास निघाला. त्याचें पत्र महाराजांनीं कुत्र्याच्या शेपटीस बांधून फिरविलें. शास्ताखान चालून आला. त्याचीं बोटें तोडलीं.*
१५७५ मिरजा राजाची स्वारी; त्याच्याशीं तह.
१५७६ दिल्लीस बादशाही भेट व कैद.
१५७७ शिवाजी व संभाजी कैदेतून सुटून परत रायगडास आले.
१५७८ दलेलखानाकडे संभाजी गेला. शिवाजी पन्हाळ्यास.
१५७९ संभाजी परत येऊन पन्हाळ्यास महाराजांना भेटला.

---

* शास्ताखान लालमहालांत होता असें सांगून " त्याचे पुढे हाली नानाफडणीस राहतात " असें म्हटलें आहे. यावरून ही शकावली नानांच्या हयातींत शके १७१८ मध्यें लिहिली अशी खात्री होतें.

१५८० दलेलखानास विष देऊन बादशहानें मारविलें.
सिवाजी महाराजाचा विजापूरकराशीं तह.

१५८१ शहाअलम शहाजादा दिलीहून चालून आला; त्याच्याशीं महाराजानीं तीन वर्षांचा तह केला.

१५८२ कोकणांत स्वारी.

१५८५ मोरोपंतास पाठवून शहाजाद्याशी बिघाड केला.

१५८६ सुरतेची पेठ लुटली.

१५८७ शहाजादे दिलीस गेले. शिवाजी राजे यांनीं कोकणचे किल्ले घेतले. शाहाजी विजापुरी.

१५८८ शहाजीस मुघोळच्या घोरपड्याकडून कैद करविलें. नंतर रणदुलाच्या मध्यस्तीनें सुटका झाली.

१५८९ शिवाजी राजे यांनीं घोरपड्यांचा सूड घेतला.

१५९० शहाजी व शिवाजी यांची भेट.

१५९१ शहाजीचा मृत्यु.

१५९२ विजापुरावर स्वारी, रणमस्तखानाचा पराभव.

१५९३ भागानगर प्रांतीं स्वारी. तानाशाची भेट.

१५९४ कर्नाटकाची स्वारी.

१५९५ गागाभट काशीवर आले. चंदीच्या फौजा परत देशी आल्या.

१५९६ मुंजीबंधन व राज्याभिषेक.

१५९७ रायरीवर असून स्वारी शिकारी करतात.

१५९८ कोकणप्रांतीं स्वारी.

१५९९ स्वारी करून किल्ल्यावर होते.

१६०० किल्यावरच होते.

१६०१ नारोशंकर सचीव याजकडे देसीचा सुभा चालत होता त्याजकडील सुभ्याचे कामावर राघो बल्लाळ तळेगावीं राहून कारभार करीत होते.

१६०२ जालनापूरची स्वारी. रायरीवर येऊन मृत्यु.

यावरून शके १७१८ मधील या संशोधकास शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत काय काय गोष्टी झाल्या याची स्थूलमानानें माहिती होती परंतु त्या गोष्टींचा त्यानें ठरविलेला कालक्रम लक्षांत घेतला असतां राज्याभिषेक व मृत्यु या दोहोंखेरीज शिवचरित्रांतील एकाहि गोष्टीचा काल त्याला बरोबर ठरवितां आला नाहीं असें स्पष्ट दिसतें.

या शकावलीचें स्वरूप इतक्या खुलाशानें सांगण्याचें कारण ही ज्या अत्रे वहींत आहे त्याच अत्रे वहींत अत्यंत विश्वासनीय 'राज्याभिषेक शकावली' हि लिहिलेली आहे. आणि या ऐतिहासिक बाडांत अशा आणखी बऱ्याच शकावल्या असून त्या परस्परांपासून अगदीं भिन्न आहेत व त्यांची विश्वसनीयताहि अगदीं निरनिराळी आहे.

फोर्ब्स कलेक्शनमधील अशाच एका बाडांत १५५१ हें शिवजन्माचें साल दिलें असून त्याचा उल्लेख या ग्रंथांत ठिकठिकाणीं आला आहे. याकरितां या चोपडयाचेहि स्वरूप सांगून ठेवणें अप्रासंगिक होणार नाहीं.

मुंबईत रॉयल एशिआटिक सोसायटीच्या लायब्ररींत फोर्ब्स सभेचा हस्तलिखित संग्रह ठेवलेला आहे. रासमाला नामक गुजराथच्या इतिहासावरील ग्रंथाचा कर्ता जो फोर्ब्स त्याच्या स्मरणार्थ ही सभा गुजराथी लोकांनीं स्थापिली व येथें मुख्यत्वें गुजराथी हस्तलिखितांचा संग्रह केलेला आहे. पण त्यांच्या या संग्रहांत चुकून एका मराठी चोपडयाचाहि समावेश झालेला आहे. हें चोपडें शिवापूरकर देशपांडे घराण्यांतले असून कोणी संशोधक इंग्रजानें तें इ. स. १८६३ सालीं सभेस दिलें. या शकावलीचीं २५० पानें असून हस्ताक्षरावरून ती पेशवाईअखेर लिहिल्याचें ठरतें; आणि नंतर दुसऱ्या लेखकानें सन १८५२ पर्यंतच्या कांहीं नोंदी तिच्यांत जोडल्या आहेत.ही वही उतरणारापुढें अनेक वेगवेगळीं टिपणें होतीं. व तीं या चोपडयांत त्यांनीं एकत्र संग्रहीत केलीं आहेत. या चोपडयांतील शकावल्या निरनिराळया आहेत असें मत हें चोपडें नजर करणाऱ्या युरोपियन संशोधकानें आपल्या पत्रांत नमूद केलें आहे. तो म्हणतो—

This seems to be a collection made from various sources having no connection with each other. The earlier portion relates to the eras and the ancient kings and is Mythological. Parts relating to the Bijapur kings and the Marhata Princes are quasi historical- The account of the Peshwa administration given at pp- 94 to 161 is fuller and seems partly formed an authentic information. इत्यादि.

यानंतर या चोपड्यांतील राज्याभिषेक शकावलीतला शिवाजी व संभाजी यांचा जन्म टिपून ( पृ. ६५ पहा. ) 'येथें प्रकरण*संपलें' असा शेरा दिला आहे. परंतु या ठिकाणीं संपलेल्या प्रकरणाची बारकाईनें छाननी करण्याची इच्छा त्या संशोधकास झाली नाहीं यामुळें हें चोपडें तेथे पडून राहिलें. त्या-

* Something like the end of a chapter

कडे संशोधकांचें लक्ष वेधण्याचें श्रेय रा. डिस्कळकर यांना आहे. या चोपड्याची तपासणी करतांना हें बाड अनेक शकावल्या एकत्र संग्रहीत करण्याच्या बुद्धीनें लिहिलेलें आहे त्याअर्थी त्यांत कोणती शकावली कोठें सुरू झाली व कोठें संपली हें ठरवून मग प्रत्येक शकावलीची किंमत स्वतंत्रपणें ठरविणें जरूर आहे एवढा इषारा देऊन ठेवणें अगत्याचें दिसतें.

राज्यव्यवहारकोश (पृ. १३७) या पूर्वी तीन वेळां छापला गेला. परंतु आतां त्याच्या प्रती दुर्मिळ झाल्या आहेत याकरितां तो छापणें जरूर होतें. शिवाय आजपर्यंतच्या आवृत्तींत प्रसिद्ध न झालेला या कोशाचा उपोद्घात व उपसंहार देणारी प्रत उपलब्ध झाल्यामुळें या कोशाचा प्रस्तुत ग्रंथात समावेश केला आहे. यांत शिवाजी महाराज हे अवतारी पुरुष होते ही कल्पना विस्तरशः मांडली असून तिच्यांत व बखरकारांच्या अवताराच्या कल्पनेंत क्रमानें अंतर पडत गेलें; तें तपासणें मनोरंजक आहे. या कोशांतील कल्पनेचें स्वरूप असें आहे. यवनरूपी दैत्यांच्या जुलमानें संतप्त झालेली पृथ्वी ब्रह्मदेवाकडे गेली आणि 'या दैत्यांच्या भयातून मला सोडीव' अशी तिनें प्रार्थना केली. ब्रह्मदेव विष्णूकडे गेले आणि 'पृथ्वी सहनशील असली तरी तिला यवनांचा दुर्नय असह्य झाला आहे' वगैरे वृत्तान्त सांगते झाले. तो ऐकल्यावर "या महत्त्वाच्या कामीं आम्हीं जाऊन शंकराची योजना करतो" असें विष्णूनीं अभिवचन दिलें. नंतर शंकरांनीं सर्ववृत्तात ऐकून घेऊन "कृष्णा, पूर्वी पृथ्वीची मुक्तता करण्यासाठीं रावणादिकांचा संहार तूच केलास. त्याप्रमाणें आतां देखील मनुष्य रूप धारण करून तूच यवनांचा संहार कर. माझें नांव धारण करून व भवानीचें सहाय्य घेऊन तूं या दैत्यांना सहज मारूं शकशील. सूर्यवंशांत भोसले कुळांत शाहवर्मा राजा व त्याची 'जिजू' नामक पत्नी आहे. त्यांच्या पोटीं तूं मनुष्य जन्म घेऊन वर्णधर्माची स्थापना कर. धर्मग्लानी झाली असतां मी अवतार घेतों अशी जी प्रतिज्ञा तूं अर्जुनाजवळ केली होतीस ती आतां खरी करून दाखीव. उगाच विचार करण्यांत वेळ घालवू नका.' त्याप्रमाणें विष्णूनीं शिवाजी महाराजांच्या रूपानें अवतार घेतला. पुढें लग्न झाल्यानंतर वडिलांची आज्ञा घेऊन महाराज दिग्विजय करण्यास निघाले. नंतर समस्त म्लेच्छगणांना जिंकून त्यांनीं पृथ्वीचें पालन केलें. त्यांना चिंचवडचे नारायण देव यांचा अनुग्रह मिळाला होता. ×

---

× चिंचवडच्या देवाबद्दल शिवाजी महाराजांच्या मनांत यावेळीं ( १५९८ शकांत ) आदरभाव होता याबद्दलचें अस्सल पत्र ( सनदापत्रें पृ. १३३ ) उपलब्ध आहे. त्यात सरहवालदारास हुकूम देतांना 'श्रीचे सेवेस सादर असाल तरी साहेबासहि बरें वाटेल' इत्यादि शब्द आहेत.

महाराजांनीं रघुनाथपंत हणमंते यांना या कोशाचें काम सांगितलें; आणि रघुनाथपंतांनीं तें ढुंढिराज लक्ष्मण व्यास यांच्या हस्तें पार पाडलें. यावरून यावनी शब्दांना संस्कृत प्रतिशब्द योजण्याची इच्छा महाराजांच्या दरबारांतील पंडितांना झाली होती हें स्पष्ट आहे. पण त्याबरोबरच या प्रयत्नाची थट्टा करणारेहि लोक तेव्हां होते असें—

विपश्चित्संमतस्यास्य किं स्यादश विडंबनैः ।
रोचते किं क्रमेलाय * मधुरं कदलीफलम् ॥ ८४ ॥

या श्लोकावरून अनुमान करतां येईल.

भोसलवंशावली ( पृ. १२९ ) हे काव्य व्यंकोजीचा मुलगा शाहाजी याच्या कारकीर्दींत लिहिलें गेलें. भोसले सूर्यवंशातले होते व एकोजी, परसोजी, बाबाजी, मालोजी व शहाजी या क्रमानें या वंशांतील पुरुषांचीं नांवें होतीं इत्यादि माहिती सांगितल्यावर संभाजी, शिवाजी व एकोजी हा शहाजीच्या मुलांचा क्रम सांगून त्यांचें गौरवपूर्वक वर्णन यांत केले आहे.

"शिवक्षमेशः शिव एव साक्षात्" ( श्लो. १६ ) या चरणांत महाराज साक्षात् शंकरच होते असें म्हटलें असून अडचणीच्या वेळीं भवानी त्यांच्या अंगांत शिरून काय करावें तें सांगे व तिचा त्यांच्यावर स्कंदाप्रमाणें अनुग्रह होता असेंहि म्हटलें आहे. पण शिवसमकालीन ग्रंथांत महाराज हे भगवान विष्णूचे अवतार, त्यांचें नांव 'शिव' असले तरी ते शंकरावतारी नव्हते व त्याना भवानीचें सहाय देण्याचें शंकरानीं अभिवचन दिले होतें वगैरे कल्पना आहेत. पण वंशावलींत आणि बखरींत महाराजांना शंकरावतारी बनाविलें आहे.

शिवकालीन ग्रहसाधन व शहाजहानाचा राज्याभिषेक काल ( पृ. १३५ ) हीं दोन किरकोळ प्रकरणें शिवकालिन ग्रहांचें मध्यम भोग काढण्यास व शके १५४९ मधील स्पष्ट ग्रह साधण्यास उपयोगी पडण्याजोगीं आहेत. सवाई माधवरावांच्या वेळच्या व नंतरच्या कित्येक कुंडलीसंग्रहांत शिवाजी महाराजांची म्हणून एक कुंडली(पृ. ५) रूढ होती; ती काल्पनिक आहे व त्याप्रमाणें गुरु, शनि व राहू यांची स्थिति शके १५४९ मध्यें किंवा त्या सुमारास असणे शक्य नाहीं हें सिद्धांतसार्वभौमांतील येथें दिलेल्या स्पष्ट कुंडलवरून सहज ध्यानांत येईल.

'मिर्जा राजा जयसिंग यांचें आज्ञापत्र' हा श्री. सरदार मुजुमदार यांचा लेख पुण्यावर शके १५८२ ते १५८७ पर्यंत ( खं. १८ ले. १३ ) शिवशाहींत मोंगलांचा अंमल होता हें दाखवितो; आणि पुढें आणखी चार वर्षें तेथें मोंगलांचा व मराठ्यांचा असे दुहेरी अंमल चालू असून त्यानंतर शके

---

* क्रमेल=उंट

१५९१ मध्यें तेथून मोंगलांचें ठाणें उठलें असें खं. १८ ले. १९ मधील उल्लेखावरून म्हणतां येतें.

शिवशाहींतील पंचागशुद्धी ( पृ. २१९ ) व गागाभट्ट विरचित शिवार्कोदय ( पृ. २२३ ), या प्रकरणांवरून शिवशाहींतील सर्वांगीण जागृति अजमावतां येते; आणि शहाजी अदिलशाही ( पृ. २२६ ) व शिवकालीन जन्मपत्रिका ( पृ. २२६ ) वगैरे प्रकरणावरून शिवकालीन इतिहासास उपयोगी पडणारी सामग्री अनेक स्वरूपांत कशी दडून राहिली आहे व मधुकर वृत्तीने तिचा संग्रह करण्याची किती अवश्यकता आहे तें दिसून येईल.

साधनात्मक प्रकरणाच्या वर्गांत शकावल्याप्रमाणे जेधे यांचा करीना फार महत्त्वाचा आहे. शकावल्यांतून मोघम घडामोडींच्या नोंदी असतात. यामुळें संशोधकांवाचून इतर वाचकांना त्यात गोडी वाटत नाहीं. पण करीन्याची गोष्ट तशी नाहीं. त्यांत संगतवार हकीकत लिहून काढलेली आहे. हें खरे कीं ती विस्तृत असती तर फार चांगलें झालें असतें. पण उपलब्ध शिवकालीन सामग्रींत या करीन्याचा अंतर्भाव पहिल्या वर्गांत करावा लागेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. महाराजांच्या राजकीय प्रयत्नाची प्रारंभावस्था यांत सांगितलेली असून अफजल प्रकरणाचें वर्णन तर इतके मार्मिक शब्दांत आलेले आहे कीं तें वाचीत असतां त्या वेळचा देखावा वाचकांच्या मनश्चक्षूसमोर उभा राहतो. महाराष्ट्रांतील लहान मोठ्या सर्व वाचकाना तो वाचनीय व मननीय वाटावा अशी या करीन्याची योग्यता आहे.

या खेरीज शब्दाच्या बारकाव्याच्या दृष्टीनें या करीन्यांतील एक वाक्य फारच महत्त्वाचें आहे. अफजलखानाशीं वागण्यांत कोणतें धोरण स्वीकारावें याची चर्चा करतांना मावळच्या देशमुखांना उद्देशून कान्होजी जेध्यानें आपलें हृद्गत सागण्यासाठीं ज्या वाक्यांची योजना केली तीं अशीं आहेत: " आम्ही स्वामींच्या पायासीं इमान धरून वतनास देखील पाणी सोडिलें. आम्हीं व आपले लेक देखील राजश्री स्वामीपुढें खस्त होवे ऐसा आमचा दृढ विचार आहे. तुमचा मुद्दा काय तो बोलणें. मुसलमान बेईमान आहे. कार्य जालियावरी नस्तें निमित्य ठेऊन नाश करील. हें मऱ्हाष्ट्र राज्य आहे. अवघियानीं हिंमत धरून, जमाव घेऊन, राजश्री स्वामीसंनिध राहोन येक निष्ठेनें शेवा करावी. " आणि " ऐशा हिमतीच्या गोष्टी सांगितल्या तेव्हां अवघे देशमुख बोलिले कीं तुमचा विचार तोच आमचा विचार इमानपुरस्कर आहे " असें कान्होजीच्या वाक्याचें पर्यवसान झाल्याचेंहि लिहिलें आहे. यावरून शिवाजी महाराजांच्या वेळीं आपल्या राज्याचा निर्देश करतांना व अभिमानपूर्वक बोलण्याच्या प्रसंगीं " हें मऱ्हाष्ट राज्य आहे " असा शब्दप्रयोग करीत असें दिसतें. राजारामाच्या वेळीं देखील शके

१६१९ मध्यें ( खं. १८ पृ. ५८ ) एक देस कुलकर्णी आपली हकीकत सांगतांना हजरती पातशा ( औरंगजेब ) तुलापुरचे मुकामी होते त्या प्रसंगीं 'आपण मऱ्हाटस्ट राज्यामधें होतो ' असे शब्द योजतो. त्याअर्थी त्यावेळीं देखील लोकांच्या तोंडीं ' मऱ्हाटस्ट राज्य हा शब्द होता ' स्वराज्य ' हा नव्हता. स्वराज्य शब्द शाहूच्या आगमनापासून विशेष रूढ झाला असावा; निदान त्या पूर्वीच्या अस्सल पत्रांत तो बहुधा आढळत नाहीं; आणि शाहूच्या वेळेपासून स्वराज्य शब्दांत शुद्ध स्वातंत्र्याची कल्पना प्रामुख्यानें नाहीं. 'मऱ्हाटस्ट राज्य' हा शब्द मात्र आपलेपणाची मर्यादा स्पष्ट सांगून स्वातंत्र्य मिळविण्याचा निर्धार जाहीर करणारा व लोकांच्या अंतःकरणांत आवेश उत्पन्न करणारा असा होता. यावरून ' स्वराज्य ' शब्दापेक्षां ' मऱ्हाटस्ट राज्य ' या शब्दांशीं निगडित झालेल्या ऐतिहासिक भावना जास्त पवित्र व श्रेष्ठ प्रतीच्या आहेत असें म्हणतां येईल.*

साधनात्मक प्रकरणानंतर तिसऱ्या म्हणजे अवतरणात्मक वर्गात सात उताऱ्यांचा अंतर्भाव होतो. हे सर्व उतारे शिवजन्मतिथिवादासंबंधीचे असून ते वाचून वाचकांना या बाबतींत स्वतःच निर्णय देता येण्याजोगा आहे. शिवजन्म-तिथीच्या दृष्टीनें बखरी व इतर जुने ग्रंथ पाहतांना तीन प्रकारचें परीक्षण केलें पाहिजे. पहिलें ग्रंथपरीक्षण म्हणजे विवक्षित बखरींत अगर ग्रंथांत शिवचरित्रविषयक शक किती आले आहेत, त्यांतले प्रत्यंतर पुराव्यानें किती खरे ठरले व किती खोटे ठरले आणि एकंदरींत बखरीतील हकीकतींत कालानुक्रम कितपत साधला आहे व विपर्यास किती झाला आहे. या नंतरचें काम म्हणजे शिवजन्मकालीन परिस्थिती व इतर अनुषंगिक माहिती सांगणाऱ्या प्रसंगाची तापसणी करून तो बखरींतल्या जन्मकाळाशीं सुसंगत आहे किंवा नाहीं हें पाहणें; यास प्रसंगपरीक्षण म्हणतां येईल. आणि जन्मतिथि देणारें वाक्य गणितदृष्ट्या बिनचूक आहे किंवा नाहीं याची तपासणी करणें यास वाक्यपरीक्षण म्हणावें लागेल. पैकीं ग्रंथपरीक्षणाच्या दृष्टीनें बखरी विश्वसनीय नाहींत असें ठरल्याचें सर्व महाराष्ट्रीय संशोधकांनीं अनेक ठिकाणीं नमूद केलें आहे. यामुळें ' प्रसंग ' व ' वाक्य ' यांची परीक्षा करण्याचेंच तेवढें काम शिल्लक राहतें.

---

* ' हें मऱ्हाटस्ट राज्य आहे ' हें वाक्य शके १६१२ मध्यें राजारामाच्या वेळींहि रूढ होतें ( खं. १५ ले. ३४७ ); आणि शके १६२९ मध्यें शाहू आला त्यावेळीं ' महाराष्ट्र राज्यास कल्याण चिंतीत आहां ' असें वाक्य आलेलें आहे. ( भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष १ अं. २।३ पृ. ३९ ). त्या नंतर महाराष्ट्रधर्म हा शब्द पुष्कळ पत्रांतून आहे; पण ' मऱ्हाटस्ट राज्य ' हा शब्द मात्र पुढें आढळत नाहीं.

त्यांत वाक्य परीक्षणाच्या दृष्टीनेंहि फारसा वाद राहिला नाहीं. कारण वैशाख शुद्ध द्वितीया देणारे बखरकार वाराचें नांव 'गुरुवार' देतात; आणि त्या दिवशीं शनिवार होता त्या अर्थी तेथें तिथिवारांचा मेळ बसणें अशक्य आहे. आणि पंचमीवादी बखरकार संवत्सराचें नांव 'क्षय' असें देतात; 'प्रभव' असें त्यांतील एकाहि बखरकार देत नाहीं. 'प्रभव' याच्या जागीं वाचनाची चूक होऊन 'क्षय' असेंहि वाटण्याचा संभव नसल्यामुळें येथें शकसंवत्सराचा मेळ घालतां येत नाहीं. मिळून शकास संवत्सराचा व तिथीस वाराचा मेळ बसला पाहिजे हें जें विश्वसनीय तिथीचें मुख्य लक्षण तें कोणत्याहि बखरीतील तिथीस लागू पडत नाहीं.

हें निश्चित झाल्यावर एखाद्या जंत्रींत, भिडे यांच्या इतिहासांत किंवा बर्जेसच्या शकावलींत काय मिती दिली आहे याची चौकशी करण्याचें प्रयोजन नाहीं. कारण जंत्री म्हणजे कोणत्या शकास कोणता संवत्सर होता व कोणत्या तिथीस काय वार होता हें गणितानें सांगणारा कोष्टकांचा ग्रंथ. या जंत्र्या लिहिण्याचा प्रघात अवल इंग्रजींत किंवा किंचित त्यापूर्वी जारी झाला. आणि अशा जंत्रींत कांहीं शकासमोर ऐतिहासिक महत्त्वाच्या गोष्टी 'शेरा' या सदरांत (बखरी किंवा इतिहासाचें पुस्तक पाहून) टिपण्याचा प्रघात असे. मॅककडेन यांनें अशी एक जंत्री इंग्रजींत छापली व स. १८६३ मध्ये तिचें मराठी भाषांतर मांडे यांनीं छापले हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें बर्जेस किंवा भिडे यांची ऐतिहासिक माहिती देखील जुन्या बखरीवरून जुळवून लिहिलेली आहे. तिला स्वतःप्रामाण्य नाहीं. तिची योग्यायोग्यता या आधुनिक ग्रंथकारांनीं व जंत्रीकारांनीं ज्या बखरींचा उपयोग केला त्या बखरींच्या प्रामाण्यावर अवलंबून असणार. त्याअर्थीं वादप्रसंगीं या आधुनिकांच्या विधानास महत्त्व न देतां त्यांनीं जेथून माहिती मिळविली त्या मुळांत म्हणजे बखरींत काय विधानें आहेत हें पाहणेंच इष्ट आहे. आणि अशा रीतीनें एकाहि बखरींत जन्मातिथिविषयक वाक्य बिनचूक लिहिलेलें आढळत नाहीं हें सांगितलेंच आहे.

यानंतर प्रसंग परीक्षण राहिलें. या प्रसंगांत शहाजीचा जाधवरावानें केलेला पाठलाग बखरींनीं वर्णिलेला असतो. एतद्विषयक सर्व बखरीतले उतारे या ग्रंथांत दिले आहेत ( पृ. ७१–७९ ). त्यावरून व त्यांचा सारांश पृ. २७७ वर दिला आहे त्यावरून बखरकारांची हकीकत विसंगत आहे हें कोणासहि दिसण्याजोगें आहे. ती संगतवार आहे असें कोणीहि प्रतिपादन केलेलें नाहीं व तसें करता येणें शक्य नाहीं. यामुळें बखरींचा तपशील सर्व सोडून पाठलागाची हकीकत जुळविण्यासाठीं काय परिस्थिती पाहिजे याचें काल्पनिक चित्र रेखाण्याचेंच काम शिल्लक राहतें. तें कित्येकांनीं केलें आहे. पण त्यास ग्रंथाधार नस-

त्यामुळें तें जमेस धरतां येत नाहीं. हें काल्पनिक चित्र शके १५४९ किंवा १५५१ या पैकीं कोणत्याही शकास जुळतें असें दाखवितां येतें. कारण ज्या लुखजी जाधवाच्या मृत्यूवर हा प्रश्न निर्णीत करावा असे वाटण्याचा संभव आहे त्या लुकजीचा मृत्यु १५५१ मध्यें झाला असें जेधे म्हणतो व १५५२ मध्यें झाला असें प्रो. सरकार मुसलमानी ग्रंथाधारें सुचवितात. त्यापैकीं १५२२ मधला खरा 'ठरल्यास' ५१ मध्यें पाठलाग होण्यास अडचणच राहात नाहीं. आणि १५५१च्या श्रावणांतला ठरला तरी देखील त्यावेळीं जिजाबाई गर्भवती होती असें म्हणण्यास हरकत येत नाहीं. साराश बखरीतला मजकूर आहे तसा घ्यावयाचा नाहीं; जमेल तेवढा घ्यावा आणि नडेल तेथें तो सोडून कल्पना चालवावी हा न्याय मान्य केल्यावर पाठलागाची हकीकत १५४९ किंवा १५५१ मध्ये कोठेंहि जुळवितां येईल; आणि जुळविण्यांत आली आहे तिचें स्वरूप असेंच आहे.

पण यापेक्षां महत्त्वाचा मुद्दा असा आहे कीं पाठलागाची संगति लावणें हें या बाबतींत निर्णायक होऊं शकत नाहीं. प्रत्यंतर पुराव्यानें किंवा विश्वसनीय आधारानें पाठलागाची हकीकत खरी असल्याचें मुळींच सिद्ध झालेलें नाहीं. सभासद व चित्रगुप्त या जुन्या बखरकारांनीं त्याचा साक्षात किंवा ओझरताहि उल्लेख केलेला नाहीं. फक्त पेशवाईतल्या बखरकारांनीं पाठलाग वर्णिला आहे. पण तो वर्णन करतांना जो तपशील दिला आहे तो इतका विसंगत आहे कीं त्याचें समर्थन करतांच येत नाहीं. अर्थात तो विसंगत व असमर्थनयि ठरत असल्यामुळें त्याच्याशीं त्यानीं जोडलेला १५४९ शकहि विश्वसनीय धरतां येत नाहीं असें म्हणणें न्यायाचें ठरेल. त्याचप्रमाणें १५५१ मध्यें शिवजन्म झाला असें म्हणणारे शिवभारत वगैरे आधार ज्या दर्याखानाच्या स्वारीचा उल्लेख करतात तो त्या वेळीं हयात होता किंवा नाहीं व त्यावर त्या सुमारास स्वारी होणें शक्य आहे किंवा नाहीं वगैरे प्रश्नांची कडक परीक्षा करावी आणि नंतर १५५१ शक मान्य करतां येतो किंवा नाहीं याचा निर्णय द्यावा. असें न करतां जो पाठलाग झाला किंवा नाहीं याचा निर्णय नाहीं, पाठलाग करणारा जाधवराव १५५१ मध्यें मेला कीं १५५२ मध्यें मेला याबद्दल वाद आहे; जो पाठलाग १५५१ किंवा १५४९ यापैकीं कोठेंहि जुळवितां येतो, त्या पाठलागाची संगति लावण्याची जबाबदारी ज्या ग्रंथकारांनीं पाठलागासंबंधीं अवाक्षरहि काढलेलें नाहीं त्यांच्यावर टाकणें आणि ही संगति जुळवून द्याल तर तुमचा '५१ शक खरा नाहीं तर खोटा असें बजावणें शास्त्रशुद्ध तर्कास धरून होईल असें कोणीहि म्हणू शकणार नाहीं.

तात्पर्य ग्रंथपरीक्षण, प्रसंगपरीक्षण व वाक्यपरीक्षण या तीनहि दृष्टीनें बख-

रीतला शिवजन्मकाल अग्राह्य व जेधे आणि शिवभारत यांतील ग्राह्य व विश्वसनीय आहे असें आम्हांस निःसंशय वाटतें.

या पुस्तकांत आलेल्या प्रकरणांचा परिचय करून देण्यासाठीं त्यांचें सामान्य स्वरूप सांगितल्यानंतर प्रस्तावनेच्या शेवटीं ग्रंथ प्रकाशनाच्या कामीं ज्यांचें सहाय झालें त्या सद्गृहस्थांचे आभार मानण्याचेंच तेवढें राहिलें. बहुतेक लेखकांचीं नांवें दिलीं असल्यामुळें व उतारे कोठून घेतले अगर साधनात्मक प्रकरणें कोणामार्फत मिळालीं याचा निर्देश जेथल्या जेथें केला असल्यामुळें त्यांचा पुनः येथें स्वतंत्रपणें नामनिर्देश न करतां त्या सर्वांचे आम्ही फार आभारी आहों एवढें सांगितलें म्हणजे पुरें होईल. याखेरीज ग्रंथाचीं मुद्रितें तपासण्याचें काम रा. शंकरराव जोशी यानीं परिश्रमपूर्वक केलें, सूचीच्या कामीं त्यांना व रा. बा. ग. परांजपे यांना फार दगदग पडली; तंजावर येथील सरस्वतीमहाल, पुणें येथील भा इ. सं. मंडळ, व आनंदाश्रम; श्रीमंत सरदार तात्यासाहेब मेहेंदळे, श्रीमंत सरदार बाळासाहेब घोरपडे, कसब्यातील गणपतीचे सेवक रा. पिलोबा ठकार; होनप घराण्याचे विद्यमान प्रतिनिधी रा. गणपतराव देशपांडे यांजकडील ग्रंथ, हस्तलिखित पोथ्या अगर पत्रव्यवहार या पुस्तकासाठीं उपयोगांत आणता आला; आणि रा. सा. बाबासाहेब साने यांनीं आपली राजव्यवहारकोशाची अपूर्व प्रत आमच्या हातीं प्रसिद्धीसाठीं दिली व रा. रा. कृष्णाजी वासुदेव पुरंदरे यांनीं पत्रें, शकावल्या, व चोपड्या मिळवून व. स. ग. जोशी यानीं जेधे शकावली व करीना आणून या ग्रंथासाठीं फारच आस्थेची मदत दिली व भारत इतिहास-संशोधक मंडळानें हें पुस्तक पुरस्कृत ग्रंथमालेंत समाविष्ट करण्याची परवानगी दिली याबद्दल या सर्वांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतों.

पुणें मार्गशीर्ष व. २
शके १८४७

दत्तात्रय विष्णु आपटे
सदाशिव महादेव दिवेकर.

*

# भारत इतिहास संशोधक मंडळ

## पुरस्कृत ग्रंथमालेची योजना

( मंजूर—तेरावें संमेलन )

मंडळाजवळ हल्लीं रोज कमीअधिक महत्त्वाचा उपयोगी, लोकेतिहास-साधनसंग्रह विविध प्रकारचा साचत आहे; तो सर्व स्वतःचे ग्रंथमालेंत छापून काढणें मंडळास प्रायः शक्य नाहीं. शिवाय सर्वच साधनसंग्रह जरी जनोपयोगी असला तरी तारतम्यानें विचार करतां सर्वांची किंमत सारखीच धरतां येणार नाहीं. उदाहरणार्थ एकाद्या घराण्यासंबंधीं वृत्तांताचे तपशीलवार कागदपत्र किंवा गांवाचे हिशेब वगैरे बहुशः अशा तपशिलांनीं सडकून भरलेले असतात कीं जे तपशील दिसण्यांत तर निरुपयोगी वाटतात, परंतु ज्यांच्या पासून 'कणशः क्षणशः' बराच संगतवार व सूक्ष्म इतिहास अनुमानाच्या बलावर तयार करितां येईल; पण लौकिक दृष्ट्या ते सर्व छापणे इष्ट होणार नाहीं आणि असा उपक्रम मंडळाच्यानें तडीस जाणार नाहीं. आतां क्वचित् असे हौशी इतिहास-भक्त पाहण्यांत आहेत कीं आपल्या घराण्याचे किंवा आवडीचे काव्येतिहास-साधनग्रंथ किंवा निरूपणग्रंथ आपणच छापू इच्छितील; परंतु मंडळाचा अभिप्राय आणि सहाय्य याची अपेक्षा करतील. असे ग्रंथही जर बाहेरून खर्च घेऊन आपोआप प्रसिद्ध होतील तर मग ज्या महत्त्वाच्या साधनांचा पूर्णतया परामर्ष होत नाहीं त्या साधनावरच अधिक विशेष लक्ष घालण्यास मंडळास सवड सापडेल. हा विचार करून पुढील योजना कारभारी मंडळानें मुक्रर केली आहे. योजनेची गोष्ट बारावें संमेलन प्रसंगीं मोकळ्या चर्चेच्या वेळीं सभासदास फार संमत वाटली असें दिसून आलें होतें आतां तीस मूर्त स्वरूप येत आहे हें पाहून काव्येतिहासभक्तांस आनंद वाटेल. योजना ठोकळपणें अशी कीं—

( १ ) स्वतंत्रपणें मिळालेली किंवा मंडळ संग्रहींत असलेली जी काव्ये-तिहाससाधनसंपत्ती परभारा परंतु मंडळाच्या संमतीनें छापवावी असे कारभारी मंडळ ठरविल ती ' भा. इ. मंडळ पुरस्कृत ग्रंथमाला ' या नांवानें प्रसिद्ध करण्याची तजवीज व्हावी.

( २ ) सदर्हु ग्रंथमालेंत प्रसिद्ध व्हावयाचा सर्व मजकूर मंडळानें आधीं प्रसिद्धयर्ह ठरविला पाहिजे.

( ३ ) पुरस्कृत ग्रंथमालेतील ग्रंथाच्या निरनिराळ्या प्रकाशकांनीं त्यांतील

सर्व मजकूर ' मंडळ संमत ' होण्यासाठीं प्रसिद्धीपूर्वीं मंडळाच्या नियत अधिकाऱ्याकडे पाठविला पाहिजे.

( ४ ) पुरस्कृत ग्रंथमालेंतील प्रत्येक ग्रंथास मंडळाकडून प्रास्ताविक मजकूर लिहिला जाईल; त्याशिवाय ग्रंथ प्रसिद्ध होऊं नयेत.

( ५ ) या ग्रंथाच्या प्रत्येक आवृत्तीचें वेळीं ग्रंथावर भा. इ. सं मं. पु. ग्रं. मा. क्र. असा निर्देश केला पाहिजे.

( ६ ) मंडळाचा या मालेंतील ग्रंथावर मालकी हक्काचा संबंध (खास लेखी अपवाद सोडून ) बिलकूल रहाणार नाहीं.

( ७ ) सदर ग्रंथमालेंत उपयोगांत आलेली मंडळ संग्रहांतील साधन-सामुग्री वाटेल तेव्हां वाटेल तितकी समग्र किंवा अंशतः प्रसिद्ध होऊ देण्याचा किंवा करण्याचा मंडळाला पूर्ण अखत्यार राहील.

( ८ ) (खास अपवाद वगळून) मंडळपुरस्कृत ग्रंथमालेतील या ग्रंथाच्या खर्चाबद्दल मंडळ बिलकूल जबाबदार असणार नाहीं. सर्व खर्च प्रकाशकांनीं भागविला पाहिजे.

( ९ ) पु. ग्रं. मा. तील प्रत्येक ग्रंथाच्या प्रत्येक आवृत्तीच्या पंचवीसपर्यंत का. मंडळ मागेल तेवढ्या प्रती मंडळाच्या संग्रहासाठीं नजर केल्या पाहिजेत. मंडळ ह्या प्रती विकणार नाहीं.

( १० ) पु. ग्रंथमालेंतील ग्रंथ ( एक प्रत दर डोई ) मंडळाच्या सर्व वर्गाच्या सभासदास इतर कोणापेक्षांहि अधिक सवलतीनें मिळाला पाहिजे.

( ११ ) पुरस्कृत ग्रंथ मालेंतील मजकुराच्या तपशीलाची जबाबदारी मंडळावर किमपिहि राहणार नाहीं.

# शिवचरित्र प्रदीप.

भूबाणप्राणचन्द्राद्वैः सम्मिते शालिवाहने ।
शाके संवत्सरे शुक्ले प्रवृत्तेचोत्तरायणे ॥२६॥
शिशिरर्तौ वर्तमाने प्रशस्ते मासि फाल्गुने ।
कृष्णपक्षे तृतीयायां निशि लग्ने सुशोभने ॥२७॥

अनुकूलतर[illegible] पञ्चस्वपि ग्रहे[illegible] ॥२८॥
अपारलावण्यमयं स्वर्णवर्णमनामयं । कमनीयतमग्रीवमुन्नतस्कन्धमण्डलम् ॥२९॥

आलोकान्तामलत्कान्तकुन्तलाग्रावराजितम् । सरोजसुन्दरदृशं नवाकशुकनासकम् ॥३०॥
सहजस्मेरवदनं घनगंभीरनिस्वनम् । महोरस्कं महाबाहुं सुषुवे साद्भुतं सुतम् । ॥३१॥

**श्री छत्रपति शिवाजी ।**

शिवभारत अ. ६ ॥

5244—Lakshmi Art, Bombay, 8

# शिवाजीची जन्मतीथ.

———:०:———

( इतिहाससंशोधक रा. वि. का. राजवाडे )

'( इ. स. ) १६१९ पासून १६२७ पर्यंत शहाजीच्या हालचालींचा वृत्तांत कसाबसा थोडाबहुत दिला आहे. आतां १६२७ पासून १६३७ पर्यंत त्यानें काय केलें तेंहि बखरीच्या आधारानें सांगितलें पाहिजे. परंतु त्या वेळची हकीकत सांगतांना बखरकारांनीं जो घोंटाळा केला आहे तो सांगतां पुरवत नाहीं. शहाजी, मलिकंबर, मुरार जगदेव व चतुर साबाजी ह्यांचीं नांवें पुन: पुन्हां उच्चारण्या पलीकडे बखरींतून जास्त व व्यवस्थित अशी माहिती यत्किंचित्‌हि दिलेली नाहीं. मलिकंबर १६२६ त वारला असून त्याचे नांव पुढें हे बखरनवीस कसे घेतात ह्याचेंच आश्चर्य वाटतें. परंतु ह्याचे फारसे आश्चर्य वाटावयास नको. कां कीं खुद्द शिवाजी महाराजांच्या जन्माची जी तीथ व जो दिवस ह्या लोकांनीं दिला आहे व जो आजपर्यंत खरा म्हणून धरला गेला आहे तो देखील बहुश: चुकला असावा असें वाटतें. मल्हार रामराव व शिवदिग्विजयाचा कर्ता हे शिवाजी शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे वैशाख शु॥ २ गुरुवारीं रोहिणी नक्षत्रीं जन्मला म्हणून लिहितात. परंतु, शके १५४९ च्या वैशाख शुद्ध द्वितियेस गुरुवार नसून शनिवार आहे, त्या अर्थीं ह्या मित्तीवर विश्वास ठेवतां येत नाहीं. प्रो. फारेस्ट यांनीं छापिलेल्या रायरी येथील बखरींत शिवाजीचा जन्म शक १५४८ म्हणून दिला आहे. रायरी येथील बखरीच्या मजजवळ असलेल्या मराठी प्रतींत शिवाजीचा जन्म शक १५४८ क्षयनाम संवत्सर वैशाख शुद्ध पंचमी चंद्रवार असा दिला आहे. परंतु, शके १५४८ च्या वैशाख शुद्ध पंचमीस चंद्रवार नाहीं; तेव्हां ही मित्ती विश्वसनीय नव्हे, असें म्हणणें भाग पडतें. काव्येतिहाससंग्रहकाराकडे १८७९ सालीं धारेहून रा. काशिनाथ कृष्ण लेले यांनीं पाठविलेल्या एका जंत्रींत शिवाजीचा जन्म शक १५४९ प्रभव नाम संवत्सरे वैशाख शुद्ध पचमी सोमवार म्हणून दिला आहे. शके १५४९ च्या वैशाख शुद्ध पंचमीस सोमवार सरतां सरतां रोहिणी नक्षत्र असावें असें वाटतें. तेव्हां ह्या शेवटल्या मित्तीस म्हणजे शके १५४९ प्रभव संवत्सर वैशाख शुद्ध पंचमी सोमवार रोहिणी नक्षत्रावर शिवाजीचा जन्म झाला हे विश्वसनीय दिसतें. १५४९ च्या वैशाख शु॥ पंचमीला इ. स. १६२७ च्या एप्रीलची १० तारीख होती. शिवाजी १६२७ च्या मेंत जन्मला म्हणून डफ म्हणतो तें अर्थात् बरोबर नाहीं. मल्हार रामरावानें व शिवदिग्विजयाच्या

कर्त्यानें वैशाख शुद्ध द्वितीया गुरुवार ही तीथ कोणत्या हेतूनें दिली हें पाहणें थोडेसें अगत्याचें आहे. राजा म्हटला म्हणजे त्याला जन्मस्थ बहुत ग्रह उच्चीचे असले पाहिजेत ही समजूत फार पुरातन आहे. वैशाख शुद्ध पंचमीस सोमवारीं तसा कांहीं योग नसल्यामुळें वैशाख शुद्ध द्वितीया गुरुवार हीच तीथ पसंत करावी लागली. शिवदिग्विजयाच्या कर्त्यानें तीन श्लोक दिले आहेत व त्या तिन्ही श्लोकांत वैशाख शुद्ध द्वितीया गुरुवार हीं अक्षरे स्पष्ट दिलीं आहेत. यद्यपि त्यानें व मल्हार रामरावानें बनावट तिथि देण्यास कमी केलें नाहीं; तत्रापि, बनावट पुरावा जितका बेमालूम करावा तितका करण्याचें त्यांना किंवा त्यांनीं ज्या आधारावरून उतारा घेतला त्या मूळ श्लोककारांना साधलें नाहीं. बनावट पुरावा तयार करणाऱ्यांना आपलें काम बेमालूम करण्याइतकें शास्त्रज्ञान प्राय: नसतें हें तरी मनुष्यमात्राचें सुदैवच समजलें पाहिजे ! बनावट तिथि देणाऱ्या मूळ श्लोककारांच्या किंवा टिप्पणकारांच्या मजकुरांत ह्या बखरनवीसांनीं आपलें आणीक शहाणपण मिरविलें नाहीं, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे !' ( खं. ४ पृ.४१-४२ )

---

# श्रीशिवाजीमहाराजांची जन्मतिथि.

**( चैत्र व. १०।१८२२ केसरी अंक १७ वर्ष २०; ता २४।४।१९०० )**

आज हा विषय हातीं घेण्याचें कारण येत्या सोमवारीं रायगड येथें व अन्यत्र होणारा शिवजयंत्युत्सव हें एक तर खरेंच; पण ह्याशिवाय या विषयाकडे लक्ष्य जाण्यास रा. रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलेलें " मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड ४ था " हें पुस्तकाहि मुख्यत्वेंकरून कारण झालें आहे. रा. रा. राजवाडे ह्यांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या पुस्तकास १४० पृष्ठांची एक मोठी प्रस्तावना जोडून पुढें पांच ऐतिहासिक ग्रंथ छापलेले आहेत. हे ग्रंथ पेशवाईच्या इतिहाससंबंधाचे आहेत. पण प्रस्तावनेंत जे निरनिराळे विषय घेतले आहेत ते सर्व शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीबद्दलचे असून त्यांची चर्चा रा. रा. राजवाडे ह्यांनीं योग्य शोधकबुद्धीनें व काळजीनें केलेली आहे. शिवाजीचे वेळच्या इतिहाससंबंधानें गेल्या वर्षांत प्रसिद्ध झालेलें महत्वाचें असें हें एकच पुस्तक होय. निरनिराळ्या वादग्रस्त विषयांवर बखरींतून किंवा अन्यत्र ठिकाणीं मिळालेली माहिती एकत्र गोळा करून ती परस्परविरोधी असल्यास त्यापैकीं खरी कोणती व खोटी कोणती याचा निर्णय करण्याचें काम किती नाजूक आहे, हें रा. रा. राजवाडे

यांच्या ग्रंथावरून कोणाच्याहि सहज नजरेस येण्यासारखें आहे. व आमची अशी आशा आहे कीं, रा. रा. राजवाडे हे मराठ्याच्या इतिहासांतील निरनिराळ्या शंकास्थानांचें असेंच परीक्षण करून त्यासबंधानें योग्य माहिती लोकांपुढें मांडण्याचा आपला क्रम पुढेहि चालू ठेवितील.

रा. रा. राजवाडे यांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेतील पान ४१ यांत शिवाजीमहाराजांच्या निरनिराळ्या बखरींत सांपडणाऱ्या जन्मतिथि देऊन अखेरीस शके १५४९ वैशाख शु।। ५ सोमवार रोहिणीनक्षत्र ही तिथि विश्वसनीय आहे असें ठरविलें आहे. रा. रा. राजवाडे यांच्या ह्या निकालासबंधानें आज येथें विवेचन करण्याचा आमचा इरादा आहे. फक्त २७५ वर्षांपूर्वीं जन्मास आलेल्या शिवाजीमहाराजांच्या जन्मतिथीसंबंधानें बखरीत व जुन्या कागदपत्रांत इतका घोटाळा असावा हें मोठेंच आश्चर्य होय. पण वस्तुस्थिति तशी आहे खरी. जुन्या कागदपत्रांतून शिवाजी महाराजांचा जन्मकाल पांच सहा प्रकारें दिलेला आहे व हे काल इतके भिन्न आहेत कीं शक, सवत्सर आणि तिथी यासबंधानें एकाचा मेळ दुसऱ्याशीं पडत नाहीं. महिना मात्र सर्वत्र वैशाख आहे तेव्हां तो बरोबर असावा, एवढेंच काय तें त्यावरून सकृद्दर्शनीं खात्रीनें सागतां येईल. बाकीच्या बाबतींत नीट चौकशी करूनच निकाल दिला पाहिजे हे उघड आहे.

## निरनिराळ्या जन्मतिथी व त्यांवरील आक्षेप

प्रथमतः निरनिराळ्या बखरींतून किंवा जुन्या कागदपत्रांतून कोणकोणत्या तिथी दिल्या आहेत व त्यांवर काय काय आक्षेप आहेत ते पाहूं.

( १ ) शिवाजीमहाराजांचा समकालीन व आश्रित भूषण कवी याच्या शिवभूषण काव्यांत महाराजांच्या जन्मतिथीचा उल्लेख नाही.

( २ ) त्यानंतर सभासद व चित्रगुप्त यांच्या बखरी. सभासदांची बखर शिवाजीमहाराजांचें देहावसान झाल्यावर १४ किंवा १७ ( शके १६१६ किंवा १६१९ ) वर्षांचे आंत तयार झालेली आहे. व चित्रगुप्तांनी हीच वाढवून लिहिली आहे. या दोहोंतहि जन्मतीथ दाखल केलेली नाहीं. शिवाजीमहाराज व जिजाबाई शहाजीस भेटण्यास बेंगळूरास गेली "ते समयीं राजियास वर्षे बारा होतीं" हाच काय तो या बखरींत वयाचा पहिला उल्लेख आहे.

( ३ ) तिसरी बखर मल्हारराव रामराव चिटणीस यांची. यांत जन्मतीथ "शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे वैशाख शु।। २ गुरुवार" अशी दिलेली असून पुढें सहा ग्रह उच्च पडले असें लिहिले आहे. गणितानें पाहतां या दिवशीं गुरुवार येत नाहीं. शनवार येतो; व नक्षत्रहि भरणी येते; मल्हाररावांची बखर शिवाजीचे नंतर सुमारें १३० वर्षांनीं लिहिलेली आहे.

(४) रायरीची बखर, प्रो. फारेस्टसाहेबांच्या सिलेक्शनमध्यें प्रसिद्ध झालेली. यांत आरंभीं शिवाजीचा जन्म शक १५४८ लिहिला आहे. पण बखरीच्या सरतेशेवटीं " शिवाजी शालिवाहन शके १५४९ वैशाख मासीं जन्मले; आणि शके १६०२ सालीं रायगड येथें वारले. " असें लिहून पुढें " त्यांचें आयुष्य ५३ वर्षें, पैकीं १७ व पुंडाईत ३६ गेलीं" असें लिहिलें आहे. दादोजी कोंडदेव वारले तेव्हां शिवाजी १६ वर्षांचे होते असाहि मध्यें लेख आहे. यांत तिथीचा कोठेंहि उल्लेख नाहीं. पण रा. रा. राजवाडे असे लिहितात कीं, त्यांजजवळ असलेल्या रायरीच्या बखरीच्या प्रतींत शिवाजीचा जन्म " शके १५४८ क्षयनाम संवत्सर, वैशाख शु॥ ५ चंद्रवार " असा दिला आहे. गणितानें या दिवशीं सोमवार येत नाहीं; गुरुवार येतो; व नक्षत्र आर्द्रा येतें. रायरीच्या बखरीचें इंग्रजी भाषांतर इ. सन १८०६ त झालेलें आहे, हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे.

( ५ ) काव्येतिहाससंग्रहकारांकडे धारेहून पाठविलेल्या एका जंत्रींत शिवाजीचा जन्म शक १५४९, प्रभव, वैशाख शु॥ ५ सोमवार म्हणून दिला आहे. सोमवारीं संध्याकाळीं पंचमी लागते असें गणितावरून कळतें. या दिवशीं नक्षत्र रोहिणी असावें असें वाटतें असें रा. राजवाडे म्हणतात. पण गणितानें मृग किंवा आर्द्रा निघतें, रोहिणी निघत नाहीं. तिथिनिर्णयाचे कामीं नक्षत्र जमेस धरणें असल्यास गणितानें रोहिणी पंचमीस येणें शक्य नाहीं. हा वैशाख शु॥ पंचमीवर एक मोठाच आक्षेप आहे.

( ६ ) बडोदें येथें छापलेल्या " श्रीशिवदिग्विजय " नांवाच्या बखरींत श्रीशिवाजीची जन्मतीथ शके १५४९ प्रभव, वैशाख शु॥ २ गुरुवार, रोहिणी नक्षत्र अशी दिली आहे. पण शुद्ध द्वितियेस गुरुवार किंवा रोहिणी नक्षत्र येत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. यासंबंधानें या बखरींत पुरातन म्हणून तीन श्लोक दिले आहेत त्यांचा विचार पुढें येईल. ही बखर शके १७४० त लिहिलेली आहे, असें मागें केसरींत आलेलेंच आहे. शके १७४० म्हणजे सन १८१८. तथापि रा. राजवाडे लिहितात त्याप्रमाणें हींत माहिती जुन्या कागदपत्रांवरून घेतली आहेसें दिसतें.

( ७ ) बडोद्यास छापलेल्या 'श्रीशिवप्रताप' या बखरींत शिवाजीमहाराजांचा जन्मकाळ " शके १५४९ रक्ताक्षी नाम संवत्सर " असा लिहिला आहे. पण शके १५४९ सालीं संवत्सर प्रभव येतो. आणि रक्ताक्षी संवत्सर शके १५४६ सालीं पडतो.

( ८ ) पुरुषोत्तम कविकृत संस्कृत शिवकाव्यांत शिवाजीची जन्मतीथ नाहीं.

( ९ ) काव्येतिहासांत छापलेली 'मराठी साम्राज्याची छोटी बखर' यांत शिवाजी राजाचा जन्मशक 'शके १५४९ क्षयनाम संवत्सरे माहे वैशाख

शुद्ध ५ चंद्रवासरीं' असा लिहिला आहे. पण शके १५४९ त संवत्सराचें नांव प्रभव येतें, क्षय येत नाहीं आणि सोमवारीं उदयास चतुर्थी असून रात्रौ पंचमी लागते.

( १० ) भारतवर्ष यांत शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर छापली आहे. तींत कलम १५ यांत शिवाजी राजे यांचा जन्म शक 'शके १५५९ क्षयनाम संवत्सर वैशाखमास शुद्ध ५ चंद्रवारीं' असा लिहिला आहे. १५५९ ही चूक असावी त्या ठिकाणीं १५४९ पाहिजे. म्हणजे मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरींतील आणि ही तीथ एकच येते. अर्थात् दोहोंवर आक्षेपहि एकच येतात.

( ११ ) भारतवर्षांत छापलेली 'छत्रपतींची वंशावलिबद्धयादी' यांतहि 'शके १५४९ वैशाख शु॥ ५' अशी तिथी दिलेली आहे. पण वार वगैरे घातला नाहीं. तेव्हां पडताळा पाहण्यास जागा नाहीं.

( १२ ) भारतवर्षांत न्यायशास्त्री पंडितराव यांच्या बखरींत शिवाजी राजे यांचा जन्मकाल शके १५४९ प्रभव' एवढाच लिहिला आहे.

( १३ ) भारतवर्षांतील पंत प्रतिनिधींच्या बखरींत शिवाजी राजे यांची जन्मतीथ शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे, वैशाख शु॥ १५ इंदुवार अशी दिली आहे. येथें शु॥ १५ ही हस्तदोषानें शु॥ ५ ऐवजीं पडलेली दिसते. वैशाख शु॥ १५ स चंद्रवारहि येत नाहीं. यावर भारतवर्षकार अशी टीप देतात कीं, "शिवाजीची जन्मतीथ आजपर्यंत वैशाख शुद्ध ५ आणि २ अशी आढळांत आली. या बखरींत १५ आहे व एका यादींत तृतीया आहे. बहुमतानें द्वितीया कायम झालेली आहे." 'व्होटें' घेऊन तीथ कायम करण्याची ही रीत अपूर्व आहे !

( १४ ) काव्येतिहाससंग्रहांत छापलेलें सभासदकृत शिवछत्रपतींचें चरित्र रा. सा. काशिनाथ नारायण साने यांनीं निराळें प्रसिद्ध केलें आहे. त्याचें परिशिष्ट ३ यांत रा. रा. साने यांस उपलब्ध झालेली शिवछत्रपतीची म्हणून एक लग्नकुंडली दिली आहे तीः—




या जन्मकुंडलींत उच्चीचे ग्रह सहा न येतां चारच म्हणजे गुरु, मंगळ, रवी आणि चंद्र इतके येतात. व शुक्र स्वगृहींचा येतो. पण ही कुंडली गणि-

तानें विश्वसनीय मानितां येत नाहीं. कुंडलीमध्यें रवि मेषींचा व चंद्र वृषभींच आहे. तेव्हां महिना वैशाख होऊं शकतो. गुरु कर्कींचा म्हणजे ४ च्या आंक ड्यावर आहे. गणितानें पाहतां वैशाखमासीं कर्कराशीस गुरु शके १५४५ सालीं होता. तेव्हां ह्या कुंडलीवरून शके १५४५ वैशाख शु॥ २ अगर ३ रोजीं दिवसां १० वाजल्यापुढें म्हणजे मिथुन लग्नावर शिवाजी जन्मला असे रवि, चंद्र आणि गुरु यांच्या स्थितीवरून होतें. या सालीं वैशाख शु॥ २ स सोमवार येतो व सूर्योदयानंतर ९।१० घटकांनीं रोहिणी नक्षत्रहि लागते. संव त्सराचें नांव रुधिरोद्गारी येत. म्हणजे रवि, गुरु आणि चंद्र यांची स्थिति खरं मानली तर शिवाजी राजे यांची जन्मतीथ शके १५४५ रुधिरोद्गारी संव त्सरे वैशाख शु॥ २ सोमवार सूर्योदयाद्गत घटी सुमारें १०।११ नक्षत्र रोहिण अशी येते. परंतु १५४५ हा शक कोणच्याही बखरींत दिलेला नाहीं. तेव्ह पत्रिकेंतील गुरु चुकला असावा असें मानणें भाग येतें. या कुंडलीवर दुसर आक्षेप असा आहे कीं, शके १५४५ सालीं गणितानें शनि वृश्चिकेचा न येत कर्कींचाच येतो. आणि राहू सिंहीचा न येता तूळेचा येतो. तात्पर्य, गुरुवरून शवे १५४५ हें साल कायम केले तर पत्रिकेंतील शनि व राहू जमत नाहींत; आणि पत्रिकेंतील राहू किंवा शनि कायम धरला तर गुरु जमत नाहीं. अर्थात् ही कुंडल विश्वसनीय नाहीं. मागाहून कोणी तरी गणितज्योतिष न जाणणारानें रचलं असावी असें दिसते.

## गोषवारा.

वर जे १४ निरनिराळे आधार दिलेले आहेत ते सर्व एकवट करून परीक्ष केल्यास असें आढळून येईल. कीं भूषण कवि, सभासद आणि चित्रगुप्त यांच्य जुन्या ग्रंथांतून शिवाजी राजे यांची जन्मतिथि दिलेली नाहीं. शिवाजी राजे यां समकालीन किंवा ते वारल्यानंतर १०।२० वर्षांचे आत लिहिलेल्या बखरींतू अगर ग्रंथांतून त्यांची जन्मतीथ नसावी हें जरा चमत्कारिक दिसतें. जन्म तिथीचा पहिला उल्लेख रायरीची बखर व चिटणिसांची बखर यांत आढळतो शिवदिग्विजयांत त्याचें स्पष्टीकरण आहे व नक्षत्रहि दिलें आहे. जन्मकुंडल विश्वसनीय धरतां येत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. शिवाय, ती कोणत्या बखरींत दिलेली नाहीं, हेंहि ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. वैशाख मास सर्व दिलेला आहे. त्याबद्दल मतभेद नाहीं. शके कोणी १५४८ देतात, कोणी १५४ देतात. तीथ(२)द्वितीया आणि (५) पंचमी अशी दोन प्रकारे दिलेली आढळते वारही दोन आहेत. गुरुवार आणि चंद्रवार. नक्षत्र एकच ग्रंथांत म्हण श्रीशिवदिग्विजयांत दिलें आहे. आणि तें रोहिणी आहे. सारांश,

( १ ) शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे वैशाख शुद्ध २ गुरुवार; अगर शु॥ ५ चंद्रवार;

( २ ) शके १५४८ क्षयनाम संवत्सरे वैशाख शु॥ २; अगर वैशाख शु॥ ५ चंद्रवार;

या चार तिथींपैकीं कोणती तरी तीथ वरील चौदा आधारांवरून निष्पन्न होते. यांपैकीं कोणती खरी हें पाहण्यापूर्वीं गणित करून कोणत्या तिथीस कोणते वार व नक्षत्र पडतें हे पाहिले पाहिजे. कारण, बहुमतानें निर्णय करण्यापेक्षां रा. रा. राजवाडे यांनीं लिहिल्याप्रमाणें कालनिर्णय करण्याच्या कामीं शक सन महिना तीथ वार नक्षत्र करण इत्यादि जास्त जास्त तपशिलवार माहिती जर कोणीं दिली असेल व ती गणिताने खरी ठरत असेल तर तीच तिथी खरी व विश्वसनीय मानणें अधिक न्याय्य व समंजस आहे. हा तोडगा करण्यापूर्वीं ज्योतिर्गणिताप्रमाणें तीथवार कोणते येतात हें पाहिलें पाहिजे. तें पाहण्यास मुख्य साधन म्हटलें म्हणजे कै० रा. रा. शंकर बाळकृष्ण दीक्षित आणि मि. रॉबर्ट सिवेल या दोघांनीं सन १८९६ सालीं प्रसिद्ध केलेलें ‘ हिंदु पंचांग’ हें पुस्तक होय. या पुस्तकांत इ. स. ३०० पासून इसवी सन १९०० पर्यंत कोणत्या तारखेस कोणता वार, तीथ अगर नक्षत्र होतें हें काढण्याकरितां कोष्टकें दिलेलीं आहेत. याप्रमाणें गणित केलें तर खालीं लिहिल्याप्रमाणें तीथ, वार, शक, सन, नक्षत्र वगैरे गणितरीत्या निष्पन्न होतात. यांत शक धरला आहे तो गत आहे, वर्तमान नव्हे. जसें, शके १५४९ याचा अर्थ आम्हीं शालिवाहन शकाचीं १५४९ गतवर्षे असा करतों. पण दीक्षित यांचे पुस्तकांत यासच १५५० वर्तमान शक असें म्हटलें आहे. यंदांच्या पंचांगांतून शक १८२२ दिला आहे. पण दीक्षित यांचे पुस्तकांत त्याचें गणित १८२३ शकापुढें सांपडेल. हें पुस्तक पाहणारांनीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. असो. या पुस्तकावरून तीथ, वार वगैरे निघतात ते येणेंप्रमाणें:—

१ शके १५४९ प्रभव वैशाख शु॥ २ रोजीं वार शनवार येतो व सूर्योदयीं भरणी नक्षत्राचा चतुर्थ चरण येतो. इंग्रजी ता. ७ एप्रील १६२७ अशी आहे.

२ शके १५४९ प्रभव वैशाख शु॥ ५ रोजीं मंगळवार येऊन उजाडत्या मंगळवारीं आर्द्रा नक्षत्राचा पहिला चरण येतो. परंतु पंचमीस सोमवारीं रात्रींच सुरवात झाली आहे. इंग्रजी ता. १० एप्रील १६२७ अशी येते.

३ शके १५४८ क्षय संवत्सरे वैशाख शु॥ २ स सोमवार येतो. सोमवारीं सूर्योदयीं किंवा किंचित् नतर द्वितीया लागते. नक्षत्र कृत्तिका आहे. पण सोमवारीं मध्य रात्रींच्या सुमारास रोहिणी लागतें. इंग्रजी तारीख १७ एप्रील १६२६ अशी येते.

४ शके १५४८ क्षय वैशाख शु॥ ५ स गुरुवार येतो. नक्षत्र सकाळीं आर्द्रेचा

प्रथम चरण आहे. इंग्रजी ता. २० एप्रील १६२६ अशी येते.

गणितानें ही स्थिति येते. इचा व बखरींतील स्थितीचा मेळ कसा घालावा हाच मुख्य प्रश्न आहे. प्रथमतः सालाचा निकाल केला पाहिजे. म्हणजे शके १५४८ किंवा शके १५४९ याचा निर्णय झाला पाहिजे. तो करण्यास 'बहुमता' खेरीज अन्य प्रमाण म्हटलें म्हणजे शिवाजीची मृत्यूतीथ शके १६०२ चैत्र शु. १५ रविवार व तेव्हां त्यांचें ५३ वर्षांचें वय होते हे लेख होत. मृत्यु-तिथीबद्दल मतभेद नाहीं. त्याचप्रमाणें शिवाजींच्या आयुष्य क्रमांत १२ वर्षे निमुटपणें गृहवास, ३६ वर्षे पुंडाई आणि ५ वर्षे राज्यभोग असेहि अनेक उल्लेख आहेत. बेंगळुरास शाहाजीस भेटण्याला शिवाजी गेला तेव्हां तो १२ वर्षांचा होता असा सभासदांनीं जो उल्लेख केला आहे त्यावरूनहि शके १५४९ च निघतात. शके १५४९ घालून पुढें संवत्सराचें नांव क्षय असें जें कांहीं बखरींत दिलें आहे तें चूक आहे. सारांश, मृत्युतिथीच्या वेळीं बखरींतील शिवा-जींच्या वयासंबंधानें आलेले उल्लेख पाहतां शिवाजी महाराज यांचा जन्म शके १५४९ तच धरावा लागतो. वैशाख महिना सर्वांसच मान्य आहे. तेव्हां शके १५४९ प्रभव वैशाख मास येथपर्यंत जन्मातिथीचा पुष्कळ अंशीं निर्णय झाल्या-सारखाच आहे. आतां शुद्ध २ किंवा ५ एवढ्याचाच निर्णय कर्तव्य आहे. ह्यांत

## शंकास्थान

असें आहे कीं, शुद्ध द्वितीया ( २ ) ही तीथ कायम केल्यास चिटणीसांच्या बखरीप्रमाणें गुरुवार येत नाहीं; आणि वैशाख शु॥ ५ [ १५४९ ] कायम केल्यास सोमवारीं रात्रौ पंचमी पडते खरी, पण सूर्योदयात्री पंचमी मंगळवारीं येते. तथापि, रात्रीं जन्म झाला असें धरल्यास शके १५४९ वैशाख शु॥ ५ सोमवार येथपर्यंत जुळतें, व एवढ्याच वरून रा. रा. राजवाडे यांनीं ही तिथी विश्वसनीय धरली आहे. पण रा. रा. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें "सोमवार सरतां सरतां रोहिणी नक्षत्र" येत नाहीं, मृग नक्षत्र येतें. किंबहुना वैशाख शुद्ध ५ स ( मग ती १५४९ ची धरा अथवा १५४८ ची धरा ) रोहिणी नक्षत्र येण्याचा संभवच नाहीं; असें म्हटलें तरी चालेल. आतां शके १५४८ हा शक खरा मानला तर शुद्ध द्वितियेस सोमवार येऊन मध्यरात्रीस रोहिणी नक्षत्र येतें. पण रोहिणी नक्षत्र ज्यांनीं दिलें आहे त्यांनीं सोमवार न सांगतां गुरुवार सांगितला असल्यामुळें ही तीथ खरी धरतां येत नाहीं. शके १५४८ वैशाख शु॥ ५ रोजीं गुरुवार येतो, पण रोहिणी नक्षत्र येत नाहीं. शिवाय ज्यांनीं रोहिणी नक्षत्र दिलें आहे त्यांनीं प्रभव सवत्सर दिला आहे. तो संव-त्सर १५४९ सालीं पडतो; १५४८ सालीं पडत नाहीं. सारांश, कोणतीहि तीथ घेतली तरी तींत गणित दृष्ट्या कांहींनाकांहीं तरी दोष येतोच. तेव्हां ह्या

## कोड्याचा उलगडा

कसा करावा हा एक मोठाच प्रश्न आहे. तीथ, वार, नक्षत्र ह्या तिहींवरून जर कोणती वेळ कायम होईल तर तीच ग्राह्य मानली पाहिजे. पण तीथ आहे तर वार नाहीं आणि वार आहे तर नक्षत्र नाहीं आणि तीथवार जुळलीं तर साल जुळत नाहीं अशी स्थिति हल्लीं उत्पन्न झालेल्या लेखांवरून निष्पन्न होते. तेव्हां ह्याचा निर्णय करण्यास बखरींतील जन्मतिथीस मूळ आधारभूत म्हणून जे दाखले दिले आहेत त्यांचा आमच्या मतें प्रथमतः सूक्ष्म विचार केला पाहिजे. शकानुक्रमानें पाहिलें म्हणजे जन्मतिथीबद्दल तपशीलवार माहिती चिटणीसांच्या बखरींतच प्रथमत: मिळते. परंतु 'श्रीशिवदिग्विजय' या बखरींत दिलेले जन्मतिथीचे तीन श्लोक हे त्याहूनहि जुने असावेत असें वाटतें. निदान मल्हारराव चिटणीस ह्यांनीं दिलेली आणि या श्लोकांत सांगितलेली तीथ व वार एकच आहेत. तेव्हां चिटणीसांच्या गद्यापेक्षां शिवदिग्विजयांतील पद्यें पुराव्यास अधिक मातबरीचीं धरलीं पाहिजेत. कारण गद्यांत जितका लौकर फेरफार करतां येतो तितका पद्यांत करतां येत नाहीं. हे श्लोक येणेंप्रमाणें—

अब्दे वै प्रभवाभिधे नरपते शालिप्रवाहात्परम् ।
शाके वेदनवाधिकेंदुशरके मासे च सन्माधवे ॥
नक्षत्रे च तिथौ विधौ गुरु दिने पक्षे सिते शाहजे: ।
जातो नाम शिवाजिको नरवरो यो वै हुतांशो हिते ॥
प्रभवाब्दीं गुरुवासरीं च जहला वैशाख शुक्लीं बिजीं ।
शल्की ( शाकी ? ) सोमपतत्रिवेदानिधिच्या नक्षत्र तें रोहिणी ॥
ज्याच्या ( तीव्र ) प्रतापसूर्यकिरणें शत्रुतमा नासुनी ।
शिव्नेरीस ( सु ) भूपसूर्य उदयो उद्युक्त सद्रक्षणीं ॥

शिवाजिवर्मा नृपतिर्बभूव
विशाखमासे सितपक्षमध्ये ।
गुरौ द्वितीया विधिभान्विते हि
नागाब्द ( ब्धि ? ) नूनं शशिबाणवर्षे ॥

हे श्लोक अशुद्ध आहेत; पण त्यांतील कालवाचक पदें संदिग्ध नाहींत हें एक सुदैवच समजलें पाहिजे. या तीन श्लोकांत पहिला श्लोक मूळ असून दुसरे दोन त्याच्याच आधारें केलेले दिसतात. तिहींमध्यें शालिवाहन वर्ष एकच म्हणजे १५४९ आहे; व संवत्सर प्रभव आणि मास वैशाख आहे. वारहि गुरुवारच आहे. पहिल्या श्लोकांत 'वेद नवाधिकेंदु शरके' याचा अर्थ वेद=४, नव=९ अधिक इंदु=१ आणि शर=५, म्हणजे १५ वर ४९ म्हणजे १५४९ असा आहे.

" अंकानां वामतो गतिः " हा नियम या किंवा पुढील दोन्ही श्लोकांत स्वीकारलेला नाहीं. दुसऱ्या श्लोकांत 'सोमपतत्रिवेदनिधि' याचा अर्थ सोम=१, पतत्रि म्हणजे बाण=५, वेद=४, निधि=९ म्हणजे १५४९ असाच आहे. त्याचप्रमाणें तिसऱ्या श्लोकांत 'नागाब्धि' म्हणजे ४९ आणि शशिबाण म्हणजे १५, अर्थात् १५४९शक असेंच आहे.तात्पर्य,तिन्ही श्लोकांत १५४९शक एकसारखाच आहे. प्रभव संवत्सर, वैशाख मास, शुक्लपक्ष आणि गुरुवार हेंहि तिन्ही श्लोकांत एकच आहे. म्हणजे " शके १५४९, प्रभव संवत्सर, वैशाख मास, शुक्लपक्ष गुरुवार " येथपर्यंत तिन्ही श्लोकांची एकवाक्यता आहे. आतां तिथी आणि नक्षत्र यांचा विचार करावयाचा. नक्षत्र या तीन श्लोकांखेरीज अन्यत्र कोठेंहि श्लोकांत किंवा बखरींत दिलेलें नाहीं. हें वर दिलेल्या आधारांवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. तेव्हां नक्षत्रावरून तिथीचा विचार कर्तव्य असल्यास या तीन श्लोकांखेरीज दुसरा कोणताहि जुना आधार नाहीं हें सिद्ध आहे. पहिल्या श्लोकांत 'नक्षत्रे च तिथौ विधौ' अशा प्रकारे तीथ व नक्षत्र सांगितलें आहे. आणि दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकांत नक्षत्र रोहिणी आणि तीथ द्वितीया असें स्पष्ट आहे. म्हणजे " नक्षत्रे च तिथौ विधौ " या पदांचा अर्थ " रोहिणी नक्षत्र आणि द्वितीया तीथ " असा पुढील दोन श्लोक करणारांनीं केला आहे. " विधौ " या पदाचे संस्कृतांत दोन अर्थ होतात. " विधि " म्हणजे ब्रह्मदेव या शब्दाची सप्तमी विधौ अशी होते; आणि 'विधु' म्हणजे चंद्र या शब्दाची सप्तमीहि " विधौ " अशीच होते. काव्यप्रकाशांतील 'यामि विधावभ्युदिते' हा इकारान्त व उकारान्त ( विधि व विधु ) शब्दाचा श्लेष सर्वप्रसिद्ध आहे. या श्लेषाप्रमाणें पाहिले तर पहिल्या श्लोकातील " विधौ" या पदाचे दोन अर्थ संभवतात; एक 'विधि' म्हणजे 'प्रजापतिः' आणि त्याची तीथ व नक्षत्र म्हणजे द्वितीया व रोहिणी. कारण, द्वितीयेची देवता प्रजापति आणि रोहिणीची ही देवता प्रजापति आहे. 'नक्षत्रे च तिथौ विधौ' या श्लोकाचा याप्रमाणें अर्थ केल्यास (२ ऱ्या व ३ ऱ्या श्लोकांत असाच केला आहे ) शिवाजी राजे यांची जन्मतीथ " शके १५४९ प्रभव संवत्सर, वैशाख शु. २, गुरुवार, रोहिणी " अशी निघते. चिटणीसांनीं नक्षत्राखेरीज हीच तिथी दिली आहे. पण गणितानें शुद्ध द्वितीयेस शनवार येतो व नक्षत्रही भरणी येतें. तेव्हां गणितदृष्ट्या हा अर्थ बरोबर बसत नाहीं. त्यामुळें दुसरा कोणता तरी अर्थ लावणें भाग आहे.: 'विधौ' या शब्दाचे दोन अर्थ होऊं शकतात हें वर सांगितलेंच आहे. 'विधौ' ही 'विधु' याची सप्तमी मानल्यास " नक्षत्रे च तिथौ विधौ " याचा अर्थ " नक्षत्र आणि तीथ विधु=१ " असा होतो, म्हणजे पहिलें नक्षत्र आणि पहिली तीथ अथवा 'प्रतिपदा व आश्विनी नक्षत्र' असा अर्थ निघतो. विधु, इंदु, सोम, चंद्र हीं पदें एक ( १ ) या संख्येबद्दल घालण्याची नेहमींचीच वहिवाट आहे. वरील

तीन श्लोकांत इंदु, सोम, आणि शशि हे १ या अर्थी वापरलेले आहेत. तेव्हां 'विधौ' हा शब्द विधु शब्दाची सप्तमी म्हणूनच वापरला असावा हे अनुमान अधिक दृढ होतें. असा अर्थ केला म्हणजे शिवाजी राजे यांची जन्मतीथ " शक १५४९ प्रभव संवत्सर वैशाख मास शु. १ गुरुवार, अश्विनी नक्षत्र " अशी निघते. आतां गणिताप्रमाणे पाहिलें तर प्रतिपदेस अश्विनी नक्षत्र व शुक्रवार येतो. पण प्रतिपदा शुक्रवारीं सूर्योदय होण्यापूर्वीच सुमारे ५ तास किंवा १२ घटका लागते. आमच्याकडे वार सूर्योदयापासून सूर्योदयापर्यंत मोजतात. त्या मानानें पाहिलें म्हणजे गुरुवारीं उत्तर रात्रीं प्रतिपदाच तीथ येते. तात्पर्य, शके १५४९ वैशाखांत गुरुवारीं उत्तर रात्रीं अथवा उजाडत्या शुक्रवारीं पहांटेस शिवाजी राजे यांचा जन्म झाला असें मानलें तर जन्मतीथ " वैशाख शु. १ गुरुवार, अश्विनी नक्षत्र " अशी येते. ' नक्षत्रे च तिथौ विधौ' यांत " विधौ " ही ' विधु ' शब्दाची सप्तमी मानल्यास हाच अर्थ निघतो व गणितानें तो बरोबर ठरतो; करितां हाच अर्थ ग्राह्य आहे असें मानावें लागतें.

सारांश " नक्षत्रे च तिथौ विधौ " या पहिल्या श्लोकांतील पदाचे दोन अर्थ होऊं शकतात. [ १ ] वैशाख शुद्ध २, गुरुवार, रोहिणी; [ २ ] वैशाख शुद्ध १, गुरुवार, अश्विनी. पैकीं पहिला अर्थ स्वीकारल्यास गणित बरोबर जुळत नाहीं. दुसरा घेतल्यावर बरोबर जुळते म्हणून दुसराच अर्थ घ्यावा लागतो. यावर कोणी अशी शंका घेतील कीं " तुम्ही पहिल्या श्लोकाचा अर्थ केला, पण दुसऱ्या आणि तिसऱ्या श्लोकांत जर वरील दोन अर्थांपैकीं पहिला अर्थ स्वीकारला तर पहिल्या श्लोकाचाच त्याहून निराळा असा दुसरा अर्थ कां करावा ? " शंका बरोबर आहे. परंतु त्यास उत्तर एवढेंच आहे कीं, ' विधौ ' याचे जर दोन अर्थ संभवतात तर त्यांतला गणितासिद्ध अर्थ घेणेंच जरूर आहे. शिवाय वर शिवदिग्विजयांतून घेतलेले हे तिन्ही श्लोक एकदम केलेले असतील असे मुळींच संभवत नाहीं. कारण, एकच अर्थ व्यक्त करण्याकरितां एकच मनुष्य एका कालीं तीन श्लोक तयार करील हें संभवत नाहीं. तेव्हां या तिहीं-पैकीं कोणता तरी एक श्लोक जुना व दोन श्लोक मागाहून कोणीतरी केलेले असावेत असें मानावें लागतें. शिवदिग्विजयांत "नक्षत्रे च तिथौ विधौ" हीं पदें असलेला श्लोक ज्या अर्थीं पहिल्यानें दिला आहे त्या अर्थीं तोच जुना असावा असें अनुमान करण्यास जागा आहे. शिवाय तिसऱ्या श्लोकात 'विधिभान्वित' म्हणजे ' विधि ' किंवा प्रजापतीचें भ म्हणजे, नक्षत्र असा जो उल्लेख आहे तो पहिल्या श्लोकांतील ' विधौ ' हें पद विधि या शब्दाची सप्तमी मानून तदनुसार केला आहे असें सहज दिसतें. तेव्हां यावरूनहि पहिला श्लोक मूळचा आणि दुसरे दोन त्याचा एक प्रकारचा अर्थ मनांत आणून मागाहून केलेले, असें अनुमान होतें. शिवाजीचें जन्मनक्षत्र दुसऱ्या कोणींहि दिलेले नाहीं तेव्हां

नक्षत्रावरून जन्मतीथ कायम करण्यास दुसरें कोणतेंच साधन नाहीं हें वर सांगितलेंच आहे.

## उपसंहार.

वरील सर्व विवेचनावरून असा निर्णय निघतो कीं, शिवाजी महाराजांच्या पश्चात् कांहीं दिवसपर्यंत म्हणजे सभासदी बखरीपर्यंत त्यांची नक्की जन्मतीथ कोणीं दिलेली अद्याप उपलब्ध झालेली नाहीं. " नक्षत्रे च तिथौ विधौ " हा ज्या श्लोकांत पाठ आहे तो प्रायः जुना असावा. याचे दोन अर्थ होऊं शकतात, पैकीं " शुद्ध द्वितीया, गुरुवार, रोहिणी " हाच अर्थ मल्हारराव चिटणीसाचे वेळीं म्हणजे शिवाजीचे उत्तर सुमारें १२५ वर्षांनंतर प्रचारांत होता; व पुढें बखरकारांनीं प्रायः तोच अर्थ घेऊन आपआपल्या बखरींत ग्रथित केला असावा. हा अर्थ गणितास जुळत नाहीं इकडे त्यांचें लक्ष न जाणें अगदीं स्वाभाविक आहे. कारण १०० किंवा १५० वर्षांपूर्वीचें तिथ्यादि गणित फारच थोड्या लोकांस अवगत असतें; व तितका शोध करण्याचीहि लोकांची प्रवृत्ति नसते. सुदैवानें आपल्या नजरेस जर ही चूक आज आली आहे तर सर्व पुराव्याचा विचार करून सर्वांस मूळ आधारभूत दस्तऐवज कोणता हें पाहून त्यावरून आपणास अर्थनिर्णय केला पाहिजे. तसा अर्थनिर्णय करावयास लागलें म्हणजे " नक्षत्रे च तिथौ विधौ " याचा दुसरा अर्थ म्हणजे तिथी शुद्ध १ व नक्षत्र अश्विनी किंवा तीथ पहिली आणि नक्षत्र पहिलें हा सहज लक्षांत येतो. आणि गणित करून पाहिलें तर तिथी, वार व नक्षत्र यांचा सुरेख मेळ बसतो. गणिताचा आणि या अर्थाचा मेळ काकतालीय न्यायानें होत असेल हें म्हणणे बरोबर नाहीं. करितां हल्लीं जो पुरावा उपलब्ध आहे त्या सर्वांचा विचार करितां शिवाजी महाराजांची जन्मतीथ

शके १५४९ प्रभव, वैशाख शुद्ध प्रतिपदा, गुरुवार उत्तररात्र
आश्विनी नक्षत्र, ता. ६ माहे एप्रील सन १६२७

हीच साधार आहे असें मानावें लागतें. गणिताचे कसोटीस दुसरी कोणतीही तिथि उतरत नाहीं. "विधौ" याचा अर्थ निराळा करावा लागतो. पण मग गणित सर्व जुळतें हा मुद्दा अत्यंत महत्त्वाचा आहे. चिटणीसांची व इतर बखरकारांची चूक कशी व कां झाली असावी याचें कारण वर सांगितलच आहे. इंग्रजी पद्धतीप्रमाणें वारास मध्यरात्रीस सुरवात होतें; करितां गुरुवार उत्तररात्र म्हणजे इंग्रजी पद्धतीनें शुक्रवार धरून वर इंग्रजी तारीख ६ एप्रील दिली आहे. सुमारें २७५ वर्षांपूर्वीं जन्मलेल्या शिवाजी महाराजांच्या जन्मतिथीबद्दल जुन्या ग्रंथांतून इतका घोंटाळा असावा हें जरा चमत्कारिक तर खरेंच; पण नेपोलियनचा पराभव करणारा प्रसिद्ध इंग्रजी योद्धा व मुत्सद्दी ड्यूक ऑफ वेलिंग्टन

याची जन्मतारीखहि अशीच अद्याप अनिश्चित आहे. हें लक्षांत आणलें म्हणजे याबद्दल फारसें आश्चर्य वाटणार नाहीं. कोणीही पुरुष जन्मते वेळींच तो पुढें मोठा होणार हें समजत नसतें. त्यांतून जिजाबाईसारखी नावडती बायको धामधुमीच्या प्रसंगीं शिवनेरीस प्रसूत झाली. तेव्हां तेथें जन्मलेल्या मुलाची जन्मवेळा कदाचित् काळजीनें तेव्हांचे तेव्हांच कोणीं टिपून ठेवली नसेल. कसेंही असो. जन्मतिथीबद्दल उपलब्ध असलेल्या कागदपत्रांतून पाहतां बराच घोंटाळा आहे. याचा निर्णय लावण्याचा आमच्या बुद्धीप्रमाणें आम्हीं प्रयत्न केलेला आहे. पण याशिवाय जुन्या कागदपत्रांच्या आधारानें कोणास कांहीं म्हणणें असल्यास तें आम्ही मोठ्या आनंदानें प्रसिद्ध करूं.

( अग्रलेख )

## श्रीशिवजयंत्युत्सव.

सालाबादप्रमाणें श्रीशिवजयंत्युत्सव वैशाख शु. २स व्हावयाचा तो यंदा प्रतिपदेस म्हणजे येत्या सोमवारीं होणार. याचें एक कारण दुसरीकडे " श्रीशिवाजी महाराजांची जन्मतिथी " या मथळ्याखालीं दिलेल्या स्वतंत्र लेखावरून वाचकांचे लक्षांत येईलच. केवळ शिवाजी महाराजांच्या प्रिय व पवित्र स्मरणार्थ म्हणून जो उत्सव करावयाचा तो वास्तविकपणें कोणत्याही तिथीस केला तरी सारखाच. तथापि एकाद्याचा जयन्त्युत्सव म्हणून करणें झाल्यास तो होतां होईतों पंचांगदृष्ट्या बरोबर ज्या तिथीस त्याचा जन्म झाला त्याच तिथीस केला पाहिजे. आजच्या अंकांत उपस्थित केलेल्या वादाचा निकाल लागण्यास आणखी थोडा काळ गेला पाहिजे. परंतु सोमवारीं प्रतिपदा थोडी व द्वितीया जास्त असल्यामुळें अनायासानेंच जयंत्युत्सव प्रतिपदेस होणार. इत्यादि.

---

# जेधे यांची शकावली.

१ पुढील शकावलीची वही रा. रा. दयाजीराव सर्जेराव ऊर्फ दाजीसाहेब जेधे देशमूख, इसाफतदार मौजे कारी, संस्थान भोर यांजकडून मजकडे सुमारें ९।१० वर्षांखालीं आली. त्या वेळचे कांहीं महत्त्वाच्या कामांतील मनोव्यग्रतेमुळें, इतर कागदांबरोबर ती जी एकदां गैरविल्हेस लागली ती मालकानें सहा महिन्यांपूर्वी तिची मागणी करीपर्यंत तशीच पडून राहिली होती. ती शोधून काढल्यानंतर, तिची नकल करून घेऊन मूळ वही मालकांकडे परत केली, व नकल आपले मंडळाकडे तपासून घेण्याकरितां ठेविली. आपले अध्यक्ष, चिटणीस व संशोधक रा. पां. न. पटवर्धन यांनीं तिची चांचणी केली असून, त्यांतील कांहीं मित्त्या गणितदृष्टीनें तपासून पाहिल्या आहेत.

२ ही वही उभ्या व अरुंद अशा पोर्तुगीज कागदावर लिहिली आहे. तिचीं पाठपोट बावीस पानें असून, तेविसावें पान अर्धेच लिहिलेलें आहे. हींत शके १५४० ते शके १६१९ पावेतोंची सालवार हकीकत कमजास्त तपशिलानें दिलेली आहे. मूळ वही तपासून पाहिल्यानंतर अगर वाचल्यानंतर, तींत कोणीं तरी बरेच ठिकाणीं शोध केले आहेत, कांहीं ठिकाणीं बोजड रीतीनें अक्षरें चिताड करून गिरविलीं आहेत.

३ मंडळाचे सुप्रसिद्ध संशोधक रा. वि का. राजवाडे यांनीं म. इ. सा. खंड १८, लेखांक ५ मध्यें एका त्रुटित शकावलीचीं कांहीं पानें छापिलीं आहेत. त्यांतील शक १५५४, १५७८, १५८६, १५८८, व १५९२ या सालांतील हकीकत या वहींतील त्याच सालांतील दिलेल्या हकीकतीशीं लावून पाहतां असें निश्चयानें म्हणतां येतें कीं, या दोन्ही शकावलींचें मूळ एकच असावें. भाषेच्या दृष्टीनें रा. राजवाड्यांची शकावली जुनी आहे. प्रस्तुतची वही शेंदीडशें वर्षांपूर्वी लिहिली गेली असावी असें या वहींतील ख, सा, स वगैरे अक्षरांचे वळणावरून म्हणण्यास हरकत नाहीं. दोन्ही शकावलींत जो भेद-म्हणजे तपशिलाचें आधिक्य आहे त्यावरून असें बिनधोक म्हणतां येतें कीं, जेधे यांची सालोसाल उपलब्ध झालेली माहिती शकावलींत त्या त्या सालाखालीं नमूद करून, या वहीचे लेखकानें ही शकावली सजविली आहे, व ती जेधे देशमुखासाठींच केली असावी.

( १ ) शिवछत्रपतींचा जन्मकाल या शकावलींत शके १५५१ फाल्गुन वद्य ३ शुक्रवार असा दिला आहे. ही बाब खरोखर चमत्कारिक आहे. सुमारें १६ वर्षांपूर्वीं, या बाबीची बरचि भवति न भवति होऊन, छत्रपतींची जन्मतिथि शके १५४९, प्रभव, वैशाख शु, १ गुरुवार, उत्तररात्र, अश्विनी नक्षत्र, ता. ६ एप्रिल सन १६२७ ( old style ) असल्याबद्दल मीं ठरविलें होतें ( पहा,

केसरी वर्ष २०, अंक १७, ता. २४।४।१९०० ). प्रसिद्ध व अप्रसिद्ध बखरींत या जन्मतिथीबद्दल अत्यंत विसंगतता आहे; सबब या बाबीचा जितका जास्त खल होईल तितका पाहिजेच आहे.

( २ ) शक १५७१ तील थोरले शहाजी महाराज व जेधे देशमुख यांचे दरम्यान शपथपूर्वक झालेल्या करारमदारांसंबंधींचे उल्लेखावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, दादाजी कोंडदेव व शिवाजी महाराज यांनीं पुणें प्रांतांत रचूं घातलेल्या व्यूहास व धोरणास शहाजींची पूर्ण अनुमति होती. कदाचित् शहाजी महाराजांची ही मसलत असावी.

( ३ ) या शकावलींत अफजलखानाचे वधाचा प्रसंग बराच खुलासेवार दिलेला आहे, व तो देतांना अखेरीस

॥ हनुमंत अंगद रघुनाथाला ॥
॥ जेधे बादल शिवाजीला ॥

असा एका पोवाड्यांतील चरणाचा उल्लेख केला आहे. हा उल्लेख कोणते पोंवाड्यांतील आहे हें कळत नाहीं.

( ४ ) शिवाजीमहाराज व औरंगजेब यांची भेट आग्र्यास झाली–दिल्लीस नव्हे–असें या शकावलींत स्पष्ट म्हटलें आहे. या उल्लेखावरून रा. राजवाडे यांच्या म. इ. सा. खंड ८, ले. २३ मधील उल्लेखाची संगति लागते. इकडील बखरींतून दिल्लीस भेट झाल्याचे जे उल्लेख आहेत त्यांचा अर्थ इतका घ्यावयाचा कीं, ही भेट स्थूल मानानें मोगलाचे राजधानींत म्हणजे दिल्लीस झाली. भेटीसंबंधानें या शकावलींत दिलेले स्थानाचा मुसलमानी तवारिखांतील हकीकतीशीं उत्तम मेळ आहे.

( ५ ) कारंजाचे स्वारीचा बखरींतून उल्लेख आहे. परतु स्वारीचें साल वगैरे या शकावलींत पहिल्यानेंच आढळतें.

( ६ ) नेताजी पालकर सरनोबत यांस शद्ध करून घेतल्याचा उल्लेख या शकावलींत शके १५९८ त आलेला आहे. इकडील बखरींत नेताजीचे धर्मांतराचा उल्लेख नाहीं. ‘ मआसिर--इ-- आलमगिरी ’ या मुसलमानी तवारिखेंत मात्र यासंबंधानें निर्देश असून, ता. १ शवाल १०७७ हिजरी ( ता. २७ मार्च १६६७ ) रोजीं नेताजीची सुंता झाली असें तींत स्पष्ट लिहिलेलें आहे. नेताजचें नांव मुर्शिदकुलीखान ठेवण्यांत आलें असेंहि वरील तवारिखेत आढळतें. शिवाजीमहाराजांवर आग्रा येथे आलेल्या प्रसंगाशीं या धर्मांतराचा संबंध येत नाहीं. बळजबरीनें बाटविले जाण्याचा नेताजीवरील प्रसंग अलग आहे.

**बा० गं० टिळक.**

---

## श्रीगजवदनवरद

श्री शके १५४० कालयुक्त नाम संवछरे कार्तिक वद्य प्रतिपदा औरंगजेब उपजला

### शके १५४६ रक्ताक्षी संवछरें

कार्तिक मासी भातवडीस मोगलाचा सुभेदार लस्कररवान व येदीलशाही मुला महमद यैसी दोन कटके मलीक आबरे बुडविली १

मलिक अबरे सोलापुरास वेढा घालून विज्यापुरकरापासून घेतले १

शके १५४७ क्रोधननामसंवछरी जहागीर पातशाहावरी त्याचा लेक सुलतान खुरूम रुसोन निजामशाही मध्ये गेला त्यास निजामशाहामध्यें मलिक अबरे ठाव दिल्हा १

शके १५४८ क्षयनाम संवछरे वैशाख मासी मलिक आबर परलोकास गेला १

शके १५५० विभवनाम संवछरे सुलतान खुरुम पातशाहीस दिलीस बैसला नाव शाहाजाहा ठेविले १

ये वर्षीं कार्तिक मासी कृष्ण पक्षी पंचमी गुरुवासरी नक्षत्र पुष्य राजश्री कान्होजी नाईक जेधे यांची पहिली स्त्री पासलकराची लेकी सावित्रीबाई होती तिचे पोटी बाजी नाा पुत्र जन्मला माहानक्षत्र अनुराधा दक्षणायेन

### शके १५५१ शुक्ल संवत्सरें

फालगुण वद्य त्रितीया शुक्रवार नक्षत्र हास्त घटी १८ पळे ३१ गड ५ पळें ७ ये दिवसी राजश्री सिवाजी राजे सिवनेरीस उपजले १

श्रावणे पुर्णिमेस लुखजी जाधवराव नीजीमशाहानी मारिले १

चैत्रमासी इभराम इदिलशाहा परलोकास गेला सुलन महमद शाहा तख्ती बैसले खवासखान प्रधान जाला मुरार जगदेराव कारभारी जाला १

### शके १५५२ प्रमोद संवछरें

येवर्षी दुकाल पडिला

पौश वद्य येकादसी फत्तेखानास सोडून मज्यालस दिल्ही १

शके १५५३ प्रजापति संवछरे फत्तेखानें बुऱ्हान निजामशाहा मारिला १

### शके १५५४ अगिरा सवछर

जेष्ट काजी महबतखानें वेढा घालून दौलताबाद घेतली १

भाद्रपद मासी शाहाजी राजें याणी पेमागिरीस निजाम शाहावरी छत्र धरिले १

( पान २ )

शके १५५७ युव संवछरें शाहाजी राजे माहुलीस गेलें तेथें रणदुलाखान इदिलशाही व खान जमा मोगलाचा सुभा जाऊन वेढा घालून निजामशाहा हाती घेतला शाहाजी राजे इदिलशाही चाकर जालें ते समई रणदुलाखानाने कान्होजी जेधें नेले होतें तेथें माहाराजाची भेटी जाली १

शके १५५८ धाता संवछरें ताा शके १५६१ प्रमाथी संवछर ये संवछंरी बसवापटाण इदिलशाहानी घेतले १

शके १५६५ सुभान संवछंरी बहादुरशाहा उपजले नाव शाहाअलम ठेविले १

शके १५७० सर्वधारी नाम संवछरी श्रावण वद्य प्रतिपदा शाहाजी राजे मुस्तफाखाने धरिले नजीक चंदी त्याजबाा कान्होजी नाईक जेधें व दादाजी कृष्ण होते त्यास कनकगिरीस अटकेत ठेंविले तें समई दादाजी पंतासचा पुत्र रत्नाजीपंत कनकगिरीस मृत्य पावले १

शके १५७१ विरोधी संवछर जेष्ट शुध पुर्णिमा शाहाजी राजे कोंढाणास दे(घे?) ऊन सोडिले ते समई कान्होजी नाईक जेधें व दादाजी कृष्ण लोहकरे यांस सोडिले माहाराजाची व त्यांची भेटी जाली तें समई माहाराज बोलिले की तुम्हीं अम्हामुले बंदखानी श्रमी जालेस यांउपरी आम्हीं पातशाहासी तह केला कीं बारा गावातून मजुरा करून हुकुम प्रमाणें कर्नाटक प्रांते मसलत करावी त्यावरून बेंगरूल प्रांत पांचा लक्षा होनाचा जाहागीर दिल्हा आहे यांकरिता आपणास कर्नाटकची मसलत करावी लागली तुमचे वतन मावळात आहे चिरंजीव राजश्री सिउबा खंडेबारियांत व पुणा अहेत त्याजवल तुम्हीं जमावानसी राहावें तुमची जबरदस्ती त्यां प्रांते अहे अवघें मावळचे देशमुख देखील त्यासी रुजु होऊन त्यांचें आज्ञेत वर्तेत यैसा विचार करून जबरदस्तीने राहावे येखादी मोगलाईकडील फौज व इदिलशाहीकडील फौज आली तरी आपण इमान राखाव त्यांसी लढाई

( पान ३ )

करावी यैसी शफत इमानपुरस्कर बेल रोटीवर हात ठेऊन घेतली तैसीच त्याणी हि कान्होजी नाइकांस शेपत दिल्ही अणी कान्होजी नाईक यांस व दादाजी कृष्ण यांस वस्त्र देऊन बराबर हुजऱ्या व पत्रे देऊन राजश्री सिवजी राज यांजकडे पाठविले १

शके १५७६ जये संवछरी संभाजी राजे यांस उमाजी राजे पुत्र जाले कार्तिक वद्य द्वादसीस उपजले १

शके १५७७ मन्मथ संवछरी राजश्री सिवजी राजे याणी पौष चतुर्दसीस

जाऊन जावली घेतली ते समई कान्होजी जेधे देशमुख व बांदल व सिलिंबकर यांचा जमाव व मावलच्या देशमुखांचा जमाव बराबर घेऊन जमावाच्या बळे युद्ध करून जाउली घेतली १

शके १५७८ दुर्मुख संवछर

वैशाखमासी राजश्री सिवजी राजे याणी रायरी घेतली समागमे कान्होजी जेधे देशमुख ता। भोर व बादल व सिलिबकर देशमुख व मावळचा जमाव होता हैबतराउ व बालाजी नाइक सिलिबकर याणी मध्यस्ती करून चंदरराउ किलिया खाली उतरले त्यावरी दुसरा सिक्का हैबतराउ सिलिबकर यांस दिल्हा अणि भावाभावाच्या वांटणीया केल्या १

मार्गसीर्ष मासी सुलतान महमद इदिलशाहा मृत्य पावले १

अस्वीन वद्य पक्षी राज्यानी सुपे घेतले संभाजी मोहिते धरिले १

माघ शुध पक्षी गायेकवाडासी सोयरीक केली सखवारबाईचे लग्न जाले १

शके १५७९ हेमलंबी संवछर

चैत्र वद्य येकादसी रविवारी घटी ८ अंवरंगजेबाने अदलशाहापासून बेदर ध्यावयाचा तह केला अणी बेदरास अले अशाढ शुध त्रितीया गुरुवारी बेदर घेतले १

वैशाख शुध पंचेमीस जाधवरायासी सोयरीक केली १

जेष्ट मासी नौसीरखान यासी युध्य अमदानगरी राजश्री सिवजी राजे याणी केले १

कार्तीक शुध पोर्णिमेस खान महमद बडे साहेबिणीने मारिला १

पौषमासी औरंगजब दिलीवर चालले १

वैशाख शुध द्वादसीस इंगलियाची सोयरीक केली १

वैशाख मासीं जुनर लुटले १

जेष्ट शुध द्वादसीस राजश्री सिवजी राजे यास संभाजी राजे पुत्र जाले पुरंधेरी उपजले १

अश्वीन वद्य द्वादसीस कल्याण भिवडी राजयानी घेतली ते समई लस्कर व हाशम दादाजी बापुजीस सुभा सांगोन रवाना केले तेव्हा कान्होजी नाईक जेधे याजपासून दादाजी कृष्ण लोहकरे त्यांचे भाऊ सखो कृष्ण लोहकरे

( पान ४ )

शके १५७९ हेमलंबी संवछर

यांस मागोन घेतले आणि दादाजी पंत यांस कल्याणचा नामजाद हवाला व सखोपंतास भिवडीचा हवाला

सागितला येसीजी गोपनाथ यांणी आपले भाऊ कान्होजी नाईक जेधे यां कडील कारभार अम्ही करीत होतो तैसाच करावा म्हणून हाती दिल्हें १

शके १५८० विलंबी संवछर पौष मासी फतेखान विजापुरी विश देऊन मारिले व श्रावण मांसी बहलोलखान मारिला भाद्रपद शुध १३ सोनाजीपंतास दिलीस रवाना केलें वस्त्रें दिल्ही १

शके १५८१ विकारी संवछर

औरंगजब तख्ती बैसला १

वैशाख मासी अदलशाहा पातशाहा यांचे फरमान मावळच्या देशमुखास आले की अफजळखानास सामील होणे त्यांस केदारजी खापडे अफजल खानाजवळ होते खंडोजी बिन धर्मोजी खोपडे देशमुख ता। उत्रोली हे अफ जलखानाकडें गेले १

कान्होजी नाईक जेधें यास मावळ च्या देशमुखाबराबरी फरमान आला होता तो घेऊन व आपलें पांच जण पुत्र घेऊन राजश्री स्वामीच्या दर्श- नास राजगडास गेलें राजश्री स्वामीस परवाना दाखविला तेव्हा राजश्री स्वामी बोलिलें की तुमचें सेंजारी केंदारजी व खडोजी खोपडे देशमुख ता। उत्रोली हे अफजलखानाकडें गेलें तुम्हीं पातशाहाई हुकूम मोडून राहिले म्हणजे वतनास अपाये होईल जिवा- वरी गोष्ट येऊन संकट पडलें याक- रिता तुम्हींहि जाणें त्यावरी कान्होजी ना। बोलिले की माहराजानी आपली क्रिया घेऊन तुमचें हाती दिल्ही तेच क्रिया व इमान आपला शाबूत आहे वतन साहेबाच्या पायावरी ठेविले

श्रावण शुध २ सिवाजी राजे जाउ- लीस आले भाद्रपद वद्य चतुर्दसीस सिवाजी राजे यांचें स्त्री सईबाईस देवआज्ञा जाली १

कार्तिक मासी अफजलखानानें प्रता- पगडास कृष्णराव हजीब राजश्री स्वामीकडें पाठविला त्यांस वस्त्रे दे- ऊन प्रतापगडाखाली भेटी व्हावी हा निश्चये करून माघारे पाठविलें तेव्हां अत:स्तें विचार कान्होजी जेधे व सरकारकून बैसोन राजश्री स्वा- मीनी विचार केला की मुसलमान बेमान अहे बादलाचा जमाव जाउ- लीस व पराच्या रानात राहाणें कदा श्चित भेटीचे समई त्यांणे बेइमानी केली तरी त्यांचे लस्कर पारात आहे तें डोंगरास चढु न दणें अणी निव- डक माणुस घेऊन अपली मदत करणें कदाश्चित श्री अंबेच्या वरदे अफज- लखान मृत्य पावला तरी इशारतीचें अवाज गडावरी होतील तेव्हां पारा- वरी चालून घेऊन अगदी लस्कर बुडवणें हैबतराऊ व बाळाजी ना। सिलिबकर जमावानिसीं बोचेघोली- चे घाटी ठेविलें आहेत तें घाट

आपण व आपले (लें) क साहेबापुढे स-
खस्त होऊन तेव्हां जे होणें तें होईल

लस्करास चढूं देणार नाहीत यैसा
अतःस्ते विचार जाला आणि बंदो-
बस्ती केली १

मार्गेसीर्ष मासी शुध पक्षी सप्तमी
गुरुवारी प्रतापगडाचे माचीस अफ-
जलखान

( पान ५ )

शके १५८१ विकारी मार्गसीर्ष मास

कान्होजी ना॥ यैसें बोलोन शफत
केली त्यावरी राजश्री स्वामी बोलिलें की
हातावरी पाणी घेऊन वतनास घालणें
आज्ञेप्रमाणें वतनास हतावरी पाणी
घेऊन सोडिले तेव्हा बोलिलें की
अपला कबिला कारीस आहे तो
तळेगावाकडे घेऊन जाणें ते समई
दादाजी कृष्ण यांस कल्याणच्या ह-
वाला होता त्यांस बोलून आणून
त्याचे वडील पुत्र रखमाजी दादाजी
आपणा जवळ ठेऊन कान्होजी नाई-
कानी आपला कबिला व दादाजी
पंताचा कबिला राजश्री स्वामीचें
आज्ञेप्रमाणें तळेगावास ढमढेरियांच्या
गावी ठेविला राजश्री स्वामीची व
कान्होजी ना॥ यांची क्रिया बेलरोटी-
वरी हात ठेऊन जाली त्या उपरी
बांदलाचा जमाव व हैबतराऊ सिलि
बकर व पासलकर मारणें व ढमाले
व मरळ डोहार बोलावून आणून
अतःस्ते यांच्या विद्यमानें क्रिया
घेऊन हाशमाचा जमाव खरा केला
राजश्री पंताजी गोपनाथे यांस अफ-
जळखानाकडे हेजबसि पाठविलें
अणि प्रतापगडा घाली भेटी घ्यावी

बा॥ पालखी व हेजीब घेऊन हुदेंकरा
समवेत भेटीस आले राजश्री स्वामी
किलिया वरून उतरून भेटीस आले
भेटी समई येकांगी करून अफज-
लखान जिवे मारिला सीर कापिले
जीव माहाला व व लोक व कान्हो-
जी ना॥ यांचे पुत्र बाजी सर्जाराऊ
यांणी युध्याची सर्त केली इशारती
अवाज प्रतापगडावरी जाला तेंव्हा
कान्होजी नाईक जेधें जमावानिसी
व बादल देखील यांणी पारावरी
चालोन घेऊन लस्करांत मारामारी
केली अगदी लस्कर बुडविलें कांही
पळोन गेलें तेव्हां खंडोजी खोपडा
पाडाव जाला त्यास राजश्री स्वामी-
नी शास्त केली कान्होजी ना॥ जेधे
व लोक येकनिष्टा धरून राहिले
त्याची नवाजीस केली जेधियांस
पान तरवारेचें अघी द्यावें यैसा
सिधांत केला १

मार्गेसीर्ष वद्य नवमी सोमवारी रात्री
राजश्रीं स्वामीनी पनाळा घेतला १

माघ शुध १४ स विज्यापूर प्रांते
राजश्री स्वामीनी स्वारी केली कृष्णेच्या
काठे गदलक्ष्मीश्वरापावेतो खंडाणि-

यैसी बोली केली १
रस्तुमजंमा व फाजीलखान यांसी व राजश्री स्वामीसी कोल्हापुरानजीक युध्य जालें बारा हाती व दोन हजार घोडी राजश्री स्वामीकडे पाडाव जाली गनीम पळोन गेला १

या घेतल्या १
कान्होजी जी जेधे यांजपासून कावजी कोंढाळकर वाघोजी तुपे यांस मागोन घेऊन हशमाच्या हजारिया सागितल्या १
पवाडा केला त्यामध्ये अहे की हनुमंत अंगद रघुनाथाला जेधें बादल सिवाजीला यैसे

शके १५८२ शार्वरी नाम संवछर

चैत्र शुध प्रतिपदेस राजश्री सिवाजी राजे फिरोन पनालीस आले मग सिदी जोहार येऊन पनाळियांस वेढा घातिला १
अश्वीन मासी चाकणेचा कोट शास्ताखाने घेतला मग पुणियांस आला १
भाद्रपद वद्य त्रयोदसी पनाळा सलाबतखानासी दिल्हा सला केला १

जेष्ट शुध ८ वासोटा गड घेतला १
संवछर प्रतिपदा बुधवारी शास्ताखान भिवरा उतरोन अला १
आषाढ वद्य १ पनालिस यावरून राजश्री स्वामी उतरोन खळणियांस गेले ते समई सिदी जोहार यांची फौज पाठीवरी अली युध्याची दाटी बहुत जाली तेव्हा बादलाच्या लोकानी युध्याची शर्त केली लोक खस्त जालें बाजी प्रभु देश कुळकर्णी ठार जाला

( पान ६ )

शके १५८२ शार्वरी

माघ शुध चतुर्दसी मंगळवारी काहार तलबखान यांसी लडाई जाली उबरांखिंडीस जुझ जालें राजश्री स्वामीची फतें जाली त्यापासून खडणी घेऊन वाट दिल्ही १
माघ मासी राजश्री स्वामी निजामपुर लुटिले दाभुल व प्रभावली कबज केली १
पौष शुध १२ द्वादसीस राजश्री मोरोपंतास मजमू दिल्ही १

आषाढ वद्य १
तेव्हा तरवारेचे पान आधी बादलास द्यावेसे केले त्यावरी जेधियास द्यावे १
कार्तीक मासी राजश्री सोनाजी पंडित शास्ता खानाचा निरोप घेऊन राजगडास राजियापसी आलें १
ईदिलशाई परडें कोट मोगलास शास्ताखानाचे मारफातीने दिल्हे १

शके १५८३ प्लगव संवछर

वैशाख शुध ११ सोमवारी श्रृंगारपुर राज्यानी घेतलें तेथील राजे सूर्या-राऊ पळोन गेले १

कार्तीक मासी राजश्री वर्धनगडास जाऊन उष्णकाल संपूर्ण राहिलें १

भाद्रपद शुध षष्टी नरहरी अनंदराऊ यांस पेशवाई दिल्ही आणि आनाजी पंतास वाकेनिसी दिल्ही सरकार-कुनास पालख्या दिल्या १

देइरी गडास बुलाखीने येऊन वेढा घातला तेथें कावजी कोंढाळकर जाऊन चारशें लोक मारून वेढा काढला १

सिदी जोंहार सलाबती खानावरी अली ईदिलशाहा खासा जाऊन लडाई करून मोडिला तों पळोन केळोसीस गेला आणि दो महिनि-यानी मेला १

शके १५८४ शुभकृतसंवछरे

जामदारखानावरी खांसा राजियांनी मिरे डोंगरास जाऊन पेणेंस छंपा घातला चैत्र वद्य दशमी गुरुवारी मोरोपंतास पेशवाई व निळोपंतास मजमु दिल्हीं भाद्रपद शुध द्वादसी आनाजीपंतास सुरनिसी दिल्हीं पेणेंच्या जुझांत वाघोजी तुपे जखमी जालें व लोकहि जखमी जालें कांही पडिले १

शके १५८५ शोभकृत संवछरें

चैत्र शुध अष्टमी रविवार शास्ताखाना वरी पुणियात सिवाजी राजा खासा जाऊन छपा घातला शास्ताखानाचा हत तुटला मग पळाला त्यांचा लेक अबदुलफतें ठार जाला लाल माह-लात सिरलें तेव्हा कान्होजी नाईक जेधें यांचा पुत्र चादजी नाईक समा-गमे युध्य समई होतें सर्ज्याराऊ स्वाराच्या जमावांत नदीपलीकडें ठेविले होतें राजश्री स्वामी लालम-हालचे दिडीने बाहेर निघताच घो-डियावरी

मार्गेसीर्षमासी जसवंतसिंग कोंढाणि-यांखाले वेंढियास आलें १

माघ शुध शष्टी शनवारी शाहाजी राजे परलोकास गेले १

माघ वद्य चतुर्थी भृगुवारी राजे फिरोन गडास आले पौषमासी वद्य चतुर्थीस जाऊन सुरत लुटिल १

( पान ७ )

चैत्र शुध शके १५८५ शोभकृत्य

बैसोन निघोन स्वारा बराबर कर्यात मावळात निघालें वरकड जागा जागा

लस्करच्या टोल्या ठेविल्या होत्या त्यांहि निघाल्या १

शके १५८६ क्रोध संवछरे

ज्येष्ट शुध चतुर्दसी सोमवारी जसवंतासिंग कोंढाणियांचा वेढा काढिला त्यांचा सुबा तगीर होऊन जयसिंगास जाला १
मार्गेसीर्ष मासी खुदावदपूर राजश्रीनी लुटिलें १
पौष वद्य अमवाशा महाबळेंश्वरी जिजाई आऊ तुळा जाली ग्रहण सूर्याचे होतें.
सोनाजी पंतीही तुळा केली १
कार्तीक मासी येदिल शाहाची व राजेश्री स्वामीचा बिघाड होऊन नि खवासखान कुडाळास अले राजेश्री स्वामी शेनेसहवर्तमान जाऊन घोरपडें मारिले खवासखानासी युध्य केलें तो पळोन घाटावरी गेला समागमे सर्ज्याराऊ जेधे होतें त्याणी युध्याची शर्त केली १
माघ मासी राजश्री जाहाजात बैसोन बसनुरास गेले ते शाहर मारून आलें २
माघ वद्य पंचमीस सोनाजी पंत परलोकास गेले १

शके १५८७ विश्वावसु संवछरें

चैत्र वद्य दशमी शुक्रवारी राजश्री पुरंधरास आलें १
वैशाख मासी जयेसिंग व दलेलखान येऊन पुरधरास वेढा घातला आषाढ शु १० राजश्री येऊन जयासिंगास भेटोन सला केला राजेश्री संभाजी राजे यांस पंच हजारी देऊन चाकर केलें १
फालगुण शुध नवमी सोमवारी राजश्री सिवाजी राजे व राजश्री संभाजी राजे येसैं औरंगजबाचे भेटीस गेले समागमे सर्ज्याराऊ जेधे नेले १
येदिलशाहाचा व मोगलाचा सला जाला तुटोन जयेसिंग व राजश्री सिवाजी राजे व दलेलखान विज्यापुरावरी मार्गेसीर्षे मासी चाळून गेले तेथे ईदिलशाही फौज सर्ज्याखान वगैरे येऊन लडाई दिल्ही मग अंतःस्तें द्रव्य देऊन विज्यापूरकरानीं सला मग मोगलासी केला राजश्री सिवाजी राजे यांणी जयेसिंगा पासून निरोप घेऊन राजगडास आलें १

शके १५८८ पराभव संवछरें

जेष्ट शुध द्वितीया राजश्री सिवाजी राजे अगरियास पाऊन औरंगजबची
श्रावण वद्य द्वादसी अगरीयातून पेटारियांत बैसोन पळाले यावरी

भेटी घेतली बिघाड होऊन राजश्रीस चौकिया दिल्या. १

मार्गशर्षिमासी पीरमिया व ताजखान देवरुखी होतें. तो झगडा होऊन मारिला हाती पाडाव केला. १

राजश्री संभाजी राजेसहवर्तमान मार्गे-सीर्ष शुध पंचमीस राजगडास आलें १

श्रावण वद्य अमवाशेस त्रिबकपंत व रघुनाथपंत कोरडे अगरा धरिले. १

( पान ८ )

शके १५८९ प्लवंग संवछरे

चैत्र वद्य पंचमी त्रिबकपंत दबीर व रघुनाथ पंत कोरडे दिलीहून सुटलें राजश्री सिवाजी राजे यांचे व मोगलाचें सख्य जालें तेच वर्षी राजश्रीनी मुलकाची बटाई केली १

कार्तीक वद्य पंचमी संभाजी राजे शाहजादा व शाहाआलम यांस भेटीस औरंगाबादेस गेले मोगलासी सला जाला १

वैशाख मासी बहलोलखान व राजश्री येकोजी राजे रागणियास वेढा घातला राजश्रीनी वेढा मारून काढिला मग भाद्रपद मासी येदिलशाहाचा व राजश्री सिवाजी राजे यांचा सला जाला १

जसवंतसिगाची भेटी कार्तीक वद्य शष्टीस जाली राजपुत्राचे दर्शन कार्तीक वद्य त्रयोदसी सोमवारी होऊन दुसरे दिवसी औरंगाबादेहून स्वार होऊन राजगडास आले १

शके १५९० कीलक संवछरें

श्रावण शुध अष्टमी बुधवारी प्रतापराऊ व श्रावण शुध पचमी रविवारी निराजी राहुजी स्वार होऊन फौजेनिसी औरंगाबादेस गेले १

शके १५९१ सौम्य संवछरें

भाद्रपदमासी औरंगजेबे कासीस उपद्रव केला देवलये पाडिले १

माघ वद्य नवमी सुक्रवारी कोंढाणा घेतला उदयेभानं किलेदार मारिला तान्हाजी मालुसरा राजश्री कडील हशामाचा सुभेदार पडिला. १

फालगुण वद्य १२ भोमवारी नीळोपंत मजमदारानी पुरंधर घेतला केसो नारायेण नऱ्हेकर पडिले. १

पैषमासी मोगलाचा व राजेश्री सीवाजीराजे यांचा सला तुटला प्रतापराव आनदराऊ फैजेनसी औरंगाबादेस शाहाजादीयांजवळ होते ते राजगडास आले. १

फाल्गुण सुध १५ राजगडी राजाराम उपजले १

### शके १५९२ साधारण संवछरे

भाद्रपद मासी राजश्री रायेगडीहून मोगलाच्या मुलुकावर चालिले जुनरास वेढा घातला आपण कार्तीक सुध प्रतिपदेस सुरतेस जाऊन शाहार लुटिले १

कार्तीक सुध १४ सुरतहून फिरोन येतां दिंडोरीपासी दाउदखान व राजश्री यांसी झगडा जाला हती येक पाडाव केला मग कुंजरगडास येऊन राहिले मार्गसीर्ष मासी कारंजियास गले जातां

कार्तीक वद्य त्रिंबकगड राजश्री मो-

( पान ९ )

### पुरणी शके १५९३ साधारण संवछरे

रोपती घेतला १

पैष मासी सालेरी भेदें करून घेतली १

आशाढ वद्य २ बुधवारी रोहिढा घेतला १

आषाढ सुध ९ गुरुवारी माहोली घेतली १

अहिवंत व रवला जवला व मारकंडा हे गड काबीज केले १

जेस्ट सुध ४ सुक्रवारी माळा लाऊन लोहोगड घेतला १

### शके १५९३ विरोधकृत संवछरे

वैशाख मासीं महबतखानें वेढा घालु अहिवंत व मारकडा व जवला अंचलागरी हे घेतले १

माघमासी मोरोपंती हशम घेऊन सालेरीची माचीचा वेढा मारिला उपराला केला

प्रतापराव व आनंदराव फौजेनसी जाऊन बहलोलखान धरिला मोहोकमसिग व दारकोजी भोसले धरिले हती अकरा व घोडी सतरा से पाडाव केली १

जेस्ट मासी बांहादुरखान व दलेरखान येऊन सालेरीस वेढा घातला अस्वीनामध्यें वेढा काढून औरगाबादेस आले आणि तेथे फौज ठेविली १

माघमासीं सुलतान शाहा अलम औरंगाबादेहून दिलीस गेले १

### शके १५९४ परिधावी संवछरें

जेस्ट वद्य ५ मारोपंत जाऊन जवार घेतली तेथील राजा विक्रमशाहा पलाला

आशाड मासी रामनगर घेतले तेथील राजा पलोन दवनेस गेला १

मोगलाईत गेला. १

जेस्ठ सुध ७ कल्याण पंतीं चिचवडीं परलोकवास केला. १

मार्गसीर्ष मासी अली इदिलशाहा परलोकास गेले त्याचा पुत्र सुलतान सिकिंदर तकतीं बैसविला

जेस्ठ सुध ५ भागानगरीचा पातशाहा सुलताना आबदुला कुतुबशाहा मेला त्यांचा जावई तानाहा, शाहा तकतीं बैसविले नाव सुलतान अबदुल हसन ठेविले राजश्रीचें

( पान १० )

पुरवणी शके १५९४ परिधावी संवछरे

मार्गसीर्षे मास

खवासखान कारभारी जाला व राजश्रीचा व इदिलशाहाचा सला तुटला बवाजी नाईक पुंडे विजापुरी वकील होते त्यास बोलाऊन आणिले १

फालगुण वद्य १३ पनाला गड आणाजीपंती भेद करून कोंडाजी फर्जद बराबर लोक देऊन घेतला साठी लोक रवाना केले त्यानी पनाला घेतला १

पुरवणी जेस्ठ

हेजीब निराजीपंत भागानगरास जाऊन येक लक्ष होनाचा तह करून भागानगरीहून सासस्ठ हजार होन घेऊन राजश्रीपासी आले १

शके १५९५ प्रमादी संवछरे

चैत्र सुध प्रतीपदा राजश्री राईगीहून पनाल्यास गेले तेच मासी बहलोलखान यांसी व प्रतापराव व आनंदराव यांसी लडाई जाहाली विज्यापुराजवळ फते जाली येक हती पाडाव जाला १

श्रावण वद्य ९ रविवारी सातारा घेतला कार्तिक मासी सर्जाखानासी व विठोजी सींदे यांसी झगडा जाला विठोजी पडिला १

चैत्र वद्य १० भोमवारी किले परेली घेतली विजई दशमीच्या मुहूर्ते राजश्रींनी जाऊन बंकापूर लुटिले १

माघ वद्य १४ सिवरात्रीस बहलोलखानात व प्रतापराव सरनोबत याचा झगडा निवटियास जाला प्रतापराव पडिले १

फाल्गुण वद्य ११ संपगावीची पेठ लुटीली आनंदराव येतां खिदरखानासी लडाई जाली दोन हती पाडाव केले १

## शके १५९६ आनंद संवछरे

चैत्र वद्य १४ राजश्री स्वामीनी केळंजा घेतला वद्य पक्षी फते जाली १

चैत्र वद्य ९ बुधवारी दो प्रहरां रात्री मातुश्री जिजाई आऊ पाचाडात निवर्तली १

( पान ११ )

## पुरवणी शके १५९६ आनंद संछर

माघ वद्य ५ गुरुवारी राजश्री संभाजी राजे यांची मुंज जाली चैत्र शुध १३ चिपोळणात लश्करची पाहाणी केली आणि राजश्री हंबिरराव मोहिते यासी सरनैबती दिल्ही १

जेस्ट शुध १२ शुक्रवार घटी २१ पले ३४ वि ३८।४० सी ४२ तीन घटिका रात्र उरली तेव्हा राजश्री सिवाजी राजे भोसले सिंव्हासनी बैसले छ १० रबिलवल सु॥ खमस सबैन अलफ १

फालगुण वद्य ५ मीस राजश्री स्वार जाले ते चैत्र वद्य ५ फोंडियास वेढा घातला बराबर राजश्री सरज्याराव जेधे होते १

जेस्ट शुध ४ घटी ५ अवलसालीं राजश्रीची मुंज जाली जेस्ट शुध ६ शानिवारीं समत्रीक विवाह केला १ राजश्री स्वामी सिंव्हासनारूड जाले ते दिवसीं जेधे व बादल व मावळचे देशमुख व लोक याणी अर्ज केला कीं आमची सर्फराजी करावी त्यास राजेश्री स्वामी बोलिले कीं आधी पान मावळचे व तुमची वतने आपल्या वंशाने चालवावी अन्याये तुमचा जाला तरी क्षमा करावा तुमचे चालवावे १

## शके १५९७ राक्षस नाम संवछरे वैशाख शुध ७

राजश्री स्वामीनी फोंडाचा कोट सुरंग र कडवाडी सिवेस्वर व आकोलें कबज केलें ते समागमे होते त्यानी तरवारेची शर्ती केली व त्या समई राजश्री बाबाजी नाईक पुडे मृत्य ( पंचमीस घेतला बहलोलखान खवासखानें धरि रमजान १

( पान १२ )

## शके १५९८ नळनाम संवछरे

जेश्ष्ट वद्य ३० बहादुरखानासी व बहलोलखानासीं हलगीस लडाई जाली ईसलामखान रुमी मोगलाचा पाडिला बहलोलखानाची फते जाली आशाड वद्य ४ रा नेतोजी पालकर यानी प्राश्चीत घेतले शुध जाले १
फालगुण मासी राजश्री सिवजी राजे भागानगरास जाऊन पातशाहाची भेटी घेतली बा। राजश्री सर्जाराव जेधे देसमूख ता। भोर व येसजी कंक सरनोबत होते त्यावरी पातशाही फौज बा। घेऊन करनाटकास गेले १
कार्तीक सुध शष्टी ६ रविवारी राजश्री सभाजी राजे श्रींगारपुरास जाऊन राहिले होते १
पौशमासी हूसेनखान माईणा यासी व राजश्री बहिरराव यासी गदक प्राते यालगेदला जवळ पाडाव केला दोन हजार घोडे व हाती पाडाव जाले युध्य समई राजश्री नागोजी बिन सर्जाराव जेधे याणी युध्याची शर्त केली खाष्याच्या हंतीच्या सोंडेवरी वार करून हाती वलिला तेव्हा हसनखानाने हती वरून तीर मारिला तो मस्तकी लागोन हणवटी जवळ निघाला ते जखमेने ठार जाले त्याची स्त्री गोदुबाई घोरपाडियाची कन्या कारीस सती निघाली १

## शके १५९९ पिगल संवछरें

चैत्र मासी राजश्री सिवाजी राजे भोसले याणी चंजी घेतली कुल करनाटक कबज केले अशाढ मासी त्रिपती जवल सेरखान बैरागी पाडाव केला ते समई राजश्री सर्जाराव जेधे याणी युध्याची शर्त कली राजश्री कडे हाती दाहा पाडाव जाले १
चैत्र मासी वद्य १२ राजेश्री त्रिबकपंत दबीर यानी सिवपुरी कैळासवास केला १
अशाढ मासी बाहादुरखाने अदलशाहाचे लाल दरगे कोट घेतला श्रावण मासी रणमस्तखानाच्या विद्यमाने
श्रावण मासी राजश्री सिवजी राजे याची व राजश्री येकोजी राजे याची भेटी जाली परस्परे कीत पडोन येकोजी राजे न पुसता पळोन तजावरास गेले त्यावरी राजश्री स्वामीनी त्याची विलात जगदेवगड व मुलुक व चिदंबर व व्रधाचल हा प्रात कुल घेतला आणि कोल्हारास वेढा घातला १
भाद्रपद मासी बहादुरखान तगीर होऊन दिलेरखान सुबा अला मग अस्वीन मासी मळेखिडीस सर्जाखान व मसूदखान व भागानरकर

नळदुर्ग घेतले १

मिळोन दिलेरखानासी झगडा केला मोगल निघोन नलदुर्गास गला १

( पान १३ )

पुरवणी शके १५९९ पिंगळ संवछरे

आस्वीन मासी राजश्री रघुनाथ नारायेण यासी मजमू दिल्ही लाख होन बकसीस दिल्हे वजीचा साहेब सुबा दिल्हा कार्तीक मासी राजश्री स्वामी करनाटकातून गदक प्रा:तास अले बलेवडीस वेढा घातला १

मार्गसीर्ष मासी राजश्री मोरोपंत पेशवे याणी नासीक लुटिले त्या प्राते विक्रमशाहा जवारेचा राजा होता तो व सिदी फकीर मोगलाच्या फौजदार होता तो पाडाव केला फते जाली १

पौश मासी बेहलालखान परलोकास गेले विजापूर मसूदखानाच्या हवाला जाले तोच कारभारी जाला १

कार्तीक मासी येकोजी राजे फौजेनिसी हबिराव सरनोबत यासी करनाटकात अहिरी पासी झगडा जाला येकोजी राजे याची तीन हजार घोडी व हती पाडाव केले सरदार पाडाव केले अणी जाऊन तिपदीस बैसले मग कोल्हार कोट येकाजी राजे याणी देऊन सला कला १

शके १६०० कालयुक्त संवछरे

जेष्ट मासी राजे गदक प्रांत कबज करून रायेगडास अले १

पाशै सुध १० संभाजी राजे पारखे हेऊन परली गडावरून पळोन मोगलाईत दिलेरखानापासी गेले त्याणी त्यासी हप्त हजारी दिल्ही सन्मान केला १

फालगूण वद्य १० शाहा अलम अवरंगाबादेस अला अणी अजमरीवर अवरंगजब चढोन गेले राणियावरी मोहीम केली १

श्रावण सुध १४ करनाटकातील वेळार कोट रघनाथ पंती व अनंदराव याणी वढा घालून घेतला १

पौश वद्य १० पंताजी पंत वाकेनीस निवर्तले असेती १

माघ वदी येकादसी भूमीकंप जाला १

बुधवारी रात्रऊ २०।४४ श्रुगारपुरी भवानीबाई लेक संभाजी राजे यासी जाली १

शके १६०१ सिधार्थी संवछरे

चैत्र सुध १ प्रतीपदेस मोरोपंत पेशवे याणी हुसेनखान मायेणा याचा लेक

वैशाख सुध २ गुरुवारी दिलेरखाने भूपालगड घेतला रामनवमीस थोरले

पाठवून किले कोपल घेतला अणी हुसेनखानास सांडिले अपला चाकर केला १

अनंदराव याणी नाळापूर घेतले १

( पान १४ )

पुरवणी शके १६०१ सिधार्थी नाम संवछरें

भाद्रपद सुध प्रतीपदेस शामजी नाईक विजापुरास पाठविले अश्वीन मासी दिलेरखाने विजापुरास वेढा घातला कार्तीक मासी ईदिलशाहाचा व सविजी राजे याचा सला जाला त्याचि महिनियात राज्यानी जाऊन जालनापूर लुटिले तेथे रणमस्तखानासी लडाई जाली सिदोजी निबालकर गोळी लागोन ठार जाले राजे फिरोन पत्यावरून रायेगडास अले १

अश्वनि सुध ३ शनवारी पासोटियावरी च्यार घागरी रुपये २६००० सापडिले १

दुसरे दिवसी रायेगडी तरवारातून ज्वाळा निघाल्या मार्गेषीर्ष मासी संभाजी राजे मोगलाईतून पळोन पनालियासी अले १

पौश वद्य ७ भामवारी राज्याची त्याची भेटी जाली माघ मासी ईदिलशाहाचा मोगलाचा सला जाला विजापूरचा वेढा उठिला १

फालगुण वद्य १० राजारामाचा विवाहा जाला रायेगडी प्रतापरायाची लेक कली फालगुण वद्य २ राजारामाची मुंजी जाली १

शके १६०२ रैद्र संवछर

चैत्र शुध १५ पौर्णिमा शनवारी दोप्रहरां दिवसां रायगडी सिवाजी राजे यांनी देह ठेविला सुर संन समानीन अलफ जेष्ट मासी मोरोपंत पेशवे अनाजीपंत प्रल्हादपंतांस बहिररायाने धरून पनालियास संभाजी राजे यांजपासी नेले कुंल फौज येकत्र होऊन राज्य संभाजी राजे यासी दिल्हे श्रावण मासीं बहादुरखान सुबा होऊन आले आणि अहिवंतास वेढा घालून दिलेरखान हुजूर गेले १

आश्वीन वदीं मोरोपंतीं देह ठेविला रायेगडी मेले त्याचे पुत्र निळोपंत

वैशाख शुध ३ तितीयेस राजारामास आनाजीपंत सुरणीस यानी मंचकी बैसविले संभाजी राजे यास कैद करून येसा तह करून मोरोपंत व आपण पनलिया वर चालोन गेले १

आशाड शुध २ शुक्रवारी संभाजी राजे रायेगडास आले राज्य करू लागले राजाराम कैदत ठेविले १

श्रावण शुध ५ पंचमी संभाजी राजे मंचकारोहान जाले १

पौश मासी रघुनाथ नारायेण चंदीत धराविले आणि हरजी राजे माहाडीक व शामजी नाईक पुंडे यासी कर्णा-

सोडिले पेशवाई दिल्ही १
आनाजी पंतांसहि सोडिले मजमु
दिल्ही त्यास मार्गसीर्ष मासी ब-हा-
णपूर हबिरराव याणी मारिला १

टकाचा कारभार सागितला १

( पान १५ )

पुरवणी शके १६०२ रौद्र संवछरे

श्रावण वदीं २ दाभोळेस मोत्याची
व्रुस्टि जाली श्रावण वद्य ५ रायग-
डास आणून राज्यानी पाहिलीं १

माघ शुध ७ रायेगडी संभाजी राजे
सिंव्हासनी बैसले १

१ शके १६०३ दुर्मती संवछरे ३

चैत्र मासीं हरजी राजे माहाडीक
व शामजी नाईक यास संभाजी राजे
याणी बा। जईतजी कांटकर व बाद-
जी कांडे हे फौज देऊन कर्णाटकात
रवाना केली १

२

जेष्ट मासी सुलतान अकबरशाहा
जाला औरंगजेबावर यागी होऊन
त्रिंबकास आले त्यास संभाजी राजे
याणी कोकणात पालीस ठाव दिल्हा १

४

भाद्रपद मासीं संभाजी राजे याणी
कवि कळशाचा बोले मागती आ-
णाजी दतो सचीव यांजवर ईतराजी
करून मार दिल्हा त्या मारानें राजश्री
आनाजीपंत व बाळप्रभु व सोमाजी
दतो व हिराजी फर्जंद परळीखाले
कैद करून मारिले कर्णाटकांत शा-
मजी नाईक यास कैईद करविले १

कार्तिक शुध १३ रविवारी पातशाहापुरीं
संभाजी राजे यांची व अकबरांची भेटी
जाली अगदी सेना समुदाये लश्कर
व हशम देखील समागमे होते अक-
बरा समागमें दुर्गादास होता बहुत
सन्मान केला तेच मासी अजमशाहा
औरंगाबादेस आला पौष मासी क्षय
संवछरामध्ये औरंगजेब बु-हाणपुरास
आला माघ मासीं हसन अलीखान
कल्याण भिवडी जाळूण फिरोन
गेला १

शके १६०४ दुंदुभी संवछरे

वैशाख वद्य ७ गुरुवारी संभाजी
राजे यासी पुत्र जाला सिवाजी राजे

चैत्र मासी कर्णाटकात श्रीरंगपटण-
करात व हरजी माहाडीक व जइ-

नाव ठेविले १
चैत्र मासी शाहादिखान येऊन रामसेजेस वेढा घातला वैशाख मासी रुपाजी भासले व मानाजी मोरे जाऊन शाबादीखानासी गणेश गावापासी भाडण केले पाचसे घोडी

तजी कांटकर बादजी काकडे त्रिचंनापलीस मदतीस गेले होते तेथे भाडण जाले दोन हजार घोडी पाडाव केलीं श्रीरंगपटणकराचा सरदार कुमार यास पाडाव केला पौश मासी रघुनाथ नारायण कर्णाटकांतून

(पान १६)

पुरवणी शके १६०४ दुंदुभी सवछरे

पुरवणी चैत्रमास

पाडाव केली त्यावर अश्वीन मासीं रामसेजेचा वेढा उठिला १
मार्गसीर्ष मासी रणमस्तखान येऊन कल्याणी बैसले त्यावर रुपाजी भोसले व केसोपंत व निलोपंत पेशवे रवाना केले १

पुरवणी चैत्रमास

येऊन राज्यास भेटले त्यास मुजमु दिल्ही १
माघ मासी सुलतान अजमशाहा येऊन कोल्हापुरापावेतो धाविला त्यास हंबिररायानी फिराऊन भवरे पलिकड लाविले १

शके १६०५ रुधिरोदगारी सवछरे

चैत्र मासी रोहिलाखान काठवणातून उतरान रणमस्तखान घाटावरी येऊन गेला येते वेळेस रुपाजी भासले याणी तिटोलियाजवल लडाई केली पदमसिग रजपूत घेतला युध्यप्रसग होऊन पदमसिग व कितेक थोर थार लोक मारिले १
अश्वीन मासी अवरंगाबादेहून अवरंगजब अहमदनगारास अले ते च मासी दिलेरखाने विश घेऊन देह सोडिला ते च कार्तीक मासी शाहादीखान पुणियात येऊन बैसला १
पौश वद्य ५ शाहाअलम रामघाटे उतरोन कुडाल व बदे जाळून घाटावरी फालगुण सुध पोर्णिमस गेला लस्कर फार मेले १
पौश वद्य ४ शाहादीखान देवघाटे

वैशाख वद्य ४ बुधवारी रघुनाथ नारायेण वलणी निवर्तले जेष्ट वद्य ११ संभाजी राजे श्वार होऊन राजापुरास गेले फिरगीयासी हि बिघाड केला रेवदंडीयासी वेढा घातला १
अशाढ सुध पोर्णिमा जनार्दन नारायेण याणी देवरुखी देह ठेविला
कार्तीक वद्य ७ सभाजी राजे हंडियास गेले गावीकर फिरंगी यानी कोटास वेढा घातला होता त्यासी लढाई करून वेढा उठविला तेथे येसजी कंक व त्याचा लेक कृष्णाजी कंक याणे युध्याची शर्त केली १
मार्गषीर्ष मासी फिरंगीयाचे कुंभार जुवे घेतले साष्टी व बरदेस मारिला १
पौश सुध पोर्णिमा राजे रायेगडास गेले कविकलशास तेथे कुंल येख-

उतरोन निजामपुर मारिले १
माघ सुध १ कवि कलश अकबरास
घेऊन भीमगडच्या झाडीत गेले
फिरंगीयास सला केला १

त्यार देऊन ठेविले १

शके १६०६ रक्ताक्षी संवछरे वैशाख मासी शाहाअलम विज्यापुराजवल शेक्स म्हणून गाव आहे तेथे बैसला १

( पान १७ )

पुरवणी शके १६०६ रक्ताक्षी संवछरें

विजापुरकरानी मोगलासी बिघाड केला जेष्ट सुध १५ कबजी रायेगडास अले कार्तीक सुध ११ काथळागड मोगलानी घेतला पौश वद्य ४ शाब्दीखान पुणाहू(न)दउड करून बोरघाटे उतरोन गागोलीस अला कविकलेशे जाऊन भाडण दिल्हे फिरोन घाटावरी घोतला १

कार्तीक सुध २ मानाजी मोरे व गंगाधरपंत वासुदेवपंत राहुजी सोमनाथ यासी संभाजी राजे याणी कैद केले १
पौश मासी यकोजी राजे यानी तजावरी देह ठेविला १
माघ मासी कुडालचा देशाई खेम सावत पारखा जाला त्यासी फिरगीयानी आसरा दिल्हा १

शके १६०७ क्रोधन संवछरे राहिमखान बबुरखान रणमस्तखान येऊन विजापुरास वेढा घातला

वैशाख मासी भागानगरकरी विजापुरास मदतीस तीन हजार स्वार तीन लक्ष होन खर्चास दिल्हे १
शाहाअजम व बहादुरखान यैसे जाऊन भागानगर लुटिले त्याच महिनियात मादंणावरी हांला करून मारिले त्याचा भाऊ अकंणा मारिला क्रोड रुपये दऊन मोगलासी सला केला १

जेष्ट मासी अवरंगजब अमदानगरीहून कुच करून सोलापुरास अले विजापुरावरी मोहीम केली १
अशाढ मासी संभाजी राजे याणी विजापूरचे मदतीस कबजीस पाठविले ते जाऊन पनाळा राहून फौजा रवाना केल्या १

शके १६०८ क्षये नाम संवछरे अशाढ मासी अवरंगजब सोळापुरीहून येऊन विजापुरासी लगट केला

अश्वीन सुध ७ सोमवारी विजापूर अवरंगजंबे घेतले सुलतान सिकिंदर

केसो त्रिमंल कार्तीक मासी करनाटकात रवाना केले माघ मासी कुतुब-

भेटला यासी नदरबंद केले सरजाखान व बहलोलखानाचा लेक यासी पंच हजारी दिल्ही १

चैत्र मासी मिरज मोगली घेतली

केसोपंत फालगुण सुध १० करनाटकात गेले १

शाहा बसबपटण अदी करून भागानगर अवरंगजबास दिल्ही कासिमखानाचे विद्यमाने तेच मासी अवरंगजब भागानगरास येऊन वेढा घातला करनाटकात व देशात दुकाल पडिला फालगुण मासी अकबर जाहजात बैसोन विरानात गेला १

( पान १८ )

शके १६०९ प्रभव संवछरे

अशाढ सुध १० बगळीर म्हैसुरकरी मदत अणून कासीमखानास फौजनिसी घेतले १

अश्वीन सुध १ कासीमखाने किलेदारासी भेद करून पिलगोंडे घेतले १

फालगुण मासी इसमाइलखान मका व याचमखान नाईक व सादीमहमद येऊन कची सोडिली १

फालगुण मासी अजमशाहा याणी बलगाव घेतले व कितेक किले घेतले १

तेले(?)कुतुबशाहा जिवंतच दस्त केला १

पौश मासी अवरगजेब विजापुरास अला शाबदीखानास गाजदीखानी दिल्ही अदवनी पाठविले तेथे जाऊन वेढा घातला १

सर्जाराव जेधे समेत भाऊ व लोकं राजमाचीस राजश्री निळोपंत प्रधान याजवल सेवेसी होते १

भाद्रपद सुध १२ अवरंगजबे भेद करून भागानगर घेतले १

शके १६१० विभव सवछरे

चैत्र सुध प्रतिपदा हरजी माहडीक त्रिणामलीहून कचीवर गेले १

कार्तीक मासी कवि कलश याजवरी सिरके पारखे जाले १

कलश पळोन खिलाणियांवर गेला तेच मासी संभाजी राजे रायेगडाहून कलशाचे मदतीस आले समगे स्वारी सिरकियांसी युध्य करून त्यास पलऊन खलणियास आले १

माघ वद्य ७ शुक्रवासरी संभाजी राजे व कविकलश रायेगडास जावयास

अश्वीन मासी विजापुरास माहामारी अली १

मार्गसीर्ष मासी संभाजी राजे यांणी कलशाच्या बोले प्रल्हादपंत व सरकारकून व कितेंक लोकास धरिले तेच मासी औरंगजेब विजापुरीहून तुलापुरनजीक भीमातीर येथे आले १

फालगुण शुध ३ राजारामास रायेगडचा किलेदार चांगोजी काटकर व येसजी कंक यांणी माघ वद्य ३०

संगमेस्वरास अले असता सेक निजाम दौड करून येऊन उभयेतांस जिवतच धरून नेले वरकड लोक रायेगडास गेले १

फालगुण वद्य १३ त्रयोदसी हरजी माहडीक यांणी केसो त्रिमल यांस संभाजी राजे याचे विपरीत वर्तमान यैकोन त्रिणामली धरिलें १

अदबखानाहून काडून बाहेर आणून मंचकी बैसविले मानाजी मोरे व वरकड सरकारकून धरिले होते ते सोडिले ज्याचें कायेभाग त्यासी देऊन राजाराम राज्य करू लागले येसजी व सिदोजी फर्जद यास कडेलोट केले १

फालगुण वद्य ३० अवरंगजेब तुलापुरी संभाजी राजे व कविकलश यास जिवे मारून सिरछेद केले १

( पान १९ )

शके १६११ शुक्ल संवछरे

चैत्र शुध १५ अवरंगजेब जुलपुकारखानास पाठऊन रायेगडास वेढा घातला चैत्र वद्य १० शुक्रवारी राजाराम पळोण प्रतापगडास गेले १

अस्वीन वद्य ८ गुरुवारी राजाराम पनालियाहून स्वार होऊन कार्तिक वद्य ११ वंसुरास आले तेथून चंदीस आले १

कार्तिक मासी रायगडा सला करून मार्गसीर्ष सुध २ रविवारी रायगड मोगलास दिल्हा संभाजी राजे याचे पुत्र सिवाजी राजे यास तुलापुरास औरंगजेब यासी नेले पातशाहे त्यास हप्त हजारी केले शाहू राजे नाव ठेविले ते वर्षी कुंल गड मोगलें घेतले १

भाद्रपद शुध १४ केसोपंतास हरजी माहाडीक याणी सोडिले १

अस्वीन वद्य ११ हरजी माहडीक यांणी देह सोडिला १

पौश वद्य ४ शनवार याचेपा नायेड ईस्मालखान मकाव इत्यादिक मोगलाचे च्यार हजार स्वार पारखे होऊन निलोपंत पेशवे यांच्या विद्यमाने येऊन राजारामास भेटले चेनपटणी भेटले १

वैशाख मासी सर्जाराव जेधे देशमूख ता। भोर ता। रोहिडखोरें यास भाऊ समेत वतनावरी जावयास अज्ञा दिल्ही कारीस घरास अले १

शके १६१२ प्रमोद संवछरें

वैशाख मासीं जुलपुकारखान अला मग याचेपा नायेड व चंदाउर त्र्यंबकराये व राजारामाची जेमेती घाटावर गेली होती ती निघोन खाली अली कांही काम केले नाहीं १

भाद्रपद शुध ४ जुलपुकारखान येऊन चंदीस वेढा घातला राजाराम निघोन करनाटकास गेले १

मार्गसीर्ष शुध ३ नेमाजी सिदे व माणकोजी पाढरे व नागोजी माने

वैशाख वद्य द्वादसी सातारियास सर्जाखाने वेढा घातला होता त्यावरी राजश्री रामचंद्र पंडित सचीव व राजश्री शंकराजी पंडीत राजाज्ञा व संताजी घारपडा व धनाजी जाधव जाऊन लडाई करून च्यार हजार घोडी व हती अट पाडाव जाले सर्जाखान पाडाव जाला लाख रुपया घेतला अणी सोडिला प्रतापगड व वाई प्रांतीचे किले रोहिडा राजगड तोरणा हे किले राजश्री रामचंद्र पंडित व राजश्री शंकराजीपंत याणी घेतले १

मोगलाकडून पारखे होऊन दोन हजार स्वार घेऊन राजारामाकडे अले मोर्चा उठऊन चक्रपुरी बैसले १

माघ मासीं राजाराम चंदीस गेल अवरंगजब गलगलियास अले १

मार्गसीर्ष मासी सर्जाराव जेधे देशमूख ताा भोर हे मावलच्या देशमुखाबाा तुलापुरास जाऊन पातशाईकौल व सिरपाव घेऊन अले बाा वेंकाजी दादाजी व सिवजीपंत व बालजीपंत १

( पान २० )

शके १६१३ प्रजापती संवछरे

कामबकस शाहाजादे अस्तखान जुलपुकाराचे मदतीस चंदीस अले पौश मासी दाखल जाल १

किले पनाला मोगलापासून घेतला राजश्री रामचंद्रपती राजश्री परशरामपंताबाा हशम पाठवून घेतला १

शके १६१४ अंगिरा संवछरे

मार्गसीर्ष मासीं शुध १५ धनाजी जाधव चंदसि राजारामाचे मदतीस राजश्री शंकराजी पंती रवाना केलें त्याणी जातां च पश्चमेची चौकी मोगलाची मारून ईस्माईल मका धरिला १

पांचसें घोडी दोनी हती पाडाव केले मार्गसीर्ष वद्य १ संताजी घोरपडा पंधरा हजार स्वारानसी राजश्री रामचंद्रपती रवाना केले ते चंदीस अले येते वेलेस कची जवल अलीमर्दाखान दस्त केले पंधरासे घोडे व हती ६ पाडाव केले मार्गसीर्ष वद्य ३ जुलफिकारखानें चंदीचा मोर्चा उठऊन जाऊन कामबकशास

पौश वद्य ११ जुलफिकारखान सला करून चंदीचा वेढा काढून वद्यवसास गेला १

असतखान व कामबकस हुजुर गेले १

फालगुण मासीं बहिरजी घोरपडा व यांचपा नायेक राजारामावरी यागी होऊन गेले ते याचपा नायेक सातगड घेतले अणी तेथेंच राहिल ते च मासीं संताजी घोरपडा जाऊन त्रितनापलीस वेढा घातला ते च मासीं राजाराम ही खासा गेले त्रिचनापलीवरी मोहीम केली तेच वरसीं मोगलीं पनालियास वेढा घातला १

कैद केले १

शके १६१५ श्रीमुख संवछरे

चैत्र वद्य १३ त्रितनापलीकरासी व राजारामासीं सला जाला अणी चंदाउरीं शाहजी राजे यांची व राजारामाची भेट जाली वैशाख मासीं सताजी घोरपडे राजारामासीं हि बिघाड करून देशास गेले त्यावरी धनाजीस नामजाद केले १

जेष्ट मासीं याचक नायेक बहिरजी वेलुराजवल होते तेथे राजारामे जाऊन त्यासी झगडा केला १

मार्गसीर्ष मासीं याचप नायेक जुलपुकारास भेटला चाकर जाला माघमासीं जुलफीकारखान वदवंसीहून चंदाउरावरी चाली केली फालगुण मासीं बहिरजी

( पान २१ )

शके १६१५ श्रीमुख संवछरे मार्गशीर्ष मासी

बहिरजी घोरडे यांचे समाधान केले आणि हुजूर आणिले ते चंचावरचे मदतीस पाठविले कार्तीक मासी राजश्री रामचंद्रपंत अमात्य व राजश्री शंकराजी पंडित सचीव व धनाजी जाधवराऊ याणी जाऊन पनाळाचा वेढा उठविला १

शके १६१६ भाव संवछरे सन सीत तिसैन अलफ

राजश्री शंकराजी पंत सचीव याणी राजश्री संताजी घोरपडे यांसी बोली केली कीं फौजेनसी जाऊन साहेब काम करावे राजश्री स्वामी जवळ मुदे घालू नयेती मर्यादेने राहोन वेढा उठवावा बेमानी करू नयेसे बोलि करून शफत घेतली बा॥ राजश्री येसाजी मलार मुतालीक दिल्हे त्याबा॥ फौज हणमंतराव निंबळकर सरलस्कर व सरदार मिलोन पंचवीस हजार स्वार दिल्हे मा॥ निलेच्या सदरेस बसोन उभयतानी दिवाण कारभार करून बेमा(इ!)ने वर्तावे यैसी बोली करून कार्तीक मासी रवानगी केली त्याणी फौज भारी करून भाडियांच्या आवजाचे कुच करून मजल दरमजल

वैशाख मासी जुलपुकारखान चंदावरास गेले त्याणी चालीस लाख चक्रे देऊन सला केला १

आस्वीन शुध १ कुळ चंदीखालील देश कबज करून जुलुपुकारखान आस्वीन सुध सप्तमीस वेढा घालून बैसला याचापा ईडास धरून सिरछेद केला आणि तेथून जाऊन जगदेव मुलुक व किले घेतले चंदी जेर केली १

किले कारीगडावर राजश्री त्रिबंकपत मुतालीक होते त्यासमागमे राजश्री यादो सामराज व राजश्री माहादाजी बाजी होते ते समई रायाजी बहुळकर याच्या हाते भेद करून जुनरकर दोगे मोगलाकडील येऊन किला

कर्नाटकांत गेले १

राजश्री शंकराजी पंत सचीव राजगडास आले त्याणी राजश्री पंताजी सिवदेव व चापजी कदम भोरपकर व वरकड किल्याचे जमाव व दामाजी नारायेण याचा जमाव देऊन कारीस रवाना केले वेढा घालून किंला जेर केला दोग्यास निरोप देऊन फिरोन घेतला राजश्री त्रिंबकपंत व मोरो-

सिड्या माळा लाऊन घेतला यादव सामराज व माहादाजी बाजी कबिले पश्च्यम दरवाजे याने घेऊन भोरपेस गेले राजश्री त्रिंबकपत व मोरो नारायेण दोग्याणी धरिले आबाजी पंत लबेचा सबनीस होता तो पडिला वरकड सिपाई गिरजोजी निंबाळकर दिनकरराव लोक पडिले १

( पान २२ )

पुरवणी शके १६१६ भाव संवछरे सन सीत तिसैन अलफ

पंत वरकड लोक कबिले होते ते सोडविले राजश्री पंतसचीव कारीस जाऊन रायाजी बहुलकररास मार देऊन बाले किंल्यां राजगडी अटकेंत ठेविला १

शके १६१७ युवा संवछरे

जुलफीकारखाने वेलुरास वेढा घातला १

पौष शुध ११ ते दिवसी संताजी घोर(पडे) याणी खानजादीखान व कासीमखान सिटियाजवळ डोडेरी म्हणऊन गाव आहे तेथे कैद केले कासीमखान तर मेला खानाजाद खानास लाख रुपये घेऊन वाट दिल्ही १

मार्गसीर्ष मासी धनाजी जाधव कर्णाटकात जाऊन वेलुरास जाऊन वेढा उठविला १

पौष मासीं हिमत बहादुर संताजी घोरपडियाने बसवपंटणाजवळ मारिला जेष्ट मासी औरंगजेब गलगलाहून उठो(न) बनबपुरीस राहिले १

शके १६१८ धाता संवछरे

चैत्र मासी औरंगजेबें गाजदीखानास बेदरावरी वागिनागिरियावर रवाना केले १

जेष्ट वद्य ४ भोम वासर घटिका ४। पले ९ धनिष्टा ४३ विश्कंभयोग २९।९ रात्रौ घटी १८।१० राजा-

चैत्र मासी राजारामाच्या दर्षणास संताजी घोरपडे चंदीस गेले जेष्ट मासी बिघडोन कची आलिकडेस भाडण जाले धनाजी जाधव पलोन देशास आला अमृतराव निंबालकर पडिला संताजीची फते जाली १

रामास पुत्र जाला नाव सीवाजी राजे ठेविले १

शके १६१९ ईश्वर संवछरे

चैत्र मासी संताजी घोरपडे सातारे प्रांते आले त्यावर गाजदीखान नामजाद आला १

आषाड मासी संताजी घोरपडे यासी नागोजी माने याणी माहादेवाजवल दगा देऊन मारिले १

(पान २३)

पुरा शके १६१९ ईश्वर संवछरे

श्रावण वद्य ११ सोमवारी राजारामनी कर्ण मोगलाईत पाठविला १

मार्गसीर्ष शुधं ५ मोगलानी चंजीस वेढा घातला १

---

# ४ जेधे यांचा करीना

## श्री नागेश

1/10

करीना जेधे देशमुख ता। भोर किले रोहिडा करीना यैसा जे आपल्या वडीलाची व खोपडीयाजी वाटणी दिवाणाने व गोताने केली भोर तरफ जेध्याचे वाटणीस आली उत्रोली तरफ खोपडियाकडे आली त्यास भोर तर्फेची लावणी उगवणी जेध्यानी केली किलांचा कसाला केला पातशाही हुकुमे जमाव बराबरी घेऊन मसलती केल्या युध्याची शर्त केली दिवाणकामें केली त्यावरून पातशाहा मेहरवान होऊन आपले वडील नाइकजी ना। यांस कारी इनाम दिल्ही त्याचे पुत्र कान्होजी ना। जेधे यांणी तरवारेच्या व जमावाच्या बले चंदरराऊ मोरे यांस व कृष्णाजी ना। बादल बारा मावळात दाइते घेत होते ते जबरदस्तीने राखिले भोर तर्फेचे व उत्रोली तर्फेचे गाव राखिले वतनदारीच्या कार्यास व पातशाही मसलतेस अंतर केले नाही मलीक अंबर यांच्या हुकुमे सिड्या माळा लाऊन किले केळजा जबरदस्तीने घेतला मलीकानी सिपारसीची पत्ने पाठविली सरंजाम केला त्यावरी मलीक अंबर शके १५४८ क्षय संवछरी वैशाख मासी मृत्य पावले त्याबरी हा मुलूख इदलशाहाकडे जाला तेव्हा ण रणदुलाखान रहिमतपुरी होते त्यांणी कान्होजी ना। यांस नेऊन जमावानसी आपणाजवळ शेवेसी ठेविले पातशाहास विजापुरी लेहून सरंजामाचे फर्मान आणविले तेथे हि वतनदारीच्या मसलती पातशाही हुकमे केल्या पातशाहा मेहरवान होऊन कान्होजी ना। जेधे यास मौजे चिखलगाव व मौजे नाटिबी हे दोनी गाव इनाम दिल्हे इनामगांवांचे फर्मान दिल्हे रोहिडाच्या किलेदारास पत्ने दिल्ही इनाम गाव दुमाले केले त्यावरी शके १५५४ अंगिरा संवछरी भाद्रपद मासी राजश्री

शाहाजी राजे यांणी पेमगिरीस पातशाही नसलावरी छत्र धरिले तेथे सांट होईना किला लाहान याकरिता माहुलीस पातशाही नसल घेऊन गेले फौजेनसी राहिले तेथे शके १५५७ युवा सवछरी रणदुलाखान इदलशाही व खान जमाखान मोगलाचा सुभा जाऊन दुतर्फा वेढा घालून बैसले कान्होजी ना॥ रणदुलाखाना समागमे नेले होते त्यांणी अंतस्ते माहाराजासी राजकारण राखिले होते किलियावरी सामान नाहींसें जाले लोकास उपवास पडो लागले किला जेर जाला तेंव्हा माहाराजानी सल्याची बोली घातली तेंव्हा तह जाला की गंगेपलीकडील मुलूक व पातशाही नसल मोगलाच्या सुभ्याकडे द्यावे गंगेअलीकडील मुलूक इदलशाहाकडे द्यावा तो माहाराजास जाहागीर द्या [ वा ] महाराजानी बारा हजार श्वारानसी चाकरी करून वजीरी करावी यैसी बोली घातली त्या प्रमाणे खानानी विज्यापुरास लेहून पातशाहाचा कौल व फर्मान आणविला त्यावरी महाराजानी असल नसल राजपुरीस पाठविले दुसरे मुसलमानाचे मूल नसल मोगलाकडे दिल्हे माहाराज किलियाखाले उतरोन आले खानाची भेटी जाली सन्मान जाला माहाराज डेरियास गेले त्यावरी कान्होजी ना॥ व दादाजी कृष्ण महाराजाच्या भेटीस गेले भेटी जाली माहाराजानी समाधानाच्या गोष्टी सागितल्या तुम्ही वतनदारीस चुकले नाहीत भेटीस आलेत उतम केले तेंव्हा महाराज बोलिले की तुम्ही मावळात जबरदस्त वतनदार देशमुख आहा हा मुलूक आपल्याकडे जाहागीर जाला आहे मावलचे देशमुख पालेगार पुड आहेत ते रुजुवार्ता होऊन अमल मुरलीत चाले यैसे करावे यैसे बोलिले त्यावरी कान्होजी ना॥ बोलिले की खानाजवल आम्हांस आपल्याकडे मागोन घ्यावे आपण चाकरीस चुकणार नाही यैसे बोलिले त्यावरी विज्यापुरास गेले पातशाहाची भेटी जाली बोलीप्रमाणे सरंजाम जाला त्यावरी माहाराजानी रणदुलाखानास भीड घालून कान्होजी नाइकास आपणाकडे मागोन घेतले माहाराजाची चाकरी जमावानसी करू लागले त्यावरी रणदुलाखान मृत्य पावले त्यास संतान नाही म्हणून त्यांची दौलत त्यांचा खिजमतगार अफजलखान कर्ता देखोन त्यास दिल्ही आणि चंदीस रवाना केले त्यांबा॥ माहाराजांस हि फौजेनसी रवाना केले बा॥ कान्होजी ना॥ हि जमेतीनसी गेले चंदीस वेढा घातला जेर केली त्यास चंदीस राचेवार मऱ्हाटे होते त्यांचा व महाराजाचा घरोबा आहे सामान पुरवितात यैसी बदगोइ अफजलखान याणी विजापुरास पातशाहास मुस्तफाखानाकडून लिहिली त्यावरून महाराजास धरून विज्यापुरास बोलाऊन नेले बा॥ कान्होजी नाईक होते पातशाहानी तहकीकात मनात आणिता तुफानी गोष्टी यैसे जाले त्यावरी पातशाहानी महाराजाचा सन्मान केला सदर बकसीस दिल्ही सिरपाव दिल्हे बेगरूळ प्रांत पांचा लक्षा होनाची जाहागीर देऊन वेगली मसलती सांगितली बा॥ कान्होजी ना॥ हि जमावानसी होते त्यावरी माहाराजानी

राजश्री सिवाजीराजे यांसमागमे राजश्री सामराजपंत पेशवे व माणकोजी दाहा-तोंडे सरनोबत व बालाजी हरी मज्यालसी व कारकून व स्वाराचा जमाव देऊन पुण्यास पाठविले त्यावरी कसबे खेडेबारे येथेहि वाडे बांधले तेथून बापूजी मुदगल नऱ्हेकर देशपांडे ता। खेडेबारे यांच्या हाते राजकारण करून दग्याने किला कोंढाणा घेतला याकरिता माहाराजावरी पातशाहा इतराज जाले अट-केत ठेविले कान्होजी ना। जेधे व दादाजी कृष्ण हे उभयता कनकगिरीमध्ये अटकेत ठेविले तेथे दादाजी कृष्ण याचे पुत्र रतनजीपंत अदबखानीयात मृत्य पावले त्यावरी कोंढाणा राजश्री सिवाजी राजे याणी पातशाहास दिल्हा तेंव्हा माहाराजास सोडिले कान्होजी ना। व दादाजी कृष्ण कनकगिरीहून सोडऊन नेले तेंव्हा पातशहानी महाराजास चंदावरची मसलती सांगितली रवानगी जाली तेंव्हा कान्होजी ना। यांस व दादाजी कृष्ण यांस बोलाऊन येकांती बैसले आणि माहाराज बोलिले की मावल प्रांती तुम्ही वतनदार जबरदस्त आहा राजश्री सिवाजी राजे पुणा आहेत त्यांकडे जमेतीनसी तुम्हांस पाठविते तेथे इमाने शेवा करावी का ल क ला तरी जिवावरी श्रम करून त्यापुढे खस्त व्हावे तुम्ही घरोब्रियांतलि मायेचे लोक अहा तुमचा भरोसा मानून रवाना करितो इमाने वर्तावे येसी शफत देणे येसे बोलिले त्यावरी कान्होजी ना। यांणी शफत दिल्ही माहाराज हि बोलिले कीं तुमच्या आमच्या वंशाने चालवावे येसे बोलोन माहाराजानीं भाक दिल्ही आणि हुजरे व पत्रे देऊन पुण्यास पाठविले हुज-रियानी पत्रे दिल्ही माहाराजानी जबानी हुकूम सांगितला होता त्याप्रमाणे सांगितला कान्होजी ना। यांची भेटी जाली पुणे प्रांतीचे दोनी गाव दाखिल सिंदवणे मुकासा दिल्हे जमावानसी पुणियात सेवेसी राहिले त्यावरी दादाजी पंतास जमेतीनसी पुण्यांत ठेऊन आपण कारीस घरास आले दादाजीपंत स्वारानसी शेवेसी ठेविले राजश्री स्वामीनी किले राजगड तोरणा या किलीयास इमारतीचे काम लाविले किले तयार करविले त्यावरी फतेखानाची फौज विजापुरीहून पुणे देशात आली तेंव्हा राजश्री सिवाजी राजे यांणी कान्होजी नाइकास व मावलचा जमाव आणून पुरंदरास आले ते समई लोकांची निवडी करून बा। स्वार व निशाण देऊन फतेखानावरी रवाना केले युध्य जाले तेंव्हा स्वाराचा जमाव फुटला मावळचे लोक जुझत जुझत बेलसर पावेतो आले युध्याची शर्त करून बेलसरी खस्त जाले स्वार जागा जागा फुटोन पळोन गेले निशाणा बा। चालीस पंनास स्वार राहिले ते समई कान्होजी ना। याचे पुत्र बाजी ना। जेधे बापास न पुसता घोडियावरी बैसोन स्वारा बा। गेले होते तेंव्हा गनीमाने निशाणावरी बहुत दाटी केली तेंव्हा बाजी ना। जेधे यांणी फिरोन गनीमाच्या स्वारासी युध्य केले गनीमाचे पांच सात श्वार ठार केले गनीमाची

६

फौज थोपून निघाले तो ज्या फर्जंदाजवळ निशाण होते तो घोड्याखाले आला त्यास बैसऊन निशाणाचा भाला आपणाजवल घेऊन पुरंदरास आले हे वर्तमान स्वारानी राजश्री स्वामीस सांगितले तेव्हा बाजी ना। जेधे यांजवरी संतोशी जाले निशाण सांभालून आणिले म्हणून सर्जाराईचा किताब दिल्हा वस्त्रे दिल्ही तेजी तुरकी दोनी घोडे पागेचे बारगीर देऊन आपणाजवल हुजूर ठेविले त्यावरी जाउलीवरी मोहीम केली कान्होजी ना। यांस व अवघ्या देशमुखांस जमावानसी बोलाविले यास जाबलीस मोरे होते ते जेध्यानी पिटून लाविले होते जाबलीस मोरे कोण्ही नव्हते जोरामध्ये हणमतराऊ मोरे होते त्यावरी राजश्री स्वामीन रघुनाथ बलाळ सबनीस पुण्याहून स्वाराच्या जमावानसी पाठविले त्यांणी हणमतराऊ यास मारून जोर घेतले जाउली मात्र राहिली होती ते शके १५७७ मन्मथ सवछरी पौष्य शुध चतुर्दस राजश्री सिवाजी राजे यांणी देशमुखाचा जमाव बा। घेऊन जाऊन जाउली घेतली चंदरराऊ पळोन राइरीस गेले तेथे राजश्री स्वामीनी किलियास वेढा घातला बा। कान्होजी ना। व जमाव व वरकडा देशमुखांचा जमाव होता ते समई हैबतराऊ सिलिंबकर देशमुख ता। गुजणमावळ यांणी मध्यस्ती करून चंदरराऊ भेटविले शके १५७८ दुर्मुखी संवछरी राइरी घेतली त्यावरी हैबतराऊ सिलिंबकर यांस देशमुखीचा दुसरा सिका गुजण मावळांत देऊन वतनाची वांटणी करून दिल्ही त्यावरी शके १५७९ हेमलंबी संवछरी कल्याण भिवडी फिरंगीयावरी मोहीम केली राजश्री सामराजपंत पेशवे यांचे चुलतबंधु रा। दादाजी बापूजी यास रवाना केले ते समई कान्होजी ना। यांजवल दादाजी कृष्ण व त्याचे बंधु सखो कृष्ण मागोन घेतले त्याबराबरी मावळच्या देशमुखाचा जमाव व मावळे लोक होते तो अगदीं पोख्ता जमाव देऊन कल्याणचा नामजाद हवाला दादाजी कृष्ण यांस सांगितला व सखोपंतास भिवडीचा हवाला सांगितला आणि रवानगी केली येमाजीपंत आपले भाऊ यांस कान्होजी नाईक यांच्या स्वाराजवल कारभारास ठेविले आणि मसलतेस गेले कल्याण भिवडी घेतली फिरगणात स्वाऱ्या घालून मुलूक लुटिला असेरी किला वसविला तेव्हा फिरंगियानी प्रतिवर्षी सवा खंडी सोने द्यावयाचा तह केला कल्याणाजवल बंदरी दुर्गाडीचा कोट बांधला ते समई राजश्री स्वामीस कल्याणांत हरजिनस मता व द्रव्य सापडले फते जाली दादाजीपंताचे बंधु सखोपंत फिरंगीयाचे युध्री पडिले कल्याण भिवडी प्रांत किले देखील कबज जाले राजश्री स्वामी कल्याणास आले चौकसी करून रा। अबाजी माहादेव कल्याणांत देखिरेखीस ठेविले ते समई मर्दबाण व वरकड लोखंडी जिनस किलोकिलियास रवाना केली राजश्री स्वामी घाटावरी येऊन राजगडी राहिले सिवापटण वसविले कल्याणात ठाणे बसविले कोकण कबज जाले किले

प्रबळगडावरी लोक ठेऊन बेहबुदी केली त्यावरी अफजलखान विज्यापुरीहून यां राज्यावरी मोहिमेस आले त्याणी पातशाही फर्मान मावळच्या देशमुखांस पाठविले कीं जमावानसीं सामील होणे त्यास केदारजी खोपडे अगोधर त्याजवळ होते खंडोजी खोपडे मागे होते ते हि अफजलखानाकडे गेले तेव्हा कान्होजी ना॥ यार्णी राजश्री स्वामीस विनंतीपत्र लिहिले तेथून जाब आला की बालेभाक घेऊन लेकास पाठवणे अथवा तुम्हीं विचार पाहोन जावयाचे तरी जाणे यैसा जाब आला त्यावरी कान्होजी ना॥ पांच जण लेक बा॥ घेऊन राजश्री स्वामीच्या दरशनास सिवापटणास गेले भेटी जाली येकांती बैसोन बोलिले माहाराजानी शफत घेऊन साहेबाचे शेवेसी पाठविले तो इमान आपला खरा आहे खासा व पांच जण लेक व आपला जमाव देखील साहेबापुढें खस्त होऊं तेव्हा आमचे वतन कोणे खावे आम्ही इमानास अंतर करणार नाही तेव्हा राजश्री स्वामी बोलिले की वतनास धका बैसेल तेव्हा कान्होजी ना॥ बोलिले की साहेब कामासांटी आपण वतनास पाणी सोडिले तेव्हा राजश्री स्वामी बोलिले की वतनास पाणी सोडणे मग बोली करणे तेव्हा पाणी हातावरी घेऊन राजश्री स्वामीचे आज्ञेने वतनास पाणी सोडिले त्यावरी बोलिले की तुमचा कबिला कारीस आहे तो ढमढेरियाच्या तळेगांवास पाठवणे ते गोष्टी यांणी मान्य केली दादाजी कृष्ण यास कल्याणचा हवाला होता त्यांस आणविले आणि त्यांचा कबिला व आपला कबिला कारीहून आणून त्यावा॥ तलेगावांस पाठविला तेव्हा दुधभात जेऊन बेलरोटीवर हात ठेऊन शफत दिल्ही तेव्हा राजश्री स्वामीनीहि शफत दिल्ही की तुमचे व तुमच्या वंशाचें आम्हीं चालवावे व आमच्या वंशाने तुमच्या वंशाचे चालवावे यैसें बोलोन भाक दिल्ही फते जालियावरी तुमचे सर्वश्वे ऊर्जित करून यैसे बोलिले दादाजीपंताचे पुत्र रखमाजीपंत यांस नाइकानी आपणाजवल ठेविले त्यावरी राजश्री स्वामीनी हुकूम केला की वरकड मावळचे देशमुख व तुम्ही येके जागा बैसोन त्यांचा मुदा मनास आणवणे त्यावरी कान्होजी ना॥ व अवघे मावळचे देशमुख येके जागा बैसले तेव्हा अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार काये तो सांगणे तेव्हा बोलिले की आम्हीं राजश्री स्वामीच्या पायासी इमान धरून वतनास देखील पाणी सोडिले आम्हीं व आपले लेक देखील राजश्री स्वामीपुढे खस्त हावे यैसा आमचा दृढ विचार आहे तुमचा मुदा काये तो बोलणे मुसलमान बेइमान आहे कार्य जालियावरी नस्ते निमित्य ठेऊन नाश करील हे मऱ्हाष्ट राज्य आहे अवघियानी हिमत धरून जमाव घेऊन राजश्री स्वामी संनिध राहोन येकनिष्ठेने शेवा करावी यैश्या हिमतीच्या गोष्टी सांगितल्या तेव्हां अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार तोच आमचा विचार इमान पुरस्कर आहे यैसे बोलिले तेव्हा अवघे

देशमुख घेऊन राजश्री स्वामीसंनिध आले अवघ्यानी शफत केली मग अवघ्यास भोजनास घातले त्यावरी अगदी मावलचा जमाव केला राजश्री पंताजी गोपीनाथ हेजिबीस पाठविले प्रतापगडाखाले भेटी घ्यावी येसी बोली केली त्यावरी राजश्री स्वामी जमावासहवर्तमान प्रतापगडास आले कान्होजी ना। याचा जमाव वरकड देशमुखाचा जमाव जाउलीस ठेविला बादलाचा जमाव मौजे दरे येथें ठेविला हैबतराउ सिलिबकर व बाळाजी ना। सिलिबकर जमाव देखील बोचेघोलीचे घाटी ठेविले राजश्री स्वामी किलियावरी गेले तेव्हा कान्होजी ना। यांस किलियावरी बोलाविले आणि अंतस्ते विचार केला की तुमचा भरवसा सर्व विशई आहे वरकडाचा इतबार वाटत नाहीं मुसलमान बेइमान आहे फते जाली तरी किलियावरी तीन आवाज इशारतीचे होतील तेव्हा पारावरी चालोन घेणे कदाचित फते न जाली आणि आम्ही त्यांचे हाती लागलो तरी तुम्ही खासा व आपला जमाव वरघानी पासून मार्गावरी ठेवणे लस्करचे लोक चढो न देणे काल कला तरी तुम्हीं खासा व आपला जमाव घेऊन मारामारी करून आम्हांस त्यापासून आपल्या जवळ जमावांत घेणे आम्ही तुम्हांत सामील जालो म्हणजे गनीम गर्देस मेळऊ येसी बोली करून मागती शफत घेतली तेव्हा कान्होजी ना। बोलिले की येक चोपदार खानाजवल मागोन घेऊन आम्हाजवल ठेवावा चोपदार असिला म्हणजे कज्या होणार नाही लस्करचे लोक चढो देणार नाही आज्ञेप्रमाणें शेवा करून येसे बोलिले त्यावरी खानाजवल चोपदार मागोन कान्होजी ना। यांजवल ठेविला गडानजीक सदर केली होती तेथे विकारी सवछरी शके १५८१ कार्तिक मासी अफजलखान येके पालखीनसी व हुदेकरी हेजीब घेऊन सदरेस आले राजश्री स्वामीनी लोकाची निवड करून चौक्या बसवीत हेजीब व हुदेकरी घेऊन भेटीस आले भेटीचे समई अफजलखानाने राजश्री स्वामीची मान बगलेस धरिली तेव्हा राजश्री नी पंज्यास पोलादी वागनखे पज्यास घातली होती त्याचा मारा करून आंतडी बाहेर काढिली तेव्हा मान अंसडून पटा राजश्री नी हाती घेतला अफजलखान पालखीत घालून पळऊं लागले हेजीब व हुदेकरी यांणी राजश्री वरी हतेर धरिले पंताजी गोपीनाथ यांस जखम लागली तेव्हा जीव माहाला व सर्जाराऊ व लोक येऊन हेजीब व हुदेकरी मारिले आणि पुढे जाऊन पालखीच्या भोयांच्या पद्या मारिल्या पालखी राहिली राजश्री स्वामी आलियावरी अफजलखानाचे सीर कापविले त्यावरी इशारती तीन आवाज किलियावरी जाले ते समई कान्होजी ना। हे जमाव देखील व देशमुखाचा जमाव पारावरी चालोन गेले मारामारी करून घोडी हती नगारे नोबती बिशादी खजाना पाडव केला घोरपडे हुमदारीस होते पे पनासाश्वारानसी कोईनकाठे पळोन गेले फते जाली राजश्री स्वामी पारास आले खंडोजी खोपडे

पळोन रानात दडोन राहिले राजश्री स्वामींनी देशमुखांचा लोकांचा दिलासा केला आणि बोलिले की वतनदारात संचणी खंडणीचे पान आधी दमालियास दिल्हे आहे वतनदारामध्ये तरवारेचे पान आधी तुम्हांस दिल्हे यैसे राजश्री स्वामी बोलिले राजश्री स्वामींनी घोडी हाती बिसादीचा जाबिता करविला खजाना घेऊन किलियावरी गेले खंडोजी खोपडे यांणी हैबतराऊ सिलिंबकर जावाई याकडे पोरगा पाठविला मागून आपण आले याउपर आमचा विचार काय राजश्री स्वामीचे अभय घेणे यैसे बोलिले त्यावरी हैबतराऊ सिलिंबकर जाउलीस कान्होजी ना॥ यांजकडे आले खंडोजी खोपडियाचे वर्तमान सांगितले आणि बोलिले की तुमची भीड राजश्री स्वामीजवल आहे खंडोजी खोपडे यांचा जीव वतन वांचऊन येश घेणे यैसे बोलिले त्यावरी कान्होजी ना॥ किलियावरी गेले येकांती बैसोन खंडोजी खोपडे यांचे वर्तमान सांगितले की त्यास अभय द्यावे त्यास राजश्री स्वामी बोलिले की तो हरामखोर त्यास वतनास ठिकाण नव्हता त्याची वतनावरी स्छापना केली निमे वतन सिका दिल्हा केदारजी खोपडे त्यामुळे इदलशाहीत गेले यैसे असोन त्याणे बेइमानी करून अफजलखानाकडे जाऊन लबाडी केली आणि हतेर धरिले तो हरामखोर त्याची च्यार घडे चौ मार्गी टाकावी त्याची रदबदल तुम्हीं न करणे त्यास कौल देत नाही यैसे बोलिले रदबदल यैकेनात तेव्हा कान्होजी ना॥ उभे राहोन अर्ज केला कीं खंडोजीचा गुन्हा आम्हांस द्यावा आणि त्याचा जीव वाचवावा वतन चालवावे यैसी अतिशयाची रदबदल केली त्यास राजश्री स्वामी बोलिले की तुम्हीं भीड घातली यास उपाय नाही तुमचे भिडेकरिता मान्य केले त्यास आणवणे तेव्हा खंडोजी खोपडियास आणूना मजुरा देविला राजश्री स्वामी काही बोलिले नाहीत त्यावरी कान्होजी ना॥ यांणी निरोप घेऊन खंडोजीस घेऊन खाले आले येक वेल मजुरा जाला याकरिता परभारे राजश्री स्वामीस मजुरा करावयास जाऊ येऊ लागले राजश्री च्या चितांत राग होता येके दिवसी हुकूम करून खंडोजीचा उजवा हात व डावा पाय कापविला आणि शास्ती केली हे वर्तमान कान्होजी ना॥ यांस कळले त्यांणी खंडोजीस रानातून आणून हातपाय तळिला आणि राजश्री स्वामींच्या दरशनास किलियावरी गेले आणि रुशवियाची बोली केली की खंडोजीस अभय देऊन शास्ती केली तेव्हा आमचे रदब[द]लेची भीड काय राहिली त्यावरी राजश्री स्वामींनी कान्होजी ना॥ यांस समाधानाच्या गोष्टी सांगितल्या की तुमचे भिडेकरिता खंडोजी जिवे मारिला नाही ज्या हाते तरवार धरिली तो हात कापिला ज्या पायाने चालोन गेला तो पाय कापिला तुमचे भिडेवरी त्याचे वतनहि चालऊन यैसे बोलोन समाधान केले खाले आले फते जालियावरी शाहिरानी पवाडा केला त्यांत हनु-

मग अगद रघुनाथाला जेधे बादल राजश्री सिवाजी राज्याला व वरकडहि देशमुखाची नावे घालून पवाडा दरबारी गाइला राजश्री स्वामींनी यैकोन खुशाल जाले शाहीरास सिरपाव बकसीस दिल्हे अफजलखानाच्या सिरास पिंजरा करून त्यात घालून राजगडच्या बाले किलाच्या दरवाजियावरी कोनाडियात ठेवावयास पाठविले पूजा नैवेद्य चालविला त्यावरी शके १५८२ विकारी संवछरी चैत्रमासी शुध प्रतीपदेस राजश्री स्वामी किले पनालियास आले पनालियास सिदी जोहार येऊन वेढा घातला राजश्री स्वामी किलियावरून उतरून खिलणीयास येऊ लागले तेव्हा सिदीजोहार पाठीवरी आला ते समई बादलाचा जमाव व बाजी परभु देशपांडे गजापूरचे घाटी ठेऊन राजश्री खीलणीयास गेले बाजी परभु याणी व लोकानी युध्याची शर्ती केली बाजी परभु व काही लोक पडिले गनीम चढो दिल्हा नाही सिदी जोहार माघारा गेला राजश्री स्वामींनी बादलाच्या लोकांचा दिलासा केला त्यावरी राजश्री स्वामी कान्होजी ना॥ यासी बोलिले की बाजी परभु देशपाडे पडिले बादलाच्या लोकानी युध्याची शर्ती केली तेव्हा नाईक बोलिले की ते लोक तैसेच आहेत त्यास राजश्री बोलिले की तुम्हास अफजलखान मारिला ते समई तरवारेचे पान अगोधर तुम्हांस दिल्हे आहे तें बादलास अगोधर पान द्यावे त्यांवरी तुम्हीं घ्यावे यैसी गोष्टी मान्य करणे तेव्हा कान्होजी ना॥ बोलिले की स्वामीस अगत्य याकरिता आम्हीं गोष्टी मान्य केली या प्रमाणेच स्वामींनी चालवावे यैसे बोलिले पानाचा तह जाला त्यावरी शके १५८५ शोभकृत संवछरी चैत्र शुध अष्टमी रवीवारी लोकाची निवडी करून पुणियात राजश्री स्वामींनी खासा दाहा लोकानसी लाल माहालात जाऊन शास्ताखानावरी छापा घातला बा॥ कान्होजी ना॥ यांचे पुत्र चांदजी जेधे होते मारामारी जाली तेव्हा शास्ताखानाचा हात तुटला मग पळोन गेला त्याचा लेक अबदुल फते ठार जाला त्याउपरी स्वामी परसातील दिंडीने बाहीर निघाले तों सर्जाराऊ जेधे घोडियावरी बैसोन पागेचा घोडा दुसरा खासदाराजवल देऊन दिडी समीप आज्ञेप्रमाणें राहिले होते राजश्री स्वामी येताच घोडियावरी बैसोन मुठा उतरोन जरेसाकडे निघाले जागाजागा लस्करच्या टोळ्या व करणे नगारे ठेविले होते त्याची गुली मोगलाच्या लस्करात जाली राजश्री स्वामी हशमाच्या व लस्करच्या जमावानसी दुसरे दिवसी सिहगडास आले शास्ताखान कुच करून गेला शके १५८६ क्रोधन संवछरी जेष्ट शुध चतुर्दसीं सोमवारी जसवतासिंगाने कोंढाणाचा वेढा काढिला त्याचा सुबा तगीर होऊन जयेसिंगास जाला शके १५८७ विश्वावसु सवछरी मिरजा राजा व दलेलखान पुरंदरास वेढा घालून बैसले आषाढ शुध १० राजश्री स्वामी येऊन भेटले सतावीस किले दिल्हे सला केला राजश्री संभाजी राजे यांस पंच हजारी देऊन चाकर केले बा॥ सर्जाराऊ जेधे

होते फालगुन शुध नवमी सोमवारी राजश्री सिवाजी राजे व संभाजी राजे औरंगजेबाचे भेटीस गेले शके १५८८ पराभव संवछरी जेष्ट शुध द्वितीया राजश्री स्वामी आगरियास जाऊन पातशाहाची भेटी घेतली बिघाड होऊन राजश्री स चौक्या बसविल्या त्यावरी श्रावण वद्य द्वादसीस पेटारियात बैसोन राजश्री स्वामी व संभाजी राजे पळाले ते मार्गशीर्ष शुध पंचमीस राजगडास राजश्री स्वामी आले राजश्री संभाजी राजे मथुरेस विस्व:सराऊ ब्राह्मण होते त्यांचे घरी ठेविले होते त्यांसहि विस्वासराऊ घेऊन आले सर्जाराऊ जेधे हि राजगडास आले त्र्यंबकपंत दबीर व रघुनाथपंत कोरडे आगरा धरिले शके १५८९ प्लवग सवछरी चैत्र वद्य पंचमीस त्र्यंबकपंत व रघुनाथपंत सुटोन राजश्री स्वामीकडे आले मोगलाचे सख्य जाले सरदेशमुखीवतन दिल्ही भिवरे अलीकडे मुलूक दिल्हा त्यावरी मागती दो चौ वर्षा सतावीस किले फिरोन राजश्री स्वामीनी घेतले त्यावरी शके १५९८ नल संवछरी हुसेनखान माइना यासी लडाई जाली ते समई हुसेनखान हतीवरी बैसोन गावाच्या आश्रियास पळोन जात होता ते समई सर्जाराऊ जेधे यांचे पुत्र नागोजी जेधे घोड्यावरी बैसोन पुढे जाऊन हतीच्या गंडस्थळांत भाले देऊन हती मुरडिला ते वेळे हसनखान माइना याणे कपाळावरी तीर मारला तो पार जाला हती मुरडताच लस्कराने जाऊन हुसेनखान धरिला त्यावरी नागोजी जेधे यांचा तीर उपडताच मृत्य पावले सर्जाराऊ समीप होते राजश्री स्वामी श्रमी जाले नागोजी नाा याची स्त्री कारीस सती निघाली त्यावरी राजश्री स्वामी कारीस येऊन नागोजी नाईक याचे मातुश्री तुलजाबाई यांचे समाधान केले प्रतिवर्षी येक सेर सोन द्यावयाची मोईन केली ते साल दरसाल पावत होते त्यावरी शके १५९९ पिंगल संवछरी चैत्रमासी राजश्री स्वामी यांणी चंजी घेतली बाा सर्जाराऊ होते अश्विनमासी राजश्री रघुनाथपंतास मजमु दिल्ही लाख होन बकसीस दिल्हे साहेब सुबा सांगोन चंजीस ठेविले जनार्दनपंत समागमे घेऊन मजल दरमजल राजश्री स्वामी या प्रांते आले त्यावरी लस्करानसी जालन्हापुरची स्वारी करून पटियास आले त्या किलयाचे नाव विश्रामगड ठेविले बाा सर्जाराऊ होते त्यावरी रायेगडास आलियावरी रौद्र संवछरी शके १६०२ चैत्र शुध पौर्णिमेस मंदवारी दो प्रहरा राजश्री सिवाजी राजे यांस कैलासवास जाला त्यावरी राजश्री संभाजी राजे तख्ती बैसले राजश्री रघुनाथपंत चंजीहून या प्रांतास आले राजश्री स्वामीची भेटी जाली त्यावरी दो चौ वर्षा रघुनाथपंत व जनार्दनपंत मृत्य पावले कविकलश दिवाण कारभारी जाले राजश्री संभाजी राजे यांस गांगोलीस पुत्र जाला शके १६०४ दुंदुभी संवछरी वैशाख वद्य ७ सप्तमी गुरुवारी जन्म जाला नाव सिवाजी राजे ठेविले त्या अगोधर दुर्मति संवछरी शके १६०३ कार्तिक शुध त्रयोदसी रविवारी पातशाहापुरी

राजश्री संभाजी राजे यांची व अवरंगजेबाचे पुत्र अकबर यांची भेटी जाली त्यावरी औरंगजेब पातशाहाची या राज्यावरी मोहीम जाली पातशाहा अमदानगरास आले किले रामसेजेस वेढा घालावयास शाब(हा!)दीखान पाठविला वेढा घातला धमधमे गनीमाने बाधोन बहुत लगट केला परंतु राजश्री केसो त्रिमल पेशवे याणी त्र्यंबकगडी राहोन सामा पुरविला हरभातेने मदती केली सा महिने किला भाडविला किला न ये याकरिता पातशाहानी शाब(हा!) दीखानास बोलाऊन नेला जागाजागा या राज्यांत ठाणी बैसविली आणि मजल दरमजल कुच करून विज्यापुरास जाऊन वेढा घातला क्षय संवछरी शके १६०८ अश्वीन शुध७ सोमवारी विजापूर घेतले सुलतान सिकदर पातशाहा भेटले प्रभव संवछरी शके १६०९ भाद्रमासी शुध १२ द्वादसीस भागानगर घेतले त्यावरी विभव संवछरी शके १६१० या राज्यावरी पातशाहाची मोहीम जाली राजश्री संभाजी राजे यांणी सर्जाराऊ जेथे व त्यांचे भाऊ देखील राजश्री पंतप्रधान यांजवल राजमाचीस शेवेसी ठेविले तेथे सेवा करीत होते त्यास पातशाहा मजल दरमजल तुलापुरास गेले शेख निजाम यास फौजेनसी संभाजी राजे याजवरी रवाना केले त्याणे संगमेश्वरास येऊन राजश्री संभाजी राजे व कविकलश यास माघ वद्य ७ शुक्रवारी सेख निजामाने धरून तुलापुरास नेले तेथे पातशाहानी उभयतास जिवे मारिले राजश्री राजाराम रायेगडी अटकेत होते ते बाहेर काढून मंचकावरी बैसऊन राज्याभिषेक केला शके १६११ शुक्ल संवछरी जुलपुकारास रवाना केले राजश्री राजाराम निघोन रायेगडीहून प्रतापगडास आले दुश्काल बहुत पडिला चैत्रमासी शुध १५ पौर्णिमेस जुलपुकारखान नाव इतकादखान होते ते रायगडास वेढा घालून बैसले राजश्री राजाराम निघोन मजल दरमजल कर्नाटकात चंदीस गेले मार्गशीर्ष शुध २ रविवारी रायेगड मोगलास दिल्हा राजश्री सभाजी राजे याचे पुत्र राजश्री सिवाजी राजे यांस तुलापुरास नेऊन पातशाहास भेटविले पातशाहा मेहरवान होऊन हफ्त हजारी सांगितली नाव शाहुराजे नाव ठेविले आणि आपल्या संनिध जालीमध्ये ठेविले त्यावरी किले गनीमाने घेतले सर्जाराऊ जेधे व त्याचे भाऊ देखील राजमाचीहून निरोप घेऊन वतनावरी आले*

---

* हा करीना भाद्रपद व. ११ शके १८४६ रोजीं भा. इ. सं. मंडळाच्या पाक्षिक बैठकींत वाचण्यांत आला. त्यावेळीं ही नकल मुळाशी रुजू पाहून नंतर मूळ करीना परत जेधे यांजकडे पोचविण्यासाठीं रा. ग. स. जोशी यांजकडे देण्यांत आला.

# ( ५ ) शिवजन्माचें वर्ष.

( इतिहास सं० वि. का. राजवाडे राधा-माधव. चंपू पृ. ५६ )

२८ शहाजी विजापूरकरांकडे १५४७ त गेलेला पाहून आदिलशहा व मोंगल यांची कास धरलेला जाधवराव त्याच सुमारास निजामशाहींत मलिकंबराच्या कारवाईनें पुनः परत आला. त्या कालीं एका राज्यांतून रुसून दुसऱ्या राज्यांत जाण्याचें व तेथून प्रसंग पाहून परत येण्याचे कृत्य अनीतीचें व कमीपणाचें मानीत नसत. स्वतः मलिकंबराने वेळ पडेल त्या प्रमाणें आदिलशाही व मोंगलाई यांचा आश्रय कितीदां तरी केला होता. खुरम, लोदी, रणदुल्लाखान, शिवाजीचा पुत्र संभाजी, अवरंगजेबाचे पुत्र, अकबराचे पुत्र, इत्यादि अनेक इसमांच्या धरसोडीचीं उदाहरणें जगजाहीर आहेत. जाधवराव निजामशाहींत आल्यावर मलिकंबरानें शहाजी राजाला वठणीस आणण्याची मनाजोगती कामगिरी त्याला सांगितली, आणि आपण स्वतः आदिलशहानें लुबाडलेला धारूर प्रांत काबीज करण्याच्या तयारीस लागला. आदिलशहा व शहाजी यांच्या वरील या दुतोंडी योजनेच्या विचारांत व तयारीत असतां मलिकंबर शक १५४८ च्या वैशाखांत वारला. मलिकंबराचा जांवई जो विजापूरचा मुस्तफाखान त्याचें तर म्हणणें असें होतें कीं, आपल्या श्वशुराला मूर्तिजाशहानें करणी वगैरे करून मारिलें [ साने, पत्रें, यादि ४३८ ]. आणि हे म्हणणे खरें नसेलच असें म्हणवत नाहीं. मलिकंबराने मूर्तिजाला गेलीं सव्वीस वर्षे इतके कांहीं छळलें होतें कीं, त्याचा त्यानें प्राण घेतला असल्यास तो देवाच्या घरीं अपराधी ठरण्यास बरीच अडचण पडली असेल. मलिकंबराच्या मरणाने धारूरवरील स्वारी लांबणीवर पडली. शहाजीवरची जाधवरावाची स्वारी १५४८ च्या पावसाळ्यानंतर सुरू होऊन जाधवरावाच्या रेट्यापुढें शहाजी माहुली जुन्नर, पारनेर, करकंब, मंगळवेढे या रस्त्याने आदिलशाहींत शक १५४९ च्या चैत्राच्या सुमारास रेटला गेला. ह्या बापआजांच्या रेटारेटीनंतर शिवाजीराजे भोसले यांचा जन्म शिवनेरीस १५४९ च्या वैशाखांत झाला असें बहुतेक नव्याजुन्या लेखकांचें म्हणणे आहे. जेधे शकावलि व बृहदीश्वर शिलालेख शिवाजीचा जन्मकाल शक १५५१ फाल्गुन वद्य ३ देतात. दोहोंतून खरें साल कोणतें तें ठरविण्याला निश्चित प्रमाण उपलब्ध आहे. त्या वरून शक १५४९ हें साल शिवजन्माचें धरणें योग्य दिसतें. कां कीं, शक १५५१ च्या चैत्रापासून आश्विनापर्यंत शहाजीवर जुन्नरमाहुली प्रांतांत कोणी हि स्वारी केली नाही व स्वारी करणारा म्हणून म्हटलेला जो लुखजी जाधवराव त्याचा खून मूर्तिजानें शक १५५१ च्या आश्विनी पूर्णिमेस केला होता.

# ६ शिवापूर दप्तरांतील यादी
## ( राजवाडे संग्रह )

श्री

शिवापूर

यादी कारकीर्द शक संवत्सर याची

शके १५७० सर्वधारी संवत्सरे श्रा। वद्य प्रतीपदा माहाराज शाहाजी राजे धरले

शके १५७६ जय संवत्सरे कार्तिक वद्य १२ संभाजी राजे यास पुत्र उमाजी राजे जाले

शके १५७७ मन्मथनाम संवत्सरे पौष वद्य १४ जावली घेतली

शके १५७८ दुर्मुखी संवत्सरे चैत्र शु॥ १५ जावलीहून स्वार जाले

चैत्र वद्य सप्तमीस रायरीस आले

भाद्रपद वद्य त्रितीया चंदरराव मोरे पलाले

भाद्रपद वद्य येकादसीस गडाची नावे ठेविले

अश्वीन वद्य १ संभाजी मोहिते धरले

भाद्रपद शु॥ शष्ठीस गायकवाडाचे सोइरीकेचा सिधांत आला

शके १५७९ हेमलंबी संवत्सर चैत्र वद्य १० बेदर घेतले

वैशाख शु॥ ५ जाधवासी सोइरीक केली

वैशाख वद्य १२ जुनराकडे मोगलावर स्वारी केली

ज्येष्ठ शु॥ १२ संभाजी राजे पुत्र जाले

आषाढ शु॥ ३ नगरचे युध जाले

श्रावण शु॥ १ रघुनाथपंत राजपुरीस गेले

आश्वीन शु॥ सप्तमी कल्याणाकडे गड पाहावयास गेले

पौष वद्य ५ गडास आले

शके १५८० विलंबी संवत्सरे फालगुण वद्य १३ किल्याहून सिवापटणास आले

शके १५८१ विकारी संवत्सरे भाद्रपद वद्य १३ सईबाई वारली

आश्वीन शु॥ ७ आबजलखान मारले

मार्गसीर्ष वद्य ९ पनाला घेतला

वद्य १३ पन्यालयावर गेले

पौश वद्य दशमी रुस्तुमजमा मोडिला

माघ शु॥ १४ विजापूरप्रांती स्वारी केली

शके १५८२ शार्वरी संवत्सरे ज्येष्ठ शु॥ ८ वासोटा घेतला

पौष शु॥ १२ मोरोपंतास मुजमु दिल्ही

माघ शुा ४ कोकणात उमरखंडीस भांडण जाले
शके १५८३ प्लवसंवत्सरे वैशाख शुा ११ शृंगारपूर घेतले दलवी होते
भाद्रपद शष्टीस पेशवे मजमदार व अंणाजीपतास वाकेनिसी देऊन पालख्या दिल्ह्या
भाद्रपद नवमसि संकवारबाई कन्या जाली
शके १५८४ शुभकृत संवत्सरे चैत्र वद्य १० मोरोपंत पेशवाई निलोपंत मुजमु आणापत सुरनी [स] जाले
शके १५८५ शोभकृत संवत्सरे चैत्र शुा ८ शास्ताखान मारिले
चैत्र वद्य १ कोकणात गेले
मार्गसीर्ष वद्य २ सुरतेस गेले
पौष शुा १२ त्रिंबकराज दर्शन
पौश वद्य ८ माघरे आले
माघ शुा पंचमीस शाहजी राजे समाप्त जाले
माघ ४ राजगडास आले
शके १५८६ क्रोधी संवत्सरे चैत्र वद्य १३ सिंव्हगडी सुलतान ढोवा मारला
जेष्ट शुा ६ सिंव्हगडाखाली भाडी उतरली
जेष्ट शुा १४ जसवंत उठोन गेला
जेष्ट वद्य १ सिंव्हगड पाहावयास गेले
पौश वद्य आमावास्या सूर्यग्रहण जिजाबाईची तुला केली
फालगुण शुा ३ नावारोहण बसनूरची स्वारी
शके १५८७ विश्वावसु संवत्सरे चैत्र वद्य १० तांत्र पुरंधरास आले
वैशाख शुा ११ रुद्रमाल घेतली
जेष्ठ शुा ६ जाउलीस गेले
आक्षाढ शुा १० जयसिंगाची भेट जाली
आषाढ शुा १२ दिललखानाची भेट जाली
फालगुण शुा ९ दिलीस स्वारी जाली
शके १५८८ पराभव संवत्सरे वेंकाजीपंत अनंदराव कार्तीक वद्य १ प्रतीपदा स्वार जाले
मार्गसीर्ष वद्य दशमी दिलीहून आले
शके १५८९ प्लवंग संवत्सरे आश्वीन शुा १ कुडालास गेले
कार्तीक शुा २ संभुराज प्रयाण देवगिरीस

कार्तीक वद्य ५ जसवंत भेटी
कार्तीक वद्य शष्टी शाहाज्यादा दर्शन
कार्तीक वद्य १३ अवरंगाबादेहून प्रयाण
शके १५९० कीलक संवत्सरे श्रावण शुा ८ कडतोजी गुजर व नीराजी राहुजी स्वार जाले
शके १५९१ सौम्य संवत्सर माघ वद्य ९ सिव्हगड घेतला
फालगुण पुर्णिमा पुत्र जाला
फालगुण वद्य १२ पुरंधर घेतले
शके १५९२ साधारण संवत्सर चैत्र शुा ९ निलोपंत रवाना केले
ज्येष्ट शुा ४ लोहगड घेतला
आशाढ शुा २ रोहिडा घेतला
**आशाढ शुा ८ हिंदोला घेतला**
आशाढ शुा नवमी माहुली घेतली
**आशाढ शुा १४ कर्नाला घेतला**
**माघ वद्य येकादसीस संभाजी राजे यास कारभार सांगितला**
सके १५९४ परिधावी संवत्सरे जेष्ट वद्य ५ जवार घेतली
**पौष वद्य १४ आणाजीपंत रवाना केले**
**पौष वद्य शष्टी राजे स्वार जाले**
शके १५९५ प्रमादी संवत्सरे चैत्र वद्य १० परली घेतली
श्रावण वद्य नवमीस सातारा घेतला
**आश्वीन शुा ७ पांडवगडी मावले**
आश्वीन शुा १३ साताारियास राजे आले
**बालप्रभूस पालखी दिल्ही**
माघ वद्य १४ सिवरात्रीस प्रतापराव समाप्त जाले
शके १५९६ आनंदनाम संवत्सरे चिपळुणी कटकाचा अरगजा करून बंद केला सिष्टास निरोप दिल्हा
जेष्ट शुा ४ राज्याजी मुंज जाली
जेष्ट शुा ६ मंत्रविवाह
जेष्ट शुा द्वादसी राज्याभिषेक सिव्हासनारूढ जाले
जेष्ट वद्य नवमी जिजाबाई समाप्त जाली
**आश्वीन शुा ५ पुन्हा सिव्हासनारोहण**
माघ वद्य ५ सभाजी राज्याची मुंजी
**आश्वीन शुा ६ प्रतापगडी देवालयावर वीज पडली**

शके १५९७ राक्षस संवत्सरी स्वारी सातारा आली शरीरी व्यथा जाली
शके १६०१ चैत्र शुा १ कोपल घेतले वद्य प्रतीपदेस बाहदु [र] बिंडा घेतला
वैशाख वद्य द्वितीयेस भूपालगड घेतला
पौष वद्य ७ सभाजी राजे मोगलाइतून आले
फालगुण वद्य नवमी राजाराम विवाह गुजरासी सोइरीक
शके १६०२ रौद्र नाम संवत्सरे चैत्र पौर्णिमेस सिवाजी राजे समाप्त जाले
वैशाख वद्य ३ राजाराम मंचकावर बसले
पनाल्याची मोहीम मोरोपंत
वैशाख वद्य त्रयोदसी रायगडी धराधर जाली
आशाढ शुा द्वितीयेस संभाजी राजे रायगडी आले येकादसी पुतलाबाई अग्निप्रवेश
श्रावण शुा ५ मंचकारोहण
कार्तिक शुा सप्तमीस केलसीस स्वारी जाली त्रयोदसीस गडास आले
मार्गसीर्ष शुा १० पुत्र सयाजी राजे जाले
माघ शुा सप्तमीस सिंव्हासनारूढ राज्याभिषेक जाला
सदरहु कारकीर्द शक संवत्सर आढलले ते लेहून पाठविले आहेत खमस २ जिल्हेज चैत्र शके १७२३ रौद्र संवत्सरे

---

# ७ शिवापूरकर देशपांडे वहीतील शकावली.

ही शकावली व खं. १८ ले. ५ मध्ये ज्या एका त्रुटित शकावलीचीं कांहीं पानें छापिली आहेत ती शकावली आणि जेधे शकावली (पृ. १६-३९) ह्या तीनहि शकावल्यांतून आलेल्या प्रसंगांसंबंधाचें, तसेंच कमज्यास्ती विशेषाचें सक्षेपतः विवेचन शेवटीं स्वातंत्र्यानें केलें आहे येथे जेधे शकावलीपेक्षां जो मजकूर अधिक किंवा वेगळा आहे तो जाड टाइपांत दाखविला असून जेथें कमी मजकूर आहे तेथें आंकडा घालून तो भाग खालीं टीपेंत दाखविला आहे.

शके १५४६ रक्ताक्षी नाम संवत्छरे

कार्तिक मासात भातवडीस मोगलाचा सुभेदार लस्करखान व येदलशाही मलिक आंबरे सोलापुरास वेढा घालून विज्यापुरकरा पासोन किला

मुला महंमद यैसा **बेनिकट करुन**(१)  (२) घेतला कलम १
मालिक आंबरे बुडविली कलम १

शके १५४७ क्रोधन संवछरी जाहागिर पातशाहावरी त्याचा लेक सुलतान खुरुम रुसान निज्यांमशाईमधे (३)मलिक आंबरे ठाव दिल्हा  कलम १

शके १५४८ क्षय संवत्छरे वैशाख वा।(४) १२ स मलिक आंबर परलोकास गेले  कलम १

शके १५५० विभव नाम संवत्छरे सुलतान खुरुम पातशाईस **बैसले हुमुस**(५) नाव शाहाजाहा नाव ठेविले  कलम १

शके १५५१ शुक्ल नाम संवत्छरी फाल्गुन वा। ३ शुक्रवार

चैत्र मासी इभ्राम इदलशा परलोकास गेले सुलतान महमंद शाह तख्ती बैसले  कलम १

**पौष वा॥ १३ त्रयोदसीस फतेखानास सोडून मज्यालसी दिल्ही** (७) **कलम १**

खवासखान(६)**श्वाध्धीन** जाहले मुरार जगदेराऊ कारभारी जाले कलम. १

येके दिवसी राजश्री सिवाजी राजे उपजले व श्रावण शु॥ १५ लुखजी जाधवराऊ निज्यामशाही मारले कलम. १

शके १५५२ प्रमोद नाम संवत्सरी दुषकाल पडला (८)  कलम १

शके १५५३ प्रज्यापती नाम संवत्छरी फतेखान याणी बुऱ्हाण निजामशाहा मारला  कलम १

शके १५५४ आंगिराम नाम संवत्सरी

**जेष्ट मासी** (९) महमदखानाने वेढा

भाद्रपद मासी शाहजी राजे याणी

---

१ 'दोन कटके' जे. श. नकलकार बिनसाक्षेपी असल्यामुळे शिवकालीन मोडी वाचनाच्या त्याच्या अशा ढोबळ चुका ह्या शकावलींत बऱ्याच झालेल्या आहेत. 'बेनिकट करून' ह्या स्पष्ट व ठळक पण अर्थशून्य लिखाणाची नकल 'दोन कटके' अशी खास न होतां उलट 'दोन कटके' ह्या मोडी अक्षरांची 'बेनिकट करून' ही नकल होणें संभवेल. ह्या एकाहि उदाहरणावरून असे उघड ठरतें कीं, जेधे शकावली ही ह्या शकावलीची नकल खास नाहीं. २ जे. श. त हा शब्द नाहीं. ३ ह्या शब्दापुढें 'गेला त्यास निजामशाहीमध्यें' हे शब्द जे. श. त अधिक आहेत. ४ ही मिती येथे आहे, जे. श. त नाहीं. ५ 'दिलीस' जे. श. येथें टीप १ प्रमाणेंच प्रकार झाला आहे. + ह्या कलमाबद्दल स्वतंत्रपणें पुढें विवेचन केलें आहे. ६ 'प्रधान' जे. श. ७ हें कलम 'त्रयोदसी' ऐवजी 'येकादसी' ह्या फरकानें जे. श. त शके १५५२ मध्यें आलें आहे. ८ जे. श. त ह्या शकांत दुसरें कलम आहे तें

घालून दवलताबाद घेतली कलम १ पेमगिरीस निज्यामशाहावरी छत्र धरिले कलम १

शके १५५७ युवा नाम संवत्छरे शाहजी राजे माहुलीस गेले तेथे रणदुलाखान इदलशाई व खान जमा मोगलाचा सुभा जाऊन वेढा घालून निज्याम शाहा हाती घेतला शाहजी राजे ईदलशाई चाकर जाले (१०) कलम १

शके १५५८ धाता नाम संवत्छरे ता। शके १५६१ प्रमाथी नाम संवत्छरी बसवपटण इदलशाहनी घेतले कलम १

शके १५६५ सुभानु नाम संवत्छरी बाहादुरशाहा उपजले नाव शाहा अलम ठेविले कलम १

**( ११ ) शके १५६९ राजश्री बापुजी पंतानी किले सिंव्हगड घेऊन दिल्हे कलम. १**

शके १५७० सर्वधारी नाम संवत्छरे श्रावण वा। १ पदेस शाहजी राजे मुस्तफाखाने धरिले नजीक चंदी कलम १ (१२)

शके १५७१ विरोध नाम संवत्छरे जेष्ट शु १५ चे दिवसी शाहजी राजे याणी(१३) कोंढाणा गड घेऊन सोडिला कलम १

शके १५७६ जये नाम संवत्छरी संभाजी राजे यांस उमाजी राजे पुत्र जाले कार्तिक वा। १२ दसीस कलम १

शके १५७७ मन्मथ नाम संवत्छरी पौष वा। १४दसीस (१४)सिवाजी राजे याणी जाउली घेतली समागमे जधे बादल जमावानिसी नेले होते व लोकहि नेले कलम १

शके १५७८ दुरमुख नाम संवत्छरे

वैशाख मासी सिवाजी राजे याणी रायेरी घेतली कलम १ आश्वीन वद्यी राज्यानी सुपे घेतले कलम.१ मार्गसीर्ष मासी सुलतान महंमद येथी (दि)ल (१५)शाहा मृत्य पावले माघ शु।६ शनवारी(१६)

---

श. १५५१ मध्यें ७ हा टपिचा आंकडा असलेलें वर आलें आहे. ९ जे. श. त 'काजी' असें आहे. पण तें चूक आहे. १० जे. श. त 'ते समई रणदुलाखानानें कान्होजी जेधे नेले होते तेथें महाराजाजी भेटी जाली' हें वाक्य अधिक आहे. आणि तसे जेधे करिन्यांत पृ. ४० वर आहे. ११ हा शक व त्यांतील मजकूर जे. श. त नाहीं. १२ जे. श. त ह्यापुढे जेधे व लोहोकरे याबद्दलचा उल्लेख दोन ओळी अधिक आहे. करिना पहा. १३ येथें 'यासी' असें पाहिजे. बिजापुरच्या अदिलशहानें शहाजिस अटकेंत टाकलें, तें शिवाजीकडून सिंहगड आणि संभाजीकडून बंगळूर परत घेऊन मग शहाजीस सोडलें. करिना पृ. ४१ व शिवभारत

संभाजी मोहिता धरिला कलम १

गायकवाडसी सोईरीक केली सखवारबाईचे लग्न जाहाले कलम १

शके १५७९ हेमलंबी नाम संवत्छरी

चैत्र वा। ११ रविवार घटिका ८ आठ अवरंगजब याणी आदलशाह पासोन बेदर घेतले मि॥ (१७) अषाढ शु।३ गुरुवारी बेदर घेतले असे कलम १

वैशाख मासी राजश्रीनी जुनर लुटले कलम १

वैशाख शु।५ जाधवराऊ यांजकडील सोइरीक केली कलम १

ज्येष्ट मासी मैसिरखान (१८) यासी सिवाजी राजे यांचे युध्य आमंदाबद (१९) नगरी जाहाले कलम १

कार्तीक शु।१५ महंमद बटे साहेबवैशाख शु। १२ इंगळीयासी सोइरीक केली कलम १

ज्येष्ट शु।१२ गुरुवार घटिका १० दाहा(२०)सिवजी राजे यास संभाजी राजे पुत्र जाहले पुरंधरी जन्म जाहला कलम १

पौष मासी अवरगजब दिलीवरी चालिले व(२१)पौष शु।१५माहोली सिवाजी राजे याण घेतली क. १

कान्होजी(२३)नाो याजपासोन दादाजी कृष्ण व सखो कृष्ण मागून घेतले आणि कल्याण भिवडी प्रांते हावाले

---

पद्दा. अर्थात्, कोंढाणा घेऊन शहाजी यासी सोडिले असे पाहिजे. १४ जे. श. त नुसतें 'पौष चतुर्दसीस' असें आहे. १५ टी. १ पहा. १६ ही मिती जे. श. त नाहीं. रा. खं. १८ ले. ५ मधील शकावलींत आहे. हा उल्लेख जेधे घराण्यासंबंधीचा नाहीं; अथवा शिवापूरकर देशपांडे घराण्यापैकींहि नाहीं. भोसले घराण्यासंबंधीचाच असतांना जेधे शकावलीखेरीज खं. १८ व शिवापूर वहींतील शकावलींतच ज्या अर्थी हा उल्लेख अक्षरशः बरोबर आहे त्याअर्थी हें म्हणणे प्राप्त आहे कीं खं. १८मधील व शिवापूर देशपांडे वहींतील ही शिवशकावली ह्या एक होत. जेधे श. ह्यांपैकीं कोणाचीच नकल नव्हे. अर्थात् जेधे श. चीहि ह्या शकावल्या तर्जुमे नव्हत.

१७ जे. श. त हे दोन शब्द नसून 'घ्यावयाचा तह केला अणी बेदरास अले' असें वाक्य आहे. बाकी सर्व कलम बरोबर आहे. येथे व जे. श. तहि चैत्र व ११ स रविवार दिला आहे. पण जंत्रींत चैत्र व. १० स रविवार येत असून रा० शि. शकावलींत चैत्र व. १० हीच मिती दिली आहे.

१८ नौसिरखान पाहिजे. टीप नं. १ प्रमाणें चूक.

१९ अहमदनगर असे पाहिजे. बद हा टी. १ प्रमाणें लेखकप्रमाद आहे.

२० जे. श. त वार व घटिका दिलेल्या नाहींत. ह्या वहींत शिवजन्माप्रमाणे ह्याहि जन्मकाल शेवटीं पुनः स्वतंत्र दिला आहे.

णीने विज्यापुरी (२२) मारिला कलम १

सांगितले बबजी(२३) बापू सुभेदार येमाजी पंत आपले हतीचें राजश्रीचे हाती भाऊ म्हणोन दिल्हे कलम १

शके १५८० विलंबी नाम संवत्छरी पौष मासी फतेखान विज्यापुरी विष देऊन मारिला व श्रावण मासी बहलोलखान मारिला भाद्रपद शु १३ सोनाजी-पंतास दिलीस रवाना केले वस्त्रे दिल्ही कलम १

शके १५८१ विकारी नाम संवत्छरे

आवरंगजब तख्ती बैसले कलम १

मार्गसीर्ष शु॥७ गुरुवारी आठवे तासी प्रतापगडानजीक सिवाजी राजे याणी आफजलखानासी येकांगी करून आबजलखान जिवे मारिला सिर कापिले १

दिमत कान्होजी जेधे दि॥ लोक जमाव बांदलाचा जमाव मावळे दि॥ खांडोजी खोपडे कलम १

माघ शु॥ १४ विज्यापूर प्रांती राज्याने स्वारी केली कृष्णेच्या काठी नि-

श्रावण शु॥२ सिवाजी राजे जाउ-लीस अले भाद्रपद वा॥१४ सिवाजी राजे यांची स्त्री सईबाईस देवआज्ञा जाली १

मार्गसीर्ष वा॥ ९ सोमवारी रात्रौ घटिका ६ (२४) पनाला राज्याने घेतला कलम १

पौष वा॥ १० बुधवार रुस्तुमं जमा व हुलजीलखान (२५) यासी युध्य कोल्हापुराजवल जाहाले बारा हती व दोन हजार घोडी राजे याणी(२६)

---

२१ हा उल्लेख ह्या वहींत अगदीं नवीन आहे. माहोली घेतल्याचा उल्लेख जे. श. त १५९२ सालीं आला आहे आणि तसा तो पुढें ह्याहि शकावलींत आहेच.

२२ जे. श. त हा स्थलाचा निर्देश नाहीं.

२३ जेधे श. त. हें कलम येथल्याप्रमाणें संक्षेपांत नसून 'अश्वीन वद्य द्वादसीस अशी प्रारंभी मिती दिली आहे. आणि बबजीचे जागीं दादाजी; येमाजी-पंताबद्दल येसिजी गोपनाथ हीं नांवें आहेत. येथील शेवटचें वाक्य जे. श. व करिना पृ. ४२ वरून बरोबर उलगडतें.

२४ हा उल्लेख जे. श. त नाहीं.

२५ फाजिलखान पाहिजे. टी. १ पहा.

२६ जे. श. त 'राजश्री स्वामीकडे पाडाव जाली' असें आहे. आणि रुस्तुमजमानच्या ऐवजीं 'गनीम' पळोन गेला असें आहे.

गदक लखमीश्वरपर्यंत खंडणी घेतली कलम १

पांडाव केली रुस्तुमजमाव पलोन गेला कलम १

शके १५८२ शार्वरी नाम संवत्छरे

चैत्र शु॥ १ सिवाजी राजे फिरोन पनाळयास आले मग सिंदी जोहर येऊन पनाळयास वेढा घातला कलम १

आश्वीन मासी चाकणचा कोट शास्ताखानाने घेतला मग पुणियास आला कलम १

जेष्ट शु॥ ८ वासोटा गड घेतला बुधवारी संवत्छरे १ पदेस शास्ताखान भिवरा उतराने पुणें प्रांती आला कलम १

आषाढ वा॥ १ पनाळयावरून राजे उतरून खेलणियास गेले (२८) कलंम १

(पान २१)

भाद्रपद वा॥ १३ पनाळा सलाबतखानास दिल्हे सला केला कलम १

कार्तीक मासी सोनाजी पंडीत अले शास्ताखानाचा निरोप घेऊन राजगडास राज्यापासी अले कलम १

माघ मासी राजे याणी राजापूर (२७)लुटले बाभुळी व प्रभावळी कबज केली कलम १

पौष मासी शु॥ १२ मोरोपंतास मुजमी दिल्ही कलम १

पौषमासी काहर तलफखानासी व सिवजी राजे यासी लढाई जाहली उंदरखिंडीत जुंज जाहले राज्याची फते जाली त्याजपासून खंडणी घेतली रुजु माघ शु॥ १४ चर्तादसी मंगलवार (२९)कलम १

इदलशाई दरडे (३०) कोट मोगलास शास्ताखानाचे मारफतीने दिल्हे कलंम १

शके १५८३ प्लव नाम संवत्छरे

वैशाख शु॥ ११ सोमवारी श्रुंगारपूर राज्याने घेतले तेथील राजे सूर्याराव

देहरीगडास बुफखीने (३१) येऊन वेढा घातला तेथे माउजी (३२)

---

२७ जे. श. त निजामपूर आहे.

२८ येथें सिदी जोहाराच्या पाठलागाचा व त्या युद्धांत बाजी प्रभु ठार झाल्याचा उल्लेख जे. श. त आहे.

२९ हें कलम विचार करण्याजोगें आहे. स्वातंत्र्यानेंच शेवटीं खुलासा जोडला आहे. ‘ खंडणी घेतली’ ह्या ऐवजीं खं० घेऊन वाट दिल्ही ’असें जे.श.त आहे.

३० जे. श. त परडे आहे. टी. १ पहा.

३१ ‘ बुलाखीनें ’ टीप १ पहा.

३२ ‘ काउजी ’ हें बरोबर. टी. १.

पळून गेले कलम १

कार्तीक मासी राजश्री वर्धनगडास जाऊन उष्णकाल संपूर्ण राहिले कलम १

भाद्रपद शु ६ नरहरी आनंदराऊ यास पेशवाई दिल्ही आणि आनाजी पंतास वाकनिसी दिल्ही सरकारकुनास पालख्या दिल्ह्या कलम १

कोंढालकर जाऊन च्यारसे लोक मारून वेढा काढला कलम १

सिदी जोहर सलाबतीखानावरी आली इदिलशाह खासा जाऊन लढाई करून मोडिला तो पळोन कलनवलेस (३३) गेला आणि दोन महिन्यानी मेला कलम १

शके १५८४ शुभकृत नाम संवत्छरी जांमब(३४)रखानावरी खासा राज्यानी मिरेडोंगरास जाऊन पेणेस छपा घातला चैत्र वा १० गुरुवारी मोरोपंतास पेशवाई दिल्ही व निळोपंतास मजुमी दिल्ही भाद्रपद शु १२ आनाजीपंतास सुरुनिसी दिली (३५) कलम १

शके १५८५ शोभकृत* नाम संवत्छरे

चैत्र शु ८ रविवारी शास्ताखानावरी पुणियात सिवाजी राजे खासा जाऊन छपा घातला शास्ताखानाचा हात तुटला मग पळाला त्याचा लेक आबदुल हुते (३६)ठार जाहाला कलम १

समागमे राजश्री कान्होजीराऊ जेधे याचे पुत्र सर्जेराऊ व चांपजी(३७) जेधे व लोक होते कलम १

मार्गसीर्ष मासी जसवंतसिग किले कोंढाणियाचे खाले वेढियास आला कलम १

माघ शु ६ शनवारी शाहजी राजे परलोकास गेले माघ वा ४ भ्रगुवारी राजे फिरोन गडास आले पौष मासी वा ४ स जाऊन सुरत लुटिली कलम १

शफे १५८६ क्रोधी नाम संवत्सरे

जेष्ट शु १४ सोमवारी जसवंतसिंग कोंढाणियास वेढा घातला होता तो (३८) कोढिला त्याचा सुभा

कार्तीक मासी ईदलशाहचा व राज्याचा विघाड जाहाला (३९) खवासखान कुडालास अले राजे तेथे

---

३३ 'केलोसीस' असें जेधे श. त आहे. * शोभन पाहिजे.

३४ 'दा' पाहिजे.

३५ जे. श. त 'राघोजी तुपे जखमी झाले' इ. उल्लेख अधिक आहे.

३६ फते. पाहिजे. ३७ चांदजी. जे. श.

३८ हे शब्द जे. श. त नाहींत.

३९ होऊन जे. श.

तहरीर होऊन जयसिंगास जाहला कलम १

मार्गशीर्ष मासी खुदावंदपुरास्याने (४०)लुटले कलम १

पौष वा। ३० महाबलेश्वरी जिजाई आऊची तुळा केली (४१) ग्रहण सुर्यासी होते १

सोनाजीपंतानी ही तुला केली कलम १

जाऊन घोरपडे मारिले खवासखानासी झगडा केला तो पळोन घाटावर गेला कलम १

माघ मासी राजश्री जाहजात बैसोन बसनुरास गेले शहर मारिले (४२) कलम १

माघ वा। ५ सोनाजीपंत परलोकास गेले कलम १

शके १५८७ विश्वावसु नाम संवत्छरे

(पान २२)

चैत्र वा। १० शुक्रवारी राजश्री पुरंधरास आले कलम १

वैशाख मासी जयसिंग व दलेलखान येऊन पुरंधरास वेढा घातला आषाढ शु॥ १० राजे येऊन जयसिंगास भेटून सला केला राजश्री संभाजी राजे पंच हाजारी देऊन चाकर केले कलम १

फाल्गुण मासी शु॥ ९ सोमवारी राजे व संभाजी राजे औरंगजबाचे भेटीस गेले कलम १

ईदलशाहाचा व मोगलाचा सला तुटोन जैसिंग व राजे व दलेलखान विज्यापुरावरी मार्गसीर्ष मासी चालून गेले तेथे ईदिलशाही फौज सिर्जाखान वगैरे येऊन लढाई दिल्ही मग आतंस्त द्रव्य देऊन विज्यापुरकरानी सला मोगलासी केला राजेश्री सिवाजी राजे जयसिंगाचा (४३) निरोप घेऊन राजगडास आले कलम १

शके १५८८ पराभव नांम संवछरे

जेष्ट शु॥ २ सिवाजी राजे आगरियास पाऊन औरंगजबाची भेटी घेतली बिघाड होऊन राज्यास चौक्या दिल्ह्या कलम १

सर्ज्याराऊ जेधे समागमे गेले हे संभाजी राजे राजगडास आले

श्रावण वा। ३० आमावासेस त्रिबंकपंत व रघुनाथपंत मोरडे आगरा (४६) धरिले कलम १

---

४० 'खुदावदपूर राजश्रींनी' असें जे. श. आहे.

४१ जाली जे. श.

४२ मारून आल जे. श. ४३ 'पासून' जे. श.

(४४) मार्गसीर्ष मासी पीरमिग(४५) ताथेजखान देवरुखी होता तो झगडा होऊन मारिला हाती पाडाव केला कलम १

श्रावण वा। १२ आगरियातून पेटारियात बैसोन पळाले संभाजीसहे-वर्तमान मार्गसीर्ष शु॥ ५ राजगडास आले कलम १

शके १५८९ प्लवंग नाम संवछरे

चैत्र वा। ५ त्रिबंकपंत डबीर व रघुनाथपंत मोरडे ( ४६ ) दिलीहून सुटले सिवाजी राजे यांचे व मोगलाचे सख्य जाले तेच वर्षी राज्यानी मुलकाची हाटाई ( ४७ ) केली कलम १

वैशाख मासी बहलोलखान व येमाजी राजे रांगणियास वेढा घातला राज्यानी वेढा मारुन काढिला मग भाद्रपद मासी येदिलशाहाचा व सिवाजी राजियाचा सला जाहला कार्तिक वा। ५ संभाजी राजे शाहाजाब( ४८ ) शाहाआमल यास भेटावयास औरंगाबादेस गेले मोगलासी सला केला जसवंतसिगाची भेटी कार्तिक वा। ६ राजपुत्राचे दर्शन (४९) कलम* १

शके१५९० कीलक नाम संवत्सरे श्रावण शु॥८ बुधवारी प्रतापगडास (४९) श्रावण शु॥ पंचमी रविवारी चिमाजी रावजी (५०) स्वार होऊन फौजेनिसी औरंगाबादेस गेले कलम १

शके १५९१ सौम्य नाम सवत्सरे

भाद्रपदमासी औरंगजबानी कासीस उपद्रव केला देवालये पाडिली माघ वा।९ शुक्रवारी मोढावर्त(५१)घेतला उदयभान किलेदार मारिला तेव्हा

पौष मासी मोगलाचा व सिवाजी राजे याचा सला तुटला प्रतापराऊ आनंदराऊ फौजेनिसी औरंगाबादेस शाहाजादियाजवली होता तो राज-

---

४४ जेध्यांविषयींचा हा उल्लेख; पण जे. श. त नाहीं. ४५ 'पीरमिया ताजेखान' असें जे. श. आहे टी. १ पहा. ४६ कोरडे जे. श. टीप १ पहा. ४७ बटाई टी. १ पहा. ४८ 'शाहाजादा व शाहाआलम' जे. श. * ह्या कलमासंबंधानें पुढें स्वतंत्रच विचार केला आहे. ४९ प्रतापराऊ जे. श. ५० निराजी राहुजी जे. श. ५१ कोंढाणा जे. श.

तान्हाजी मालुसरा राज्याकडील हाशम सर(५२)सुभेदार पडिला कलम १

**जेध्याकडील (५३)लोक व मावले निवड करून तान्हाजी मालुसरा सरदार करून पाठविला किला घतला तान्हाजी मालुसरा पडला** कलम १

गडास आले कलम १

फालगुण शुा। १५ राजगडी राजाराम उपजले फालगुण वा। १२ भोमवारी निळोपंत मुजुमदारी पुरंधर घेतला (५४) कलम १

( पान २३ )

सके १५९२ साधारण नाम संवत्सरे

भाद्रपदमासी राजे रायेगडाहून मोगलाचे मुलकावरी चालिले जुनरास वेढा घातला आपण कार्तीक शुा। १ सुरतेस जाऊन शहर लुटले कलम १

कार्तीक वा। त्रिंबकगड मोरोपंती घेतला कलम १

पौषमासी सालेर भेद करून घेतली कलम १

आषाढ वा। २ बुधवारी रोहिडा घेतला कलम १

अषाढ शु॥ ९ गुरुवारी माहुली घेतली

कार्तीक शुा। १४ सुरतेहून फिरोन येता दिंडोरीयासी (५५) हाउतखान (५६) व राजे यासी झगडा जाला हाती येक पाडाव केला मग कुरंगेस ( ५७ ) येऊन राहिले मार्गसीर्ष मासी राजे कारिंजियास गेले जाता आहिवत व रवला जवळक (५८) मारकडा हे गड काबीज केले कलम १

ज्येष्ट शुा। ४ शुक्रवारी माळा लाऊन लोहोगड घेतला कलम १

शके १५९३ विरोधकृत नाम संवत्सरे

वैशाखमासी महबतखान वेढा घालून आहिवत व मारमंडा ( ५९ ) व जवल आचलागिरी घेतले माघमासी

जेष्ट मासी बाहादुरखान व हिलेरखा ( ६० ) येऊन सालेरीस वेढा घातला आश्विनामध्यें वेढा काढोन

---

५२ हाशमाचा असें जे. श. त आहे. सर हें पद येथें ज्यास्त आहे. ५३ हा सर्व मजकूर येथें जे श. पेक्षां स्वतंत्र अर्थात् अधिक आहे. ५४ 'केसो नारायण नऱ्हेकर पडले' हा मजकूर जे. श. त विशेष आहे. ५५ पासी जे. श. ५६ दाउतखान जे. श. ५७ जे. श. कुजरगडास आहे. टी. १ पहा. ५८ 'जवला व' जे. श. ५९ मारकंडा जे. श. ६० दिलेरखान जे. श.

मोरोपंती हाशम घेऊन सालेरीचे माचीचा वेढा मारिला उप-रातीक लोक (६१) प्रताराऊ व आनंदराऊ फौजेनिसी जाऊन बहलोलखान धरिला मोहकमसी बारकोजी भोसले धरिले हाती ११ आका व घोडी १७०० सत्रासे पाडाव केली कलम १

औरंगाबादेस आले आणि तेथे फौज ठेविली कलम १

माघ मासी सुलतान शाहाआलम औरंगाबादेहून दिलीस गेले कलम १

शके १५९४ परिधावी नाम संवत्सरे

जेष्ट वा॥ ५ पंचमीस मोरोपंत जाऊन जवार घेतली तेथील राजा विक्रशाहा राजा पळाला मोगलाईत (६२) आला कलम १

जेष्ट शु॥ ७ कल्यांणपती चिंचवडी परलोकास वास केला कलम १

मार्गसर्षिमासी आली इदिलशाहा परलोकास गेले त्याचा पुत्र सुलतान सिकंदर तख्ती बैसविला खवासखान कारभारी जाहाले राज्याचा व ईदिलशाहाचा सला तुटला बाबजी (६३) नाईक पुढे विजापूरी वकील होते त्यास बोलाऊन आणिले कलम. १

फालगुण वा॥१३ दशीस पनालागड आनाजी पंती भेद करून कोंडाजी फर्जंद याबराबर लोक देऊन घेतला साटी लोक रवाना केले कलम १

आषाढमासी रामनगर घेतले तेथील राजा पळोन दवेणेस गेला कलम १

जेष्ट शु॥ ५ भागानगरीचा पातशाहा सुलतान आबदुला कुतुबशाहा मेला त्याचा जावाई तान्हाशाहा तख्ती बैसविला नांव सुलतान आबदुला हासन ठेविले राज्याचे हे (६४) बिंबजी राजे पंत भागानगरास जाऊन येक लक्ष होनाचा तह करून भागानगरीहून बाहासष्ट ६६००० हाजार होन घेऊन राज्यापासी आले कलम १

शके १५९५ प्रमाथी नाम संवत्सरे

जेष्ट (६५) वा॥ ५ पंचमीस मोरोपंत जाऊन जवर घेतली तेथिल राजा विक्रम शाहा पळाला मोगलाईत आला हे

श्रावण वा॥९ रविवारी सातारा घेतला कार्तीक मासी सर्ज्याखानासी व विठोजी सिंदा यासी झगडा जाला

---

६१ उपराला केला जे. श. टीप नं. १ पहा. ६२ गेला जे. श. ६३ बवाजी जे. श. ६४ हेजीब निराजी जे. श. टीप १ पहा. ६५ 'हे कलम दुबार' आलें आहे. श. १५९४ मध्यें प्रथम पहिल्याच कलमांत येऊन गेलें आहे.

कलम दुबार आसे १
चैत्र शु॥ १ राजे राइरीहून पनाळियास गेले ते चैत्र मासी बहलोलखानासी व प्रतापराऊ व आनंदराऊ यासी लढाई जाली बिज्यापुराजवल फते आली (६६) येक हाती पाडाव जाला कलम १

विठोजी पडिला कलम १
चैत्र वा॥ १० भोमवारी किले परळी घेतली विजयादशमीच्या मुहूते राजे जाऊन बंकापूर लुटलें कलम १
माघ वा॥ १४ स सिवरात्रीस बहलोलखानात व प्रतापराऊ सरनोबत यांचा झगडा

( पान २४ )

फालगुन वा॥ ११ सबगांवीची(६७) पेठ लुटून आनंदराव येतां खिदरखानासी लढाई जाली दोन हती पाडाव केले कलम १

जाहाला नवेरियास (६८) जाला तेथें प्रतापराऊ पडिले कलम १
मार्गसीर्ष(६९)मासी पनाळियाजवल सैद बहिवस सजौखान महीमाजी सिंद्याने मारिले हती दोन व घोडी तीनसे पाडांव केली कलम १

शके १५९६ आनंदनाम संवत्सरे

चैत्र वा॥ १४ राज्याने केलंजा घेतला व वा॥ ९ बुधवारी दोन प्रहरा रात्रीं जिजाई आऊ ( ७० ) पाचवडात निवर्तली कलम १
(७१)माघमासी मोरोबाची मुंज जाली जैतपडी माघ वा॥ १२ (७२) गंगाबाई निवर्तली फालगुन वा॥ ५ ( ७३ ) राजे चैत्र वद्य ५ पोंडियासी वेढा घातला कलम १
माघ वा॥ ५ गुरुवारी संभाजी राजे यांची मुंज जाली चैत्र शु॥ १३

जेष्ट शु ४ घटी पाच ( ७४ ) राज्याची मुंजी जेष्ट शु ६ शनवारी समंत्रीक विवाह केला कलम १
जेष्ट शु १२ शुक्रवासर २१॥०३४ (७५) विष्कंभ ३८॥-४. सि ४२ तीन घटिका रात्री उरली तेव्हां सिवाजी राजे सिंहासनी बैसले छ १० रौवल सु॥ खमस सबैन अलफ कलम १

---

६६ जाली जे. श. ६७ 'संपगावीची' जे. श. ६८ निवटियास जे. श. टी. १ पहा. ६९ हें कलम जे. श. पेक्षां अधिक आहे. ७० पाचाडांत जे. श. ७१–७२ हें दोन्ही उल्लेख जे. श. त नाहींत. असेच उल्लेख खं. १८ मधील शकावलींत आहेत मात्र माघ व. १२ ऐवजीं व. ६ तेथें दिली आहे.
७३ 'स्वार जाले ते' जे. श. ७४ 'अवलसाली' असा शब्द जे. श. अधिक आहे. ७५ ३८ जे. श.

चिपळोनात लस्करची पाहणी केली
कलम १
आणि बहिरराव(७६) मोहिते यासी
सरनोबती दिली कलम १

शके १५५१ शुक्ल नाम संवत्सरे फाल्गुन वा। ३ शुक्रवार हस्त घटी १८ प ३२ गंड ५॥७ ते दिवसीं राजश्री सिवाजी राजे सिवनेरीस उपजले कलम १

शके १५७९ हेमलंबी नाम संवत्छरे जेष्ट शु॥ १२ गुरुवारी घटी १० ते दिवसी राजश्री सिवाजी राजे यास संभाजी राजे पुत्र जाहले कलम १

---

# ८ गदाधर प्रल्हाद शकावली

( संपादक—**कृष्णाजी वासुदेव पुरंदरे.** )

शाहूचे प्रतिनिधी गदाधर प्रल्हाद यांचा शिवकालीन रावो बल्लाळ अत्रे याच्या वंशजाशीं शरीरसंबंध होता. चांबळीस रावो बल्लाळ अत्र्यांचा सख्खा भाऊ काळो बल्लाळ याचा वंश राहतो. त्यांचे विद्यमान वंशज विष्णु गोविंद अत्रे यांचें दफ्तर चाळीत असतां जे कित्येक कागद मिळाले त्यांत एक कागदाची वळकटी मिळाली. वळकटी गळाठ्यांत असल्याने ती वरून झडत चाललेली होती. वळकटी उघडतां तिचें स्वरूप खालील प्रमाणे दिसून आले. गदाधर प्रल्हाद यांस शाहूमहाराज, धनाजी जाधव, बाळाजी विश्वनाथ वगैरेंचीं आलेलीं असल पत्रें एकापुढें एक चिकटवून त्यांच्यामागे शकावली लिहिण्यांत आलेली आहे. जपून ठेवणारानें ही वळकटी तीवरील शकावली करितांच जपून ठेवल्याचें स्पष्ट दिसतें. त्याला पत्रांची किंमत वाटली नाहीं. परंतु शकावली इतकीच पत्रांची किंमत आहे. तूर्त शकावलींत काय आहे ते पाहू. शकावलीचा आरंभ कोठपासून होता हें वरील पानें फाटल्यानें कळत नाहीं. आरंभींचीं जशीं कांहीं पानें गेलीं आहेत त्याप्रमाणें शेवटचेंही एकादें अर्धें पान गेलें असावेंसें वाटतें. साधारणपणें यांत शके १६०२ ते १६२८ पर्यंतची शकावली आहे. जेधे शकावली शके १६१९ अखेर आहे व शिवापुरकर शकावली १६९६ अखेर व ही शके १६२९ अखेर आहे म्हणजे हिच्यांत जेध्यापेक्षां दहा सालें अधिक आहेत. मधलीं पानें गेलेलीं नाहींत, असें असूनही जेधे शकावलींत असलेलीं शके १६०७ ते १६०९ पर्यंतचीं सालें हींत नाहींत. ही शकावली जेधे व शिवापूरकर

---

७६ हंबिरराव जे. श.

यांच्या शकावलीशीं बहुतेक बाबतींत जुळते. पण ही या दोहींपैकीं कोणाचीही नक्कल नव्हे हें मात्र खास. जेधे शकावली प्रसिद्ध झाल्यानें शके १६१९ अखेर सालांतील राजकीय उलाढालीवर जसा शोध लागला गेला त्याप्रमाणें या शकावलीच्या प्रकाशनानें १६१९ ते २९ च्या दाहा वर्षांवर लागणार आहे. जेधे व शिवापुरकर शकावलींत आलेलीं सालें टाळून पुढील सालें येथें दिलीं आहेत.

गदाधर प्रल्हादकडून ही शकावली अत्रे घराण्याकडे आली असल्याबद्दल पुरावा मिळतो. म्हणून हिला आपण 'गदाधर प्रल्हाद' शकावली म्हणूं.

ज्या पत्रांवर ही उतरली आहे त्यांपैकीं कित्येकांचा कालनिर्णय स्पष्ट आहे. शाहूमहाराजांचें राजशक ३६ मधील एक आज्ञापत्र आहे. त्यावरून व अक्षराचें वळण इत्यादि साधनांवरून ही राजशक ३६ च्या नंतर लवकरच लिहिली गेली हें स्पष्ट ठरतें.

शके १६१९ ईश्वर संवछरे

चैत्रमासीं सताजी घोरपडा सातारे प्रांते आला त्यावरी गाजदीखान नामजद आला १

श्रावणमासी वद्य ११ सोमवार राजारामानी कर्ण मोगलाईत पाठविला १

पौष्य वदि १२ संक्रातीने दिवसी जुलपुकारखानें दगा देऊन चंजी चनगडच गचीने चढोन घेतली राजाराम पळोन पौष्य वदि नवमीस येलुरास गेले १

आषाढ मासी सताजी घोरपडियास नागोजी माने याने माहादेवाजवली दगा देऊन मारिले १

मार्गेसरमासी शुध ५ मोगलानी चंजीस वेढा घातला १

फालगुन वदि ७ भौमवासरी राजाराम खेलणियासि आले धनाजी-जाधव येलुरास जाऊन घेऊन आले त्यावर बेदारबख्तास पातशाई नामजाद केले १

शके १६२० बहुधान्य संवछरे

मार्गसीर मासी चंजीकडे गेला खेलणियाहून गेले त्याच्या पाठीवरी बेदारबख्त गेला

माघ मासी गाजदीखान बेरडासी सला करून देवगड बख्तबुलंदे फिसादी केली त्यावरी गेला १

फालगुनमासी राजाराम मागती चंदीहून प्रांतीहून फिरोन खिलणीयास आला गदकाजवली शाहाजादियास लडाई दिल्ही

जेष्ठ अधिक वद ८ सोमवार घ १ प १३ वर्तमान ९ पु० भा० २३ प ५६ प्रीती २३।५६ रात्रौ ग० घा १२ प ३० राजारामास पुत्र जाला नाव संभाजी ठेवले

शके १६२१ प्रमाथी संवछरे

कार्तीकमासी औरंगशा + खासा आपण मोहीम + न ब्रम्हपुरीहून ठा + + + + + + + + + + + + राजाराम पलोन फौजेबरावरी + + गडात गेला त्याच्या पठीवरी बेदारबख्त जुलपुकारखान आला त्यास पाठी-वरी पीढा करावयास पाठविले १

मार्गस्वरमासी आवरंगजबे वसंतगड घेऊन साताऱ्यास वेढा आपण जाऊन घातला

पौशमासी राजाराम फिरोन राजगडास आले धनाजी जाधव येऊन ब्रह्मपुरीस पातशाही बुणगे होते ते लुटिले १

फालगुण वद्य नवमीस राजाराम यांही कोढाणयावरी देह ठेविला १

त्याचे पुत्र सिवाजी राजे राज्य करू लागले ते समई वये वर्षे पाच १

शके १६२२ विक्रम सवत्सरे

चैत्र शुध १२ सातारागड सुभानजी भाडवलकर याही सलावक······ गडा पादशाहास(१)दिल्हा + + + मासी पातशाहानी परली जाऊन वेढा घातला १

+ + र्श मासी जुल्पुगारखान व बेदारबख्त यानी पनालियास वेढा घातला फालगुण सुध १३ आवरंगजेब पनालियासि आले पर्वतास सिला जा केले १

आशाड मासी आवरंगजेब सलाह करून परली घेतली आणि भूषणगडानजीक माहुणीवर छावणी कली १

कार्तिकमासी पातशाहा खवासपुरी येऊन उतरला असता माणनदीस पूर येऊन लस्कर वाहवले १

शके १६२३ वृष सवत्सरे

जेस्ट वद्य १४ द्रव्य ५५ हजार + + देऊन किला पनाला घेतला पातशाहा छावणी करावयासि बुध पांवेगावास गेले १

आश्वीन मासी बेदारबख्त याने समानगड वर्धनगड कलानिधी तिनी किले घेतले १

भाद्रपदमासी बहिरमदखान जाऊन चंदन वंदन व नादगीर सलाह करून घेतला १

मार्गस्वर मासी आवरगजेब येऊन खेलणीयासि वेढा घातला गाजदीखानास मार्ग चालवावयासि ब्रम्हपुरीस ठेविले १

चित्रभानु संवत्सरे शके १६२४

जेस्ट वद्य ७ खेलणा दोन लाख रुपये देऊन परशरामपंतापासून

पौशमासी पातशाहा येऊन कोढाणियासि वेढा घातला तेच मासी नेमा-

किला घेतला आणि पनास्याजवली वडगाव आहे तेथे छावणी केली पावसाने लस्कर फार मेले १

+ श वद्य १० ववडाजवल येका + कोसावरी बा आहे तेथे गारा पड्ल्या अतिशये पडल्या १

जी सिदा व केसोपंत नर्मदेपलीकडे जाऊन सिरोज मारली १

शके १६२५ सुभान नाम संवत्सरे

वैशाख शुध नवमीस कोढाणा सला करून घेतला रुपये पनास हजार दिल्हे मग पुणियामध्ये येऊन छावणी केली

तेच वरशी प्रज्यन्य जाऊन देशात दुकाल पडला २

मार्गस्वर मासी नमाजी सिंदे व केसोपंती सर्जाखानासी लडाई करून कैद केला दोन हजार घोडे आकरा हती घेतले तीन लाख रुपये घेऊन सोडून दिल्हा १

माघमासी नेमाजी सिदा व केसोपत व परसोजी भोसले पनास हजार स्वार मिलोन नर्मदा उतरोन कालाबाग पावेतो गेले त्याचे पाठीवरी गाजदीखानास रवाना केले १

कार्तिक शुध १४ पुणियाहुन कुच करून पातशाहा जाऊन राजगडास वेढा घालून बैसले १

पाच सेर रुपयाची धारण खाली खानदेश वराड देशात कुल दुकाल पडला

माघ वद्य नवमीस राज + + ( गड ? ) पातशाहानी सला करून घेतला फालगुण मासी तोरण्यासि माला लाऊन घेतला

तारण सवछरे शके १६२६

वैशाखमासी पातशाहा येऊन खेड कडुसावरी छावणी केली १

पौश मासी लोहगड म+ +(गठ्या ?) नी माला लाऊन घेतला १

कार्तिक वद्य १३ आवरंगजेबे खेडकडूसीहून कुच करून पेडगावावरून सुर माशा सगरावरून वाघनगरेयासि जाऊन माघमासी वेढा घातला

शके १६२७ पार्थिव सवछरे

वैशाख वद्य ४ वाघनगेरे आवरंगजबाने घेतले बेरड कोट टाकून पलोन गेला १

कार्तिक मासी शुध चतुर्दसीस पात-

जेस्ट मासी पलेकिडे ती कोसावरी पातशाहानी कृष्णातीरी छावणी केली १

आषाढ मासी कोढणा माला लाऊन मऱ्हाठेयानी घेतला १

शाने कुच करून पौश शुध प्रतिपदेस पेडगावास गेले तेथे रमजान केला मग माघ वद्य १ प्रतिपदेस नवाब जुलपुकारखानास समागमें राजश्री शाहू राजे जालीतून काहाडून दिल्हे आणि कोढाणि घावयास रवाना केले आणि पातशाहा कुच करून फालगुन सुध ६ अहमदनगरास येऊन मुक्काम केला १

शके १६२८ व्यये सवछरे

चैत्रमासी धनाजी जाधव कुल फौजेनसी येऊन पातशाही लस्करासी मुकाबिला येऊन लडाई केली १

वैशाख सुध येकादसी आजमशाहा जुनराहून येऊन अहंमदनगरी मुलाजमिती केली १

माघ वद ३० अमावासेस सुक्रवारी दो प्रहरां औरंगजेबे अहमदनगरी परलोकास गेला आजमशाहा फिरोन मलाबतपुरीहून फालगुन सुध प्रतीपदेस लस्करास अले अमवाल जप्त केला १

फालगुन कामबकस विजापुरी बदल जाले अमल जारी केला १

चैत्र मासी कोढाणा जुलपुकारखाने कोढाणा द्रव्य देऊन कबज केला १

माघ वद्य ७ कामबकसास औरंगशाहे विजापुरीचा सुबा देऊन रुकसत केले १

माघ वद्य द्वदसीस पादशाहे अजमशाहास उजनीचा सुबा देऊन आपणापासून रवाना केले १

फालगुन सुध येकादसी मंगलवारी अजमशाहा सिंहासनी बैसले फालगुन वद प्रतिपदा शनिवारी कुच करून दिलीवरी चालिले १

शके १६२९ सर्वाजित सवछरे

चैत्र सुध प्रतिपदा अजमशाहा औरंगाबादेस दुसरे दिवसी कुच करून दिलीवरी चालिले दक्षेणेस गाज ( अपूर्ण )

चैत्र सुध प्रतिपदेस जुलपुकारखान व राजा शाहु देऊन आजमशाहाची मुलाजमती औरंगाबादेस घेतली

# ९ घोडेगांवकर वहींतील शकावली.

जन्म शक १५५१ श्री

सीवाजी राजा याणी सीव २ राम उचार करुन समाप्ति जाले ॥ शके १६०२ रीद्रनाम संवत्सरे चैत्र शुा १५ रवीवारे

येकनाथ माहाराज परंधामाप्रती गेले तेव्हा समर्थ बेवीस महिन्याचे होते शके १५३१ ॥ फाल्गुन वद्य ६ सौम्यनाम सवत्सरे

समर्थ आसता तुकाराम माहाराज शके १५७१ वीरोधी नाम सवत्सरे फालगुण वा ५ सोमवार देह भागीर्थीत पडला.

वामन स्वामी शके १५७९ वैशाख शुा ६ जयनाम सवत्सरे वारणातीरी कोरेगावी समाधिस्त जाले ॥

ज्ययरामस्वामी वडगावकर वडगावी शके १५९४ भादपद * वद्य ११ गुरुवार परिधावी नाम सवत्सरे

रंगनाथ स्वामी ब्रम्हनाळकर शके १५८८ परा [भ] व नाम सवत्सरे भाद्रपद शुा २

समर्थाचे मागे श्रीरंगनाथ स्वामी निगडीकर नीगडीस समाधीस्त जाले शके १६०६ रक्ताक्षी नाम सवत्सरे मार्गशीर्ष वा १०

आयास्वामी निगडीकर नीगडीस शके १६२७ पार्थीव नाम सवत्सरे श्रावण शुा ८

अनंदमुर्ती शके १६१८ धाता नाम सवत्सरे कार्तीक शुा १४+

—०—

# १० सहा कलमी शकावली.

शके १५५१ शुक्ल नाम संवछरे ईदलशाई सुलतान सिकंदर पातशा विज्यापूर याचे दिवाणगिरी खवासखान व मुऱ्हार जगदेऊ राऊ यास जाली कलम १

शके १५५२ प्रमोद नाम संवछरी मुऱ्हार जगदे राऊ ईदलशाई मोटे फौज-

---

× हीं अक्षरें प्रारंभी आडवी लिहिलीं आहेत.

* 'शुद्ध' असें पाहिजे म्हणजे तिथी वार, संवत्सर यांचा मेळ जमेल.

+ ही शकावली ज्या वहींत आहे त्या वहींची माहिती तिच्यांतच अखेरीस आहे ती अशीः—"हें पुस्तक गगाभागिरथी गगाबाई भ्रतार महिपतभट तपस्वी घोडेगवकर मुकाम श्रीप्रयाग येथें विनायक यदुरकर यानी दिल्हे शके १७६५ तेव्हा तें पुस्तक गगाबाईनी नारो बालाळ पुरंदरे यास दिल्हे हाली रगो नारायण पुरंदरे याजपासी आहे असे"

निसीं निजामशाईवर चालोन आले पुणा कसबा वस्ती जाळून गाढवाचा नांगर पांढरीवर धरिला सात आठ वर्षे कसबा वोस पडला होता पाहार रोविली होती कलम

सके १५५३ प्रमाथी नाम संवछरी मुन्हार जंगदेराऊ याची व निजांमशाई मलिक आंबर याची लढाई जाली नजिक ल बास वड मलिकाचा मोड जाला मुन्हार जगदेव पाठी लागले भिमेने उतार मलिकास दिल्हा मुन्हार जगदेराऊ यास उतार नाही त्याणी भीमातीरी नागरगांव येथें भीमाइंद्रायेणी संगमी फौजे सहित मुकांम केला मग तह जाहला भिमेचा पुणें देश इंदलशाईकडे आला कलम १

शके १५५५ श्रीमुख नाम संवत्सरे भाद्रपदी आमावशेस सूर्यग्रहण सोमवतीपर्व जाले ते समई मुन्हर जगदेराऊ याणी चोवीस तुळा केल्या छावा हातीचा सोन्याचो तुळा केली शाहजी राजे भोसले निज्यामशाईहून रुसून अले ते जवल होते नागरगाव ब्राह्मणांस आग्रहर धारादत चोवीस भाग करून दिल्हे मग तुळापूर नाव ठेविले कलम १

शके १५५६ भाव नाम संवत्छरे मुन्हर जगदेराऊ याणी भुलेश्वरानजीक डोंगरावर दौलत मंगल किला बांधिला तेथे राहून मुलकाचा बंदोवस्त करून अठदाहा वर्षे होते मामले दौलतमंगल [ पान ३० ] आसे कागदोपत्री चालले कलम १

शके १५५७ युव नाम संवत्छरी शाहजी राजे भोसले यांसि बारा हजार फौजेची सरदारी इदलशाईकडून जाली सरजांमास मुलूक दिल्हे त्यात पुणें देश राज्याकडे दिल्हा राज्यानी आपले तर्फेने दादाजी कोंडदेव मलटणकर यांसि सुभा सागून पुणियास ठाणे घातले तेव्हां सोन्याचा नांगर पांढरीवर धरिला शांती केली मग सुभेदार याणी कसब्याची व गावगनाची प्रांतात वस्ती केली कोल्याचवषे दिल्हे साहावे साली तनखा घेतला शाहजी राजे विज्यापूर प्रांती गेले कलम १

[ शिवापूरकर वही अत्रेकृत नकल पान २९-३० ]

---

# ११ बखरींतील शिवजन्माचीं वर्णनें.

## १ सभासद रचना काल शके १६१९ (स. १६९७.) पृ. २-३

पुढें राजश्री मालोजी राजे यांचे पोटीं राजश्री शाहाजी राजे [ व ] राजश्री सरफजी राजे हे दोघे पुत्र जाहाले. दोघांनीं पातशाहीमध्यें दौलता केल्या. दौलत करीत असतां निजामशाही बुडाली. यावरि शाहाजी राजे इदलशाही

वजीर जाले. महाराज [ हा ] किताब दिला. दाहाबारा हजार फौज चालूं लागली. शाहाजी राजियासि दोघी स्त्रिया. प्रथम स्त्री जिजाई आऊ. दुसरी स्त्री तुकाई आऊ. तिचे पोटीं एकोजी राजे पुत्र जाले. जिजाई आऊ तिचे पोटीं राजश्री शिवाजी राजे पुत्र होतां‍च श्रीशंभुमहादेव जागृतीं येऊन स्वप्न जालें कीं, "आपणच अवतरलों आहें. पुढें बहूत ख्यात करणें आहे. बारा वर्षेपर्यंत तुम्हीं आपले जवळ ठेवावे. पुढें न ठेवणें. जातील तिकडे जाऊं देणें. आटोप न करणें." ऐशी जागृति जाली. शाहाजीराजे कर्नाटक प्रांतीं बेंगरुळ येथें होते. त्यांपाशीं कारभारी राजश्री नारोपंत दीक्षित होते. त्यांच्या पोटीं रघुनाथपंत व जनार्दनपंत हे दोघे पुत्र बहूत शाहाणे जाले. शाहाजी राजे यांसि दौलते मध्यें पुणें परगणा होता. तेथें दादाजी कोंडदेव शाहाणा, चौकस ठेविला होता. तो बेंगरुळास महाराजांचे भेटीस गेला. त्याबरोबर राजश्री शिवाजी राजे व जिजाबाई आऊ ऐशीं गेली. ते समयीं राजियास वर्षे बारा होतीं. बरावर शामराव नीळकंठ म्हणून पेशवे करून दिले व बाळकृष्णपंत नारोपंत दीक्षिताचे चुलतभाऊ मंजुमदार दिले व सोनोपंत डबीर व रघुनाथ बल्लाळ सबनीस, ऐसे देऊन व राजे यांसि पुण्यास रवाना केलें. ते पुण्यास आले.

२ चित्रगुप्त रचनाकाल शके सु० १६८१ (स. १७५९) पृ. २

पुढें कांहीं दिवसांनीं मालोजी राजे यांस पुत्र शाहाजी राजे होऊन अद्दलशाही वजीर जहाले. "महाराज" किताब पादशाहानीं दिल्हा. बारा हजार स्वारांची फौज समागमे चालवूं लागले. दुसरे पुत्र शरफजी मोंगलाईत वजिरी करूं लागले. शाहाजी राजे यांस स्त्रिया दोन. ज्येष्ठ सौभाग्यवती जिजाऊ साहेब. यांचे उदरीं प्रथम संभाजी राजे जहाले. तदुत्तर राजश्री शिवाजी राजे जहाले. तेव्हां पुन्हा श्री शंभु महादेव प्रसन्न होऊन दृष्टांत जहाला कीं, "आपणच स्वयें मानवरूपे अवतार घेतला आहे. बहुत प्रताप शौर्यकर्में व दानधर्में त्रिभुवनाचे ठायीं जगविख्यात कीर्ति करणें. स्वामींस बारा वर्षेपर्यंत आपणासन्निध ठेवणें. तदनंतर पुढें न ठेवणें." म्हणोन जागृती प्रखर जहाली. कनिष्ठ स्त्री सौभाग्यवती तुकाबाई साहेब यांचे उदरीं व्यंकाजी राजे जहाले. विजापूरचे पादशाहानीं शाहाजी राजे यांस कर्नाटक प्रांतीं बंदोबस्तास पाठविलें. तिकडे कनकगिरीचे लढाईत संभाजी राजे वारले. शाहाजी राजे बेंगरूळ प्रांतीं होते. जवळ सर्वभ्य कारभारी नारोपंत दीक्षित होते. त्यांचे पुत्र रघुनाथपंत व जनार्दनपंत हे उभयतां बहुत शाहाणे जहाले. शाहाजी राजे यांजकडे सरंजामांत पुणे व इंदापूर हे दोन परगणे असोन तेथें दादाजी कोंडदेव म्हणोन शाहाणे चौकस ठेविले होते. ते महाराजांचे भेटीस येऊन परगणेचा हिशेब रुजू करून निरोप घेतेसमयीं, समागमें शिवाजी राजे व सौभाग्यवती जिजाऊ साहेब यांजबरोबर सखोजी निळकंठ पेशवे व बाळकृष्णपंत हे नारोपंत दीक्षित यांचे चुलते

यं बापूराव मुजुमदार व सोनोपंत डबीर व रघुनाथपंत वोकील सबनीस असे देऊन रवाना केले, ते पुण्यास आले.

३.९६ कलमी बखर[१]. रचनाकाल शके १७०२ (स. १७८०). पृ. ७ १३ त्याउपर शाहाजी राजे माहोलीस भांडत असतां पातशाहा विज्यापूरचे त्यांस अर्जी वकील पाठविला जे आपणावर मोहीम दिलीच्या पातशाहाची जाली सासरे जाधवराऊ याणी हरोली करून फौज घेऊन आले घरचा फितवा आपण किला माहोली बलकाऊन बसलों पातशाहा कौल पाठवितील दौलत मनसफ विशेश देतील तर आपण फौजेसहवर्तमान चाकरीस येऊन ऐसी अर्जी पाठविली त्यावरून पातशाहा विजापूरचे मुरार जगदेऊ दिवाण पातशाही त्याणी कौल व इमान पाठविले त्यावरून शाहाजी राजे पांच हजार फौजेसहवर्तमान सासरे जाधवराऊ यांचा मोर्चा रात्रीं मारून रातोरात जिजाऊ व पुत्र संभाजी राजे देखील विजापूरच्या रोखें चालिले जिजाऊ गरोदर साता मासाची शिवाजी राजे त्यांच्याने होती दोनतीन कोस जातां मार्गी घोडीवर होती जिजाऊ आडली पलवेनासें जालें शाहाजी राजे यांस संकट जालें तेव्हां संभर स्वार जिजाऊ पासीं ठेऊन संभाजी राजे वडील पुत्रास घेऊन पलाले मार्गी जिजाऊस टाकून पलतां शाहाजी राजे जिजाऊस बोलिले जे तुमचे पिते मागें आमच्या पाठिलागी करुन येताती त्यांस शरम असिली तर सोडून देतील पलवितील आम्हास तुमची गरज नाहीं यैसे बोलोन शाहाजी राजे पलोन गेले.

१४ त्याउपर लुखजी जाधवराऊ यांणी रात्रीं तेच क्षणी तांब्रास सावध करून महताबा हत्तीवर घेऊन हरोल होऊन पाठीलाग केला तो मार्गी जिजाऊ उभी राहिली सिपाई जाधवराऊ त्याचे यांणी वलखिली जाधवराऊ बाप भेटले समागमे लोकानी फजीत जाधवराऊ त्यांस केले जे जिजाऊ तुमची कन्या व गरोदर तांब्रास जाहीर जाले तर उत्तम नाहीं. दावेदार तुमचे निघोन गेले ईस कन्येस वांटे वेगलें काहाढणें जिजाऊ सांगाते पांचसे स्वार देऊन रातोरात किले शिवनेर निजामशाही किला शाहाजी राजे त्यांकडे होता तेथें जिजाऊस नेऊन घातली सिवनेर गडावर श्रीभवानी सिवाई तीस नवस जिजाऊनें केला जे आपणास पुत्र जाला तर तुझें नांव ठेवीन त्याउपर सिवाजी राजे त्यांचा जन्म जाला *शके १५४९ क्षये नाम संवत्छरे वैशाख सुध पंचमी चंद्रवार

---

* भारतवर्षांतील ह्याच बखरींत १५५९ हा शक आहे.

१ जवळ जवळ बखरीप्रमाणेंच असलेल्या तारीख-इ-शिवाजी ह्या फारसी ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर प्रो. सरकार ह्यांनीं इ. स. १९०७ मार्चचे मॉडर्न रि० च्या अंकांत दिलें आहे. त्यांतील शिवजन्मविषयक उतारा पुढे दिला आहे.

**राजवाडे खंड ४** (सवाई माधवरावाकरितां लिहविलेली बखर) श. १७०४ (स. १७८३) पृ० २४-त्यास, शाहाजी राजे मसनतीवर बसों लागले, हें जाधवराव वगैरे यांस न साहे. याजमुळें दिल्लीस राजकारण करून तेथून फौज जाधवराव यांनीं आणविली. त्या फौजेचा पेच पडला. तेव्हां शहाजी राजे यांनीं पातशाहाचीं मुलें घेऊन कोकणांत माहुली किल्यावर गेले. तेथें फौज येऊन वेढा घातला. ते समयीं रात्रीस मोर्चा करून आपण व बायको चालिले. पाठीवर जाधवराव व फौ ं लागली. तेव्हां बायकोस टाकून निघाले. बायको जिजाऊ, जाधवराव याची लेक, यांनीं राऊत देऊन शिवनेरी किल्ला शाहाजी राजे यांजकडेच होता तेथे पोंचविली. ती गरोदर होती. तिनें पुत्र झाल्यावर तुझें नांव ठेवीन असा नवस किल्यावरील शिवाई भवानीस केला. पुत्र झाला. नांव शिवाजी ठेविलें.

**मल्हारराव चिटणीस कृत** सप्त प्रकरणात्मक शिवचरित्र. शके १७३२ (स. १८१०) पृ. २४ याजवरि दिल्लीची फौज मीरजुमला घेऊन आले...त्यांस सारे सरदार जाधवराव मलिक वगैरे करून सामोरे जाऊन ते व हे एक होऊन चालून आले. ते समयीं राजांनीं विचार केला जेः--दौलताबाद मैदान मुलूख, यांत लढाई घेणें चांगलें नाहीं. कोंकणांत माहुली किल्ला येथें पादशाहा (व)बेगम साहेब यांस घेऊन गेले. नंतर सारी फौज माहुलीस चालून गेलियावर तेथें साहा महिने युद्ध नाना प्रकारें केले....ऐसें असतां बेगमसाहेब इजकडे त्यांणी राजकारण करून भेद केला. त्याजवरून कची होऊन हिंमत निघोन गेली. जाधवराव यांणीं बुद्धिभ्रंश केला. तेव्हां आपले सारे सरदार यांजकडे राजकारण लाविले. हें वर्तमान शाहाजी राजे यांस समजतांच खावंद दुलंग जाला याउपरि आपण आग्रह करणें ( यास ) प्रयोजन नाहीं. आपण यांचे म्हणविलें. निमक खाऊन पादशाहात आपलेसाठीं खराब केली, बुडविली, हें (अपेश) कशास घ्यावें ! खावंदच त्यांस अनुकूल जाला, त्याचे दैवेंकरून घडणें तैसें घडो. म्हणून विजापूरचे राजकारण सिद्ध जालेंच होतें, तिकडे जावें, ही पातशहात सोडावी, ऐसा विचार करून आपली जमियेत, सलतनत, फौज, कुटुंब घेऊन शके १५४८ यांत निघोन चालिले. ते समयीं शरीफजी राजे यांस सरदारी, लोक व सरंजाम निराळा होता, त्यांस तुम्ही तिकडे मिळोन असावें, असें सांगून ते पादशाहींत राहाविले. ३१ ( इकडे ) जाधवराव फौज कांहीं घेऊन पाठलाग करीत आले. त्याचा मुजाका न धरितां शिवनेर तालुकियांत येऊन, जिजाबाईसाहेब गुरूदर होती, त्यांस त्या तालुकियाचा बंदोबस्त यथास्थित करून, यांस नेणें ठीक नाहीं. म्हणून ठेविली. बराबर पुत्र संभाजी राजे घेतले. बाईसाहेब यांजपाशीं कारभारी बाळकृष्णपंत हणमंते व संक्रोजी नीळकंठ व सोनोजीपंत व रघुनाथ बल्लाळ कोरडे ऐसे व कांहीं सरदार ठेविले. आपण दरमजल चालिले....

पृ. २६. ३२ त्या समयांत इकडे जिजाबाईसाहेब गुरुदर म्हणोन शिवनेरी येथें ठेविलीं होतीं. त्यांस [ पुत्र जाला. ] शिवनेरी येथें शिवाई देवी बहुत जागृत आहे, तिजला बाईसाहेबाचीं नवस केला जे पुत्र जाला म्हणजे तुझें नांव ठेवीन. त्यानंतर दिवस पूर्ण होऊन प्रसूत सुसमयीं शके १५४९ पंधराशें एकूण पन्नास, प्रभव नाम संवत्सरे. वैशाख शु॥ २ गुरुवारीं पुत्र जाला. शुभ चिन्हें जालीं. विजापुरीं महाराज यांस शुभ शकुन जाले. सा ग्रह उच्च पडले. सर्वलक्षणसंपन्न जाले. नांव शिवाजी राजे ऐसें ठेविलें. शाहाजी राजे यांस स्वप्नगत दृष्टांत जाला कीं,...

**मराठी साम्राज्याची छोटी बखर.** रचनाकाल श. १७३९ ( स.१८१७) ९६ कलमी प्रमाणें पृ. ८

**शिवदिग्विजय.** रचना काल शके १७४० स. १८१८—पृ. ४९ इकडे माहुलीस षण्मास पादशहा बेगमसुद्धां राहिले. राजे यांणीं सरकारखानगीकडील सरंजाम व घराऊ सरंजाम पंचवीस हजार असें चाळीस हजार फौजेनिशीं दिल्लीहून मिरजुमला व दौलताबादेकडील पन्नास हजार सरंजाम यांशीं युद्ध करितां सहा मास गुदरले; परंतु उभयपक्षीं समानत्व...तेव्हां वजीर व अमीर पादशाही चाकर यांणीं मसलत करून आशाराम खोजाशीं संधान बांधून "बेगमेचे चाकर आम्ही. शहाजीचें वांकडें पडल्यामुळें दिल्लीची फौज आणिली. ती फौज परत पाठवूं. शहाजीचे पारिपत्य करूं. कोणेविशीं अंदेशा घेऊं नये." असें कित्येक प्रकारें बोलून दक्षिणा वगैरे कबुलायत ठरून बेगमेशीं बोलणें खोजाचें जहालें. त्यावरून बेगमेचें अंतःकरणी "शहाजमुळें दौलतीचा बखेडा होतो; त्या अर्थी शहाजी आपला विचार पाहील. मी येते." त्याची बातमी राजांस कळतांच राजे हुशार जहाले आणि बोलले त्याचा भाव (आर्या) अबला यत्र प्रबला० जिवित आशापि दुर्लभा भवति ॥ १ ॥ ...असें बोलोन नारो त्रिमल मजमदार हणमंते इतबारी कारभारी होते. त्यांजला विजापुरास पादशहाकडे पाठविले...पत्र पाहून राजे विजापुरास बेगमेचा निरोप घेऊन गेले...राजांची तारीफ...लावण्यमिष्टतेनें गौरव केला आणि दौलताबादचे पादशहाकडील सरंजाम किल्ले, कोट वगैरे जे होते ते यांणीं बहाल केले. नूतन मावळ व किल्ले व कर्नाटकांत कनगागिरीकडे कांहीं...जागा लावून दिल्ही. समागमें जिजाऊ साहेब आणावी तरी सात आठ महिन्यांची गरोदर जाली याजमुळें शिवनेरीस दादोजी कोंडदेव यांजकडे पाठविली. विजापुरीं सरदारीचा बंदोबस्त शके १५४८ प्रमाथी नाम संवत्सरीं जहाला...(पृ. ५३) जिजाबाईचे पोटीं प्रथम दौलताबादेस असतां शके १५४५ मध्यें पुत्र जहाला, त्याचें नाव संभाजी राजे ठेविले...दुसरें लग्न विजापुरीं राजांनी केलें, त्यांचें नांव तुकाबाई ठेविले. शके १५४९ आनंद नामसंवत्सरी वैशाखमासीं लग्न जहालें....शिवनेरी येथें बाई

एकटी. मूल जवळ नाहीं म्हणोन आणि प्रसंग दौलताबादेस गुदरला स्वामीचा वियोग जाला. येणेंकरून शरीर कृश होत चाललें. त्याजवरुन कारभारी यांणी शिवनेरीवर शिवाई देवी होती तिजला नवस केला की, 'हे भक्तवत्सले दीनोद्धारके जगदंबे, बाईसाहेब प्रसूत होऊन पुत्र जाहला असतां तुझें नांव ठेवूं....

अब्दे वै प्रभवाभिधे नरपते शालिप्रवाहात्परम् ॥
शाके वेदनवाधिकेंदुशरके ( १५४९ ) मासे च सन्माधवे ॥
नक्षत्रे ( ४ ) च तिथौ विधौ २ गुरुदिने पक्षे सिते शाहजे—
र्जातो नाम शिवाजी को नरवरो यो वै हुतांशो हिते ॥ १ ॥
प्रभवाब्दीं गुरुवासरींच जहाला वैशाख शुक्लीं विजीं ॥...

वगैरे (मागें पृ. ९ प्रमाणें).

पंत प्रतीनिधींची बखर. रचनाकाल शके १७६६(स. १८४४)पृ.३–कल्याण भिवंडीहून शहाजी राजे याणी विजापूरचे बादशहास पत्र पाठविले. त्यांत दिल्लीहून आम्हांवर जाधवराव यांनी फौज आणून चाल केली, तो मोर्चा उठवून आम्ही आपल्केकडे चाकरीस येतों, असें लिहिल्यावरून मुरार जगदेव याणी इनामपत्र पाठविल्यावरून मोर्चा उठवून रातबेरात विजापुरास पांच हजार फौजेनिशी गेले. जिजाऊ शिवाजी महाराज यांजे वेळेस सात महिन्यांची गरोदर होती. मार्गी निकडीनें निभावणी न होणें सबब शंभर स्वार जिजाऊ बाईजवळ ठेऊन संभाजी राजे यांस घेऊन विजापुरास गेले. जिजाऊपाशीं शंभर स्वार असोन मार्गी जाधवराव यांचे फौजेची गाठ पडली. त्याणी पांच हजार फौज घेऊन रातोरात शिवनेरी किल्ला शहाजीकडे होता तेथें पोचविली. ती किल्ल्यावर जाऊन राहिली. तेथें श्रीभवानी होती. तिजला नवस केला कीं, आपणास पुत्र झाला तर तुझें नांव ठेवीन. त्याउपर शिवाजे राजे जन्मले. ते शके १५४९ प्रभवनाम संवत्सरे वैशाख शुद्ध १५ इंदुवारीं जन्म जाहला.

न्यायशास्त्री पंडितराव यांची बखर. रचनाकाल शके १७७०(स.१८४८)-( भारतवर्ष ) पृ. २-३ कांहीं दिवसांनीं शाहाजी राजे शिकारीस गेले. तेथें घोड्यावरून पडून शके १५७५ सालीं कैलासवासी जाहले...यांशीं पुत्र तीन, व स्त्रिया दोन. वडील पुत्र संभाजी राजे. दुसरे शिवाजी राजे. तिसरे व्यंकोजी राजे, शिवाजी राजे यांचा जन्म शालिवाहन शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे रोजी श्री शंभूच्या प्रसादेंकरून शिवनेरी किल्ल्यावर जाहला. त्या वेळेस कारभारी दादोजी कोंडदेव व मल्हारभट ऊर्फ शंभुभट उपाध्ये व जिजाऊ साहेब यांणीं शिवाजी नाव ठेविलें....राज्याभिषेक शके १५९६ ज्येष्ठ शु॥ ६ सन १६७४ इसवी आनंदनाम संवत्सर...शके १५८३ सन १६७१ ( रघुनाथभट उपाध्ये ) त्यांजकडून शास्त्रार्थ पाहवून राज्याभिषेक वेदोक्त करवून सिंहासनारूढ झाले...त्या दिवसापासून शिवाजी महाराजांचा शक चालू जाहला.

**श्रीशिवाजी प्रताप.** रचनाकाल शके १७५१ ( स० १८२९ )— पृ. ४७ इकडे हेकारी ( ! ) मलिकांबर व जाधवराव फौज घेऊन जाऊन, वणदिंडोरीचे घाटाखालीं मैदानांत लढाई जाली. मोठेंच कसोशीनें लढून, दौलताबादकरांची फौज तीन कोश माघारी पिटून काढिली; मग आपण बहिरबुणगे सांभाळून, कारभारी गेलेच होते, आणि खासा गंगास्नान करून, नासिकास पंचवटीवर मुक्काम करून तीर्थविधी केला. फौज मोडली तों जाधवराव व मलिकंबरास जाऊन मिळाली. दोन्ही फौजा एक होऊन, पुन्हां मोहीम केली, जाधवराव सुद्धां चालून आले. शाहाजी राजांनीं जिजाबाईसाहेब यांची रवानगी पुढें करून देऊन, सडे राहिले होते. चौथे दिवशीं कूच करून निघाले, तों मागें फौज आली तिची व राजांची लढाई जाली. दोघे फौजबंद. लढाई करीत करीत चालले. त्यात जिजाबाईसाहेब गरुदर, याजमुळें हलक्या मजला करीत चालले असतां, गनिमाची गांठ पडून, हल्ला केला; तों मागे जाधवराव होते, त्यांस खबर कळली कीं, जिजाबाईसाहेब आहेत, हें ऐकून सांगून पाठविलें, यांसीं भांडूं नये, शहाजीची जेथें गांठ पडेल, तेथें पाहून आणावें. त्याजवरून मोहरा सोडून, फौज चालती झाली. मागाहून जिजाबासाहेबांची व जाधवरावांची गांठ पडून बोलणें जालें. बाईसाहेब गरुदर सहासात महिन्यांची जालेली. तेव्हां बाईसाहेब यांणीं सांगितलें 'बाबा तुम्ही चुकलां, आतां क्षमा माझेंकरतां करून सरपोस ठेवावा, तें राहून हा इरादा धरणें, आपल्यास उचित नाहीं. असा अपराधहि माझा पाहण्यांत आला नाहीं. अस्तु, आतां मी तुमचे जवळ आहे. काय मर्जी, पारिपत्य करावयाचें असेल, तें पारिपत्य करावें,' तेव्हां जाधवरावांनीं जिजाबाई-साहेबांस पोटाशीं धरून, रडून समाधान केले 'बाई, जन्मांतरांनीं विरुद्ध पाडिलें, त्यास आतां माझ्या टाळल्यांनीं टळत नाहीं. यांतच मरण दैवास आले. आतां तुझ्या मनांत कोठें जावयाचें तें सांग.' तेव्हां बाईनें उत्तर केलें कीं, 'शिवनेरी किल्यास मला जावयाचें आहे तेथें पोहचवून देणें.' त्यावरून जाधवराव यांनीं आपले इतबारी लोक सरंजाम देऊन, रवाना केली. बराबर उभयतां कारभारी होते. शिवनेरीचे किल्यावरी जाऊन पांचवे सातवे दिवशीं प्रसूत जाली. शके १५४९ रक्ताक्षी नाम संवत्सरे पुत्ररत्न जालें....पुढें शाहाजी राज व मलिकंबर यांची गांठ पडून लढाई जाली....

**शेडगांवकर बखर.** रचनाकाल शके १७७६ ( स. १८५४ ) पृ.—१३ जाधवराव माघारे फिरोन माहुली किल्यावर बादशाहाजादी व तिचा पुत्र या उभयतांची भेट घेतली आणि त्याजला तेथून घेऊन जाधवराव याणी बरोबर परत माघारे दौलताबादेस कूच दरकूच करून दाखल जाहाले. आणि राज्य कारभार करू लागले मग जाधवराव व बाराभाई मिळोन प्रमुख होऊन निजा-मशाही बुडवावयाची मसलत केली...आणि त्यानी दिल्लीवाले औरंगजब पात

शाहा याची फौच कुमकेस आणून राज्य निजामशाईचे दिल्लीवाले पादशहा यांचे स्वाधिन केलें मग शाहाजी राजे याचे कनिष्ठ बंधू सरीफजीराजे दौलताबादेस होते त्यांनीं पत्र आपले नावाचे जाहलेले मजकुराचे शाहाजी राजे यास लिहून पाठविलें कीं आपण इकडे...येऊं नये....नंतर महमद पादशाहा याची शहाजी राजे याजवर कमाल मेहेरबानगी...करून शके ९५४९...चालू लागले. सिवनेरी किल्यावर शाहाजी राजे याची वडील स्त्री जिजाऊआईसाहेब ही किल्यावर होती. ती प्रसूत जाहाली शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे फसली सन १०३७ मिती वैशाख शुद्ध ३ रोज शनवार रोहिणी नक्षत्र कर्कलग्न या दिवशीं जन्म जाहला त्याचे पूर्वीं श्रीशंभू जटाधारी गोसावी याचे रुपे येऊन सांगितल्याप्रमाणे नांव शिवाजीराजे असे ठेविले तेव्हा याचा जन्म सातवे महिन्यात जाहला हा शिवाचा अवतार म्हणोन ते फार दिवस उदरी राहिले नाहींत...

---

## १२ पुरंदरे वही पान ३९ खालील बाजू

भोसले यांची वंशावळ...त्याचा विस्तार

१ सिवाजी महाराज शाहाजीजे पुत्र याचा जन्म शके १५४९ प्रभव नाम संवत्सरी जाहाला बारावें वर्षी प्रतापगडची भवानी प्रसन्न होऊन पुडावे केले तें समई उमर वर्षे २५ पंचवीस त्या उपरांतीक पुढें सिव्हासनारूड जाहालें शके १५९६ अनंद नाम संवत्सरं जेष्ठ शु॥ २३ त्या दिवसापासून राज्य केले वर्षे ६ येकूण उमर वर्षे ५३ त्रेपन्न शके १६०२ रौद्र नाम संवत्सरी चैत्र शु॥ १५ तिसरें प्रहरी कैलासवासी जाले.

१ छत्रपती महाराज शिवाजी राजे याचा जन्म काल शके १५४९ प्रभव नाम संवत्सरी जाहाला उपरांतिक मृत्युकाल शके १६०२ रौद्र नाम संवत्सरी चैत्र शु॥ १५ पौर्णिमेस कैलासवासी जाहाले त्यास ई॥ पासून ता॥ आयुष्य वर्षे ५३ याचा झाडा वर्षे वि॥

१७ बालत्व इ॥ ( १५४८ ) क्षयनाम संवत्सरे ता॥
चित्रभानु सवत्सरे (१५६४)

३६ राज्य केले
३० श्रमे करून केले ई॥ चित्रभानु
ता॥ विरोधकृत ( १५९३ )
६ सिव्हासनारुढ जाले ई॥ परिधावी ता॥
पिंगल (श.१५९४।१५९९.)

३६

५३

पान ४२-४३

दुसरियाने जिजावा गरोदर पोटात सिवाजी राजे आहेत तो शाहाजी राज्यावरी जाधवरायानी दिलीहून मिरजुमला सुभा आणि कसबब निघोन विज्यापूरचे पातशाहजवळ बारा हजार मनसुब करून जाऊन राहिले तेव्हां वाटेंत जिजावा टाकिली ती जाधवरायांनीं शके १५४८ सात सिवनेरी निज्यामशाई किला त्याजवर पोहचविली तेथे सिवाई देवी आहे सबब तिचे नाव सिवजी राजे ठेविले जन्म शके १५४९ प्रभव नाम संवत्सरी वैशाख शु॥ २ येस जाला सिवनेरी होते शाहाजी राजे भोसले विज्यापुरी सुलतान सिकंदरीजवल जाऊन राहिले होते.

पान ४६ खालील बाजू

( श. १५०० पासून श. १७१७ पर्यंतची हकींकत. )

६ शके १५४९ शाहाजी राजे भोसले वजिरीचा कारभार करीत असता जाधवरायानी दिलीहून मिरजुमलां सुभा आणिला फितुर देखोन शहाजीस पुत्र संभाजी जाहला होता दुसरेयाने जिजावा गरवार असता विज्यापूरचे पादशाहसी राजकांरण करोन पांच हजार फौजेनसी जाधवरायाचा मोर्चा उडवून विजापुराकडे निघोन जिजावा गरोदर पला न पाववे तेव्हां मार्गीं टाकली ती जाधवराव याणी सिवनेर किला निज्यांमशाई तेथे पावती केली तेथे प्रसूत शके मारी प्रभव नाम संवत्छरी वैशाख शु॥ २ गुरुवारी सु॥ समान अशरीन अलफ ते दिवसी जाली पुत्र जाला...

पान ५३

६ शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे सन १०३७ सु॥ समान अशरीन अलफ शाहाजी राजे विज्यापुरास गेले मागे वैशाख शु॥ २ गुरुवारी किले सिवनेरी येथे जिजावासाहेब पोहचविली होती तेथे शाहाजी राजे यांस पुत्र जाहाला किल्यावर सिवाई देवी आहे तीस बाईने नवस केला सबब तिचे नाव सिवाजी राजे ठेविले...

पुरंदरे वहीचा शेवट—वही १ ते १५५ पानें. १२१ ते १५५ पानें कोरीं आहेत.

सदरहू दाखल्याचे व कारकीर्द कोणाची कोणते शकांत जाली याचे आसल बांड राजश्री जनार्दन नारायेण देशपांडे व कुलकर्णी को॥ सिवापूर वगैरे देहे प्रांत हावेली यांजवल आहे त्याजवरून लेहून घेतले असे हे बाड खासगत राजश्री कासी आनंदराव आत्रे जोतिषी व कुलकर्णी मौजे कोंढीत खुर्द वगैरे देहे ता॥ करेपठार व कर्यात् सासवड सु॥ आर्बा असेरीन मया तैन व अलफ मिती फालगूण शु॥ २ शके १७४५ सुभानु नाम संवछरे सन १२३३ फसली सन १८२३ इसवीचे दिवसी समाप्त लिहिणे जाली आसे

॥ जला० ॥ व॥ यदक्षरपदं भ्रष्टं० हा श्लोक.

# १३ श्रीशिवाजी महाराजांची जन्मतिथी.

शके १५५१ फाल्गुन वद्य ३ शुक्रवार ( जेधे शकावलींतील नोंदः— नक्षत्र हस्त घटी १८ पळे ३२; गंड ५ पळे ७ ये दिवसीं राजश्री सिवाजी राजे सिवनेरीस उपजले )

(या कालाच्या सत्यतेच्या परीक्षेसाठीं पुढील गणित रा. वेंकटेश बापूजी केतकर यांच्या सौरार्यब्राह्मपक्षीय तिथिगणितावरून केले आहे. )

## ग्रहलाघवतुल्यगणित

| | | | वार | चंद्रकेंद्र | रविकेंद्र | नक्षत्र |
|---|---|---|---|---|---|---|
| | शक | तिथि | वा. घ. प. | रा. अं | रा. अं. | न. क. |
| | १८०० | १२ | १-१८-१० | ५-२२·७ | ९-१२·२ | १० ६५२·८ |
| | २००<br>४०<br>९ | २२<br>२२<br>९ | ५ ४७-५९<br>७ ४५-५८<br>३ ४५·१६ | १-१७·६<br>२-१६·४<br>३-११·४ | ११-२९·१<br>११-२९·४<br>११-२९·४ | १९ ५८३·७<br>१९ ६०५·५<br>८ ४६· १ |
| उ-णे | २४९ | २३ | ३-१९-१३ | ७-१५·४ | ११-२७·९ | २०-४३५·३ |
| | १५५१ | १९ | ४-५८-५७ | १०-७·३ | ९-१४·३ | १७-२१६·७ |
| तिथिगति | | ३००<br>२०<br>९ | १-१८-२१<br>५-४१ १३<br>१-५१-३२ | ८-१८·२<br>८-१७·२<br>३-२५·७ | ९-२१·१<br>०-१९·४<br>०-८· ७ | २१ ६६३-३<br>१९ ३६४-२<br>८-६०३-९ |
| एकूण | | ३४८ | ६-५०-३ | ७-८·४ | ८-३-५ | १३ २४८-१ |

उप. चंद्रकेंद्र रा. ७-८°-४ कोष्टक ३ चंद्रमंदफल-१८७·४ गति ८४१ क.

उप. रविकेंद्र रा. ८-३ ५ कोष्टक ४ रविमंदफल +११७-० गति— ६० क.

—७०-४ ७८१

```
             −७०·४
              × ६०
७८१ ) ४२२४·० (−५ घ.
       ३९०५
       ----
        ३१९
         ६०
७८१ ) १९१४० ( २४ प.
       १५६२
       ----
       ३५२०
        ३१२४
        ----
         ३९६
```

| | वा. | घ. | प. |
|---|---|---|---|
| मध्यम तिथ्यंत | ६ | ५० | ३ |
| पराख्य | — | ५ | २४ |
| शुक्रवार | ६ | ४४ | ३९ |

∴ शुक्रवारीं ४४ घ.−३९ पळांस फाल्गुन वा। २ समाप्त झाली.

**नक्षत्र साधन—**

नक्षत्र १३−२४८ कला आहे; म्हणजे हस्तनक्षत्र संपूर्ण होऊन चित्राच्या २४८ कला ( वद्य २ संपली त्या वेळीं) जास्त झाल्या आहेत. आम्हांस सूर्योदयीं असलेल्या हस्तनक्षत्राचा समाप्तिकाल काढला पाहिजे. म्हणून २४८ कला ऋण मानल्या पाहिजेत.

```
नक्षत्र कला—२४८·१
चंद्रमंदफल—१८७·४
           ---------
           —४३५·५
             ×६०
गति ८४१ )−२६१३०·० (−३१
           २५२३
           ----
            ९००
            ८४१
            ---
             ५९
             ६०
           ----
           ३५४० ( ४
           ३३६४
           ----
            १७६
```

| | वा. | घ. | प. |
|---|---|---|---|
| म. तिथ्यंत | ६ | ५० | ३ |
| नक्षत्र पराख्य | — | ३१ | ४ |
| | ६ | १८ | ५९ |

∴ हस्तन. समाप्तिकाल १८ घ. ५९ प.

**योगगणित—**

भुक्तनक्षत्र १३−२४८·१×२=२६ न.—४९६·२ क.

=( २६×८००+४९६·२ ) क.=२१२९६·२ कला

तिथि १८×१२=२१६°=२१६×६०=१२९६०·० कला

वजावाकी ८३३६·२

∴ ८३३६·२÷८००=१० योग ३३६-२ कला

११ व्याच्या भुक्तकला --३३६·२

रविमांद्य+११७' हीन -११७·०

चंद्रमंदफल- १८७·४ युक्-१८७·४

-६४०-६

×६०

रविचंद्रगत्यैक्य९०१ ) -३८४३६·० (-४२

मध्यमतिथ्यंत ३६०४

वा. घ. प. ०२३९६

६--५०--३ १८०२

-४२--३९ ५९४

योग१०,६ वा.७ घ. २४ प. ६०

गंडयोग७ घ. २४ प. ९०१ ) ३५६४० ( ३९

२७०३

८६१०

८१०९

५०१

सारांश, वरील गणितावरून असे सिद्ध होतें कीं शक १५५१ फाल्गुन वद्य तृतीया, शुक्रवारी उज्जयिनीच्या मध्यमसूर्योदयानंतर ४४ घ. ३९ प. यावेळीं समाप्त झाली. या दिवशीं हस्तनक्षत्र १८ घ. ५९ प. होतें. आणि गंडयोग ७ घ. २४ प. होता. परंतु श्री शिवछत्रपतींचा जन्म शिवनेरी किल्यांत झाला असल्यामुळें शिवनेरी किल्यांतून दिसणाऱ्या स्पष्टसूर्योदयापासून किती वेळानें सदर गोष्टी घडल्या तें समजण्यासाठीं पुढील रेखांतर, भुजांतर, आणि चर संस्कार यांचीं पळें आणून त्यांच्या ऐक्याचा वरील कालाशीं संस्कार केला पाहिजे.

## कालत्रयसंस्कार गणित.

शिवनेरी किला उज्जयिनीच्या पश्चिमेस असून तेथें उज्जयिनी रेखांतर-२१ पळें आहे. वरील गणितांत सूर्यकेंद्र ८ रा. ३·५ अंश आलें आहे. म्हणून

त्यावरून भुजांतर संस्कार कोष्टकं ६ वरून -१८·३ पळें येतो. शके १५५१ या वर्षी अयनांश १८।२७ होते. आणि इष्ट दिवशीं सूर्याचा सायन भोग ८ रा. ३·५ अं. + २ रा. १८+ २ अं. +१८·४ = १५ रा. १२ अं. होता. ह्य उपकरणाने ६ व्या कोष्टकांतून येणारा संस्कार पळें ६ यांना शिवनेरीच्या पलभेनें ( अंगुळें ६ ) गुणून चरपळें -२४ येतात. या तीनही संस्काराचें ऐक्य -२१--१८--२४=--६३ पळें येतें. हा कालत्रय संस्कार झाला. याचा पूर्वोक्त उज्जयिनीच्या मध्यमकालांना संस्कार केला म्हणजे तृतीया ४३ घ. ३६ प. हस्त नक्षत्र १७ घ. ५६ प. आणि गंडयोग ६ घ. २१ पळे हे काळ शिवनेरी किल्यासंबंधानें स्पष्टसूर्योदयापासून झाले.

| | तृतीया | हस्तनक्षत्र | गंडयोग |
|---|---|---|---|
| जेधे शकावलींत | ...... | १८ घ ३२ प | ५ घ ७ प |
| वरील गणितांत | ४३ घ ३६ प | १७ घ ५६ प | ६ घ २१ प |
| अंतर--जेधे शकावलीपेक्षां | | -० घ ३६ प | +१ घ १४ प |

# १४ अफजलखानासंबंधीं पत्रें

## ( श्री. रा. हनगंडीकर, देसाई यांचे संग्रहांतील )

ले. १

सिका — आश्विन शु॥ १ शके १५८१

फारसी — ता. ७।१०।१६५९ बुधवार.

अज रखतखाने खोदायेवंद खान अलीशान खा॥ अफजलखान महमदशाही खुली दयाम दौलत हू बजानेब कारकुनानी परगणे तेरदल सुरु सन सितैन अल्फ परगणे मजकूरचे विलायतीस सिवजी तसवीस देतो त्यास क्रिष्णगौडा देसाई बहुत मशाकत करून हशम घोडा राऊत ठेऊन गनिमास घेरा केले त्यावरून देसाई मजकुरावरी मेहेरबान होऊन दिल्हे असे बि॥

| | |
|---|---|
| इनाम मौजे मुगळखोड कुलबाब | नईकी देह २ |
| गाव १ | कसबे तेरदल मौजे सससागर |
| चावराना ता॥ विलायतीदर चावरास होन २ प्रमाणे करून दिल्हे असे | दर गावास जमीन चावर १ व याखेरीज बेगारी व फजकी व पडद बलोते |

येणेप्रमाणे हक लाजिमा करून दिल्हे असे अवलाद अफवाद चालवीजे तालिक लिहून घेऊन असल परतून दीजे पा॥ हुजूर

ता शामलीक गोरी — मोर्तब — ता॥ २९ जिल्हेज

ले. २

सिका

फारसी

श. १५८२ माघ व. ७ सोमवार

ता. ११।२।१६६१

अज रखतखाने खुदायेबंद खान अलीशान खा॥ फाजिल अफजलखान माहम-दशाही खुली दयाम दौलतहू ता॥ क्रिष्णगाडा देसाई परगणे तेरदल सु॥ इहिदे सितैन अलफ मा॥ अनाम दलपतराऊ सर हवालदार व मुगी गौडा याणी तुमचे मुदेबरहूकूम सवाद पाठविला की सालगु॥ सिवजीची फितरत होउनु घोडा राउत तहद रायेबाग व अडगल पावेतो काबीज करून मौजे हरो गेरा पावेतो घोडा राउत जाधवराऊ अले त्यास तुवा घोडा राउत हसम मोब-लगा खर्च करून कर्जदार होउनु परगणे मजकूर काबीज होऊ नेदिता लडाई करून चालउनु दिल्हे परगणे मजकूर व असपास माहाल राखिले दिवाणाचे पैकियास खता न करितां उसुल लोक व साल मजकूर गैरवाका नेनरकराचे बोले घोडा राउत नामजाद केले त्याकरिता घर व जिणजितरब लुटलुटी यांचें जाली व सप्तसागरी हावलजी मारला गेला याकरिता शक धरून परागंदा होउनु गेलास त्यावरी तुझे दिलासाबा॥ मुगी गौडास पाठविले त्याणी माहा-लास येउनु तुझा अहवाल मनास अणौउनु तुझे कितेक मशाकती व इकल-जमकी व मसलती केली दिवाण कामास जरा तकसीर केली नाही म्हणौउनु लिहिले होते त्यावरून तुजवरी मेहेरबान होउनु मरामती करून दिल्हे

सालगु॥ सिवजी हरामखोराचे फितरती करिता माहाल कबज होऊ नेदिता माहाल राखिले हसम घोडा राउत ठेउनु मोबलगा खर्च करुनु माहाल राखिले याबा॥ मौजे मुगल-खोड इनाम कुलबाब कुलकानु मरामती करून दिल्हे असे

कसबा तुझे घर व जीण जितरब व नि॥चे लोकाचे लुटी जाली याबदल कसबे मजकुरीचे नाइकी मरामती करून दिल्हे असे नाइ-कीचे हक लाजिमा व बाजे हरनिसबती परगणे मजकूर विलायतप्रमाणे

मौजे सप्तसागरी तुझे कमती जिवे मारिला गेला सबब की हुजु-

साल मजकुरीपा॥ मजकूर विलायती पीक नसता व लस्करहि नजीक उत-रले व विलायतीमधून गेले याक-रिता लस्कर पायमाली जाली व गु॥ गनिमाचे गलबलेकरता विलायती खराब जाले यावरी साल मजकूर निर्वास जागा नव्हे त्यावरी रयती-मानचे दिलासा करून बा॥ गु॥ खडणीचा तह करून कतबा दिल्हे अजी सबब तुजवरी मेहेरबान होउनु गावगना देखील कसबा दर थावरे होन २ दोनी नि॥ गाव मरामती केले असे विलायती कीर्दी मामुरी करणे

रुन घोडा राऊत गेला म्हणऊन मेला त्याचे लेकरबालेवरी कहर जाला त्यास पोसिंदे करून जान परवेसी मौजे मजकूरची नाईकी मरामती केले असे हक लाजिमा व बाजे हरनिसबती परगणे मजकूर विलायतीप्रमाणे

येणेप्रमाणे मौजे मुगलखोड व दर चावर होन २ दोनी व नाइकी कसब व सतसागर असे देऊन सरफराज केले असे अवलाद अफवाद खाऊन कोणे बाबे शक अंदेशा न करिता सुखे असणे व तुम्ही व मुगी गौडाने अरिजा लिहिले होते की सालगुा सिवाजीचे फितरतीकरिता नाडगिरास तकवा दिल्हा की तुम्ही आम्ही मिलोन गनिमास मारून चालउनु देउनु अणी तुम्हा बाबे हुजरू लिहून तुम्हास छत्रियाबाबत दर गावास ईनाम चावर पाऊप्रमाणे देवाऊनु त्यावरुन नाडगिरास बाा छत्रिया दरगावास पाऊ चावर पडीपौ दिल्हे असे दुमाले करणे व अवलाद अफवाद चालवणे तालिक लिहुन घेऊन असल फिराउन देणे दरसाला खुाचे उजूर न करणे पाा हुजूर मोर्तब

रुजुसमत मोर्तब

पेशवे सुद

रुजुसुरुनिवीस

तेरीख २१ माहे जमादिलाखर

---

ले. ३

सिका ज्येष्ठ वाा १४ श. १६००

फारसी ता. ८।६।१६७८ शनिवार

अज रखतखाने खुदायेवंद खाा शर्जाखान खलद अयाम दौलतहू बजानीब हुदेदारानी व मोकदमानी मौजे नंदस्वर साा कोकटनूर मामले पुरनूर महमदपूर बिदानद सुा तिसा सबैन अलफ दरीविले यादव गौडा फर्जंद जख गौडा देसाई पाा तेरदल हुजूर मालूम केले जे अपला वडील भाई कृष्ण गौडा देसाई परगणे मजकूर देसगत करीत असता सिवजी राजे याचे सुबेदार गंगाजी माहादेऊ याने मौजे नंदेश्वर परगणे मजकूरचे गाव तमहडी तेथे च्यारी पाचसे घोडा राऊत उतरोन दोही गावी दाब धरून अजार दिधले यावरी देसाई मजकूरे घोडे राऊत व हसम मेळऊन घेऊन जाऊन गनिमावरी पडला झगडा होऊन देसाई मजकूर साहेब कामावरी फौत जाला असे साहेबी सेरीकरावरी नजर अनायत करून मौजे नंदेस्वराचे जमीनेमधे जीव दिधला असे तेथे अपणासी

ईनाम मऱ्हामत केला पाहिजे म्हणौन मालुम केले बराये मालुमाती खातिरेसी अणून देसाई परगणे मजकूर यासी ईनाम अजरा मऱ्हामत जमीन चावर अेक १ देखील गडा व वर्जे मोला धुरग असल बा। हदगल दरसवाद मौजे मजकूर सदरील जमीन कुलबाब कुलकानु दिधले असे तुंबाले कीजे व अैलाद व अफवाद चालवीजे दरहर साला ताजा खुर्द खताचा उजूर न कीजे तालिक लेहोन घेऊन असली खुर्द खत देसाई मजकुरापासी फिराऊन दीजे पा। हुजूर मोर्तब सुद

तेरीख २७ रजुसुरुनिवीस

रविलाखर सुरुसुद

फरसी

मोर्तबसुद

---

# १५ शिवकालीन कांहीं अस्सल पत्रें

[हीं पत्रें रा. विष्णु नारायण उंबराणी, वाळवेकर जि. सातारा ह्यांचे संग्रहांतील असून तीं शके १४३२ ते शके १५८३ पर्यंतचीं आहेत. ह्यांत विजापूर दरबारांतील प्रसिद्ध मुत्सद्दी मुरार जगदेव, ह्यानतराव, मेलगिरीपंडित पेशवे, कराड परगण्यांतील सरनौबत खुलासेखान, नारो रुद्र हवाले देशमूख, खंडोजी राजे घोरपडे, वगैरेंचे उल्लेख आले असून ह्यांतील कांहीं नांवें अगदी नवीनच आहेत. ह्या पत्रांत प्रामुख्यानें वाळवे येथेच राहणाऱ्या संभभटास शिरगांवच्या श्रीसिद्धेश्वर देवास अभिषेक करण्याबद्दल दिलेले इनामाचा मजकूर आहे विशेषतः 'हिसेबु दिंडी पंढरपूर पालकी यात्रा' २१३ कागदांत आला आहे तो या पालखीच्या इतिहासावर नवीनच प्रकाश पाडणारा आहे. ह्या हिसेबाचे वर्ष श. १५६० हे आहे. म्हणजे ऱ्हेवटच्या बाजिरावाचे वेळीं शिंद्यांच्या लष्करांतील कोणी हैबतराव यानें पालख्या पंढरपुरास नेण्याचा उपक्रम प्रथम सुरू केला, अशी जी समजूत आजवर प्रचलित आहे, ती ह्यापुढें खोटी ठरत आहे. पालख्या पंढरपुरास जाण्याचा परिपाठ जुनाच; पण मध्यंतरी केव्हां पडलेला खळ बंद करून पुनः अधिक जोरानें पालख्या नेण्याचें काम ह्या हैबतरावानें केलें असावें इतकेंच. ह्या सर्व कागदांत आणखी इतर ठाणेदार हवालदार, सबनीस, मोकदम वगैरेचीं तत्कालीन नांवे आलीं आहेत. ह्यांचा शिवकालीन इतिहासाचे कामीं उपयोग आहे हें सांगणें नको. हे कागद रा. कृ. वा. पुरंदरे यांजमार्फत मिळाले. ]

ले. १ शके १५६०

हिसेबु दिडी पढरपूर पालकी यात्रा सु॥ सन तिसा सलासीन अलफ

·|||= मादत्लकरी
गुरो १ यो
-||| पालकी भाई
ना॥ २ यो
-|= छेत्री ना॥ १
———
-|= गरुडटका
-|- तेल
ʗ= पानसुपारी
ʗ= तादुल
ʗ|· खोबर
ʗ|· खिरापती
बारसी
१| बैल २ ये|
———
४ʗ≡

सभु
·||· भट
-| दिवट्या ना|| १ योण
ʗ— काथा हाड्या कारणे
१|| हरिदास ना॥
-||- पतके ना॥ ४ ये|
ʗ= गद वा फुले वा
बुका
———
१|||≡

---

ले. २ शके १५६०

हिसेबु खर्च पालकी यात्रा पंढरपूर सु॥ तिसा

१ʗ· मादत्लेकरी
गुरो १ यो
१ʗ. भोई २
१ʗ. छेत्र्ये २
-|= दिडीस १
||- भट
-||- तेल
-||- पानसुपारी
-||- खिरापती
वा गोपालका

-|- किरकोल खर्च वा
खैराता
-| कर्णीक तादुल वा बा!
वा तूप
ʗ— काथा १|| मंडप
१|| ———————
-||· हरिदास
१ʗ ध्रुपदे
४९
१ʗ. पताके

| | |
|---|---|
| घी फुले तुलसी | १॥ बेल २ |
| .-॥- दिवटे २ | -७÷ गंधप कापूर |
| ५॥।= | ४॥= |
| ४॥= | |
| १०॥ | |

---

ले. ३ — शके १५६१ आषाढ शु॥ ५ मंगलवार

स्वती श्री सके १५६१ वरील पामाथी नाव छवछरे आशड सुध पंचमी खर्च पंढरपुरी दिडी सन आर्बेन आलफ गुा सखभट.

पालकी

१ माणुसे २ य॥

-।= छत्री

\+ +

-॥ दिवटे २ ये।

-॥ भट

-॥ हरिदास ता

-॥ धुरपदी

१ पताके

१ मादले

७= काबिला

१॥ श इ डे बैल २

बाबे खर्च पाा

सुपारी तादुल

\+ + +

८।=

-।- देला इरी वा

माणूस

किाा माणूस

८॥।=



हत्ती दरवाजा-शिवनेरी.

# शिवचरित्र प्रदीप.



शिवाजी जन्म स्थान.

" शके १५५१ शुक्ल संवछरें फाल्गुन वद्य त्रितीया शुक्रवार नक्षत्र हास्त ाटी १८ पळें ३२ गड ५ पळे ७ ये दिवसी राजश्री सिवाजी राजे सिवनेरीस उपजले." (जेधे शकावली.)

८॥ खिरापती

---

९
यासी माल + + स ता बाबती असे
होन ६
माल वझ होणे ३

---

ले. ४ शक १४३२

तालीक

बजानेब हुदेदारानि व मोकासाइयानि वा देसायानि व रायानि तपे वालवे मुजाफती पा कर्‍हाड दर बाब आकी जमीन ठिकसण किते १९७ बा इनामु साबिका हजरत खिलाफत खुलखत खिलाफत हू बो मजकुरीन जुनारदारानि तपे मजकूर बाद येशां ब अवलाद व अफवाद येशां बीमोजीब परवानगी दिवाणा आला विजारती कारखानु तेरीख २ माहे जिलकाद सन सीत सितैन वा समान माया बा मिसली मसनद अली यो लमालाक

मरहूम छ १५ जमादिलाखर सन तिसा मया याचे सालाबाद चालत आहे तैस चि सुा सीत तिसा मया कारणे हसील ठिकण मजकूर नली बला मजकुरानी जुनारदारानि दुबाला सोडिले लाजिमे चिटी वानवल

माफु वा चिटी सनन आर्बा ते २८ माहे शौवल तिसा खुर्द खत खोदायेवद बदगी हजरत मजालीस रफी देवावी यकदर साल मजकूर चा ठाणी व विलायेती वहीराना आहे तेरीख १५ जमादिलाखर इहिदे आसर ची गोतंभट रामेश्वरभट सो का मा व नरसिहभट टिकण किते १९७

गोविद भट अष्टे कृष्णभट

| | | |
|---|---|---|
| का॥ वालवे टा॥ | गोटखिंडी टा॥ | मौजे उर्ण टा॥ |
| ३६ | २२ | १२ |
| कामेरी टा॥ | बोरगाउ टा॥ | बहिया टा॥ |
| १० | २४ | ९ |
| पलुस | कुडल टा॥ | सिरगाउ टा॥ |
| ११ | ६ | ३ |
| पुणदी टा॥ | खेड टा॥ | येलावी टा॥ |
| ७ | ७ | १२ |

१२

| | | |
|---|---|---|
| कानेगाऊ टा॥ | येडावी टा॥ | नदी छगाव टा॥ |
| ६ | ७ | १८ |
| नायेगाऊ | येलोरु टा॥ | |
| २ | ५ | |

तेरीख १५ माहे जिलकाद ब तरीख अशर तिसा मया

+ चिटी ता। बा। चिटी सालागु॥ सन अर्बा तिसा मया ते २५ माहे सौवल सन तिसा चिटी ता। तपे तमाभट व विश्वनाथ भट हरिहर भट सा। वालवे जागदेउ भट

---

ले. ५ — शके १५४५ फाा व. १२

तालीक

अज माहाल तनखो खजाना अमीर माहाल त अमान बावले ( वालवे ) मसुरल हाजरत मफुरल रु त हात ग्यानत राऊ मजालसी हुजुर ता। कारकुनानी तपे बालवो सुा सन अर्बा असरीन अलफ देसकानी वा मोकदमानी तपे मजकूर इलतमेसी केले जे सिधेस्वर देऊ मोकाम मौजे सिरगाऊ यासी सालाबाद बदल अभिसेख गावगना सादिलवार पैकी धर्मादाऊ देणे म्हणौउनु तगी सभु भ ( ट ) बिन लक्षुमधर भट सेकीन कसबे तपे मजकूर मजकुरासी सालाबाद गावागाना होनु ७८ सात देणे अवलादी अफलादी देणे तालिक घेउनु असल फिरउनु देणे दरसाला खुर्द खताचे उजुर न कीजे माा छ २५ माहे जमादिलवल

---

ले. ६ — शके १५४७ फाा व. ४

ता। — सिदेस्वर देऊ

अज दिवाण तपे वालवे ता। हुदेदारानी वा मोकदमानी कसबां तपे मजकूर सुहुर सन सति अशरीन अलफ बाा खुा छ माहे सफर तेथ रजा जे बाा सदभट बिन लक्षु ( मि ) धर सो काा मजकूर हुजूर येउनु मालुम केले जे अपणासी इनाम बाा अभिसेक स्रावणमास अठा दिवसा सोमवारी सो मौजे सिरगाऊ ता। मजकूर जमीन दर सवाद कसबे मजकूर पाऊ चावर ।• दे॥ + + + + + वा वेलकटी वा खरीदी गला वा तेल तूप बाजे उजुहाती कुल बाब कारकीर्दी दर कारकीर्दी माजी वजिरानी दिले होते भोगवटाचे

---

+ ह्या तीन ओळी आडव्या, कागदाच्या समासांत, लिहिल्या आहेत. हें पत्र बरोबर सर्व लागलें नाहीं.

कागद ताहावेली करिता गेले असे माहाली का॰कून खुर्द खताचा उजूर करितात़ी साहे( ब ) आपणासी खुर्द खत मऱ्हामत फर्माउनु बराये मालुमाती खातिरेसी आणून जमीन ·।· पाउ चावर बा। सदरहू दा। बदल अभिसेक सा। मौजे सिरगाऊ स्रावण मासी अठा दिसा सोमवारी बदल दिले असे माहाली कारकीर्दी दरकारकीर्दी + + जे तसरुफाती पाहून ता। वाल(वे) खु।। चालिले असेल तेणेप्रमाणे चालवीजे दर हर साला खुर्द खताचा उजूर न कीजे त लीक लिहून घेउनु असली भट मजकुरासी फिराउन दीजे म्हणौन तरी बा। हु।। सदरहु प्रमाणे दुबाला केले असे दुबाला कीजे तालीक घेउनु असल मिसल भट मजकुरासी फिराउनु दीजे

तेरीख १८ जमादिलाखर

---

ले. ७ फाल्गुन शु।। १३ शके १५५१

श्री सिधेस्वार तालिक

अज रखतखाने मा। बा। राजेश्री स बाई बहादुरजी राजे साहेब दाइम दौलत हु बजानेब कारकुनानी हाल ईस्तकबल देसमुखानी तपे वालवे बिदानकी ह्र्वी सु।। सलासीन अलफ बो। संदभट बिन लक्ष्मण भट सो। वालवे मालुम केले जे अपणासी इनाम बा। अभिसेख स्रावण मास वा आठा दिवसा सोमवार सिधेस्वर देऊ सो। सिरगाऊ तपे मजकूर जमीन दर(स) वाद का। मजकूर पाऊ चावर ०। माहासुल नखतयाती व बाजे उजुहाती कुलबाब व कुलकानू कारकीर्दी दर कारकीर्दी माजी वजिरानी दिधले होते भोगवटेचे कागद ताहावेलीकरितां गेले व ये बाबे साहेबाचे साहेबाचे खुर्द खत असेता साहेबी नजर येनायेती करून माहालीचे बखैर सलाहित असे कारकून ताजा खुर्द (ख)ताचे उजूर कारिता तरी म्हरामती केले पाहिजे म्हणौ(न) मालुम केले बरा ये मालुमाती खातिरेसी अणौउनु जमीन चावर ०। बा। अभिसेख सिस्धेवर देव मौजे सिरगाऊ स्रणमास व आठा दिसा सोमवार बदल दिल्हे अस माहाली भोगवेटे बरु सुरु पाती कारकीर्द दर कीर्दी भोगवटे वा सालाबाद पा हाउनु दुबाला कीजे दर हर साल खुर्द खताचा उजुर न कीजे तालिक धेउनु असल परतोन दीजे मा।

तेरीख १२ माहे रजब

---

ले. ८ १५५३ मार्गशीर्ष व० १

फारसी मुरारी पंडित

सिका साहेब

अज दिवाण तपे वालवे साहेब सदर ता हुदेदारानी वा मोकदमानी कसबे तपे मा मालुम बाद सुा इसने सलासीन अलफ बा जुर्द खत माहाराज राजाधिराजश्री रुजु छ २५ रबिलाखर पैवस्ता छ १५ जमा दिलावल लिहिले की दीरीवला सभु भट बिन लक्ष्मीधर भट सेकिन कसबे वालवा मालूम केले जे आपणास इनाम रु बु दु -।- चावर दर सवाद कसबे मजकूर बागी अभिसेख स्रावण मास वा अठ दिसा सोमवार सिधेस्वर देऊ सेकिन मौजे सिरगाऊ तपे मा बा मा ना बाजे उजुहाती कुलबाब कुलकानुसी कारकीर्दी दर कारकीर्दी माजियानी चालिले असे नजर इनायत बर हुकुम भोगवटा प्रमाणे मिसली म्हरामत करणे बिनाबरा इलतमास जमीन मजकूर मा अफवाद सदरहु दुबाला केले असे भोगवटा पाहून दुबाला करणे हर साला मिसलीचा उजूर न कीजे तालीक लिहून घेउनू असल मिसली परतोन दीजे म्हणोन बा खुर्द खत प्रमाण सभ भट बिन लक्ष्मण भट यास सदरहू इनाम पाव चावर ०।० धुरग पैकी दुबाला केला अहे सदरहू बाबहाये प्रमाणे दुबाला कीजे तालीक लिहून घेउनु असल परतोन दीजे म +

छ १५ जमा दिलावल. फारसी

मोर्तब

---

ले. ९ शके १५५३ मार्गशीर्ष व. ३०

फारसी

सिका

अज दिवाण तपे वाल्लवे साहेब सदर ता हुदेदरनी मोकदमानी देहाये तो मा मालुम बाद सुा ईसने सलासीन अलफ दरीविला देसमुखानी तो मा मालुम केले जे + भट बिन लक्ष + + + बहुत भले ब्राह्मण अहेती साहेबी नजर इनायेत करून गावगाना सादिलवार पैकी होन ७८ धर्मादाऊ करून दिलिया त्याण प्रमाणे घेउनु कृस्णा तटाकी + + न सध्या करून हजरत साहेबास दोवा देउनु असतील म्हणौन बरये मालुमाती उ खातिरेस अणोन भट मास सदरहू धर्मादाऊ खातिरेस अणोन गावगना सादिलवार पैकी होन १० देविले असे यास बितपसील

साहादि रास

| | | | |
|---|---|---|---|
| १।॰ | कसबा | ८= | नागाऊ |
| १।॰ | उरुण | ८= | बाहादुरपूर |
| -।॰ | बहे | -।- | कानगाऊ |
| -॥- | कामेरी | ।- | येलूर |
| -।- | येड | ८= | देउत्लवाड |
| -॥- | गोटखडी | ८= | थानपड |
| •॥- | पलुस | ८= | सीरगाऊ |
| -॥= | कुडल | -।- | नागठाणे |
| -।- | खेड | | |
| -।- | पुणद | | १।= |

५॥=

याणे प्रमाणे देविले असे सा(दि)लवार पैकी अदा कीजे तालिक लिहून घेउनु असल मिसली परतोन दीजे छ २९ माहे जमा दिलावल *

बारसुद

---

ले. १०  शके १५५४ माघ व. १२

श्रीसिधेस्वर देउ

माहास्थान

अज दिवाण ता। वालवे साहेब सदर तहां हुदेदारानी व मोकदमानी कसबे वालवे तपे मजकूर बिदानद की हार्च सु॥ अर्बा असरनि अलफ मिसाल व तेरीख २५ माहे जमादिलवल सन सलास सलासीन अलफ सादर जा* जाले जे देसकानी व मोकदमानी तपे मजकूर इलतमेश केले जे श्री सिधेस्वर देऊ मोकाम मौजे सिरगाऊ तपे मा। यासी सालाबाद अभिसेखु बदल इनाम जमीन चावर पाऊ चालत होता हरीवख्त अभिसेखु चालत नाही तरी जमीन दा। पडी धुरग बा। घाटगुडा पैकी रुदु चावर दर सवाद कसबे मजकूर ते जमीन सवाल मजकुरी पडी पडिले असे तरी साहेबी नजर ईनायेत करून बा। अभिसेखु श्री बा। संभट बिन लक्ष्मीधर भट सेकीन कसबे मजकूर यासी सदरहू

---

* असल्याच दुसऱ्या एका कागदावर 'राजेश्री सिधेस्वर देऊ माहा दैविक(?) स्थान' असे प्रारंभी असून संभभट यांचें आडनांव 'जपे' असें लिहिलें आहे. तेथें देसाईयानी व देसकुलकर्णीयानी असें विशेष आहे. त्या पत्रावरील मिति आश्वीन शु॥ ३ शके १५५३ ही आहे.

पाऊ चावर जमीन बा पडी धुरंग घाटगुडा दर सवाद कसबे मजकूर मऱ्हामत करून दिल्ह या भट मजकूर इनाम खाऊन देवाचे अभिसेखु चालविले हे बि अलाह हजरत साहेबास असे म्हणौउनु तरी बराये इलतमेश देसकानी खातिरेसी अणौउनु सदरहू जमीन बा धुरुग घाटगुडा दर सवाद कसबे मजकूर भठ मजकुरासी बा अभिसेखु श्री देव इनाम दिले असे + + मजकूर बो महसूल आहे. नख्तयाती वा बाजे उजुहाती व कुलबाब व कुल कानु दुबाला केले असे दुबाला कीजे तालिक घेऊ । असल परतून दीजे दरसाल मिसेलीचे उरजू न किजे म्हणौउनु तर बा मिसाल भट मजकुरास बदल अभिसेखु श्री देव सदरहू बा धुरंग घाटगुडा वा पडी दर सवाद कसबे मजकूर रुदु चावर बो बाबहाये सदरहू दुबाला केले असे दुबाला कीजे तालिक घेउनु असेली परतुन दीजे दरसाला मिसलचे उजूर न कीजे तारीख २६ माहे रजबु.

---

ले. ११

शके १५५४ फा शुा २

राजेश्री सिधेस्वर देऊ

महा घटिक स्थान

तालिक

अज दिवाण तपे वालवे साहेब सदर ता हुदेदारानी वा मोकदमानी देहाये तपे वालवे मुा सन सलास सलासीन आलफ दरीविले तुकोजी सिदा हवाई वा खडोजी घोरपडा देसाई वा देसकुलकर्णीयानी तपे मजकूर मालुम केले जे राजेश्री संभ दे भट बिन लक्षुमीधर भट जपे सिधेस्वर देऊ मौ सिरगाऊ यासी धर्मादाऊ ता सादिलवार होन ६॥= चाली होते दरी वख्त चालत नाहीं साहेबानी दुबाला मिसेली करुन देवणे म्हणौउनु बराये इलतमेस हु खातिरेसी अणौनु दुबाला मिसेली दिले असे होनू ६।= बि

कसबे वालवे वगैरे ले० ६ प्रमाणें.

१८०

---

+ ज्यासी पडला आहे.

येणें प्रमाणें देविले असे + मा सादिलवार पैकीं अदा कीजे अैलिवाद वा अफवाद याणे प्रमाणें चालवीजे तालिक लिहून घेउनु असल मिसेली परतुनु दीजे छ १ माहे शाबान

ले. १२ १५५५ ज्येष्ठ व. ३०

फारसी सिका

दा। कारकुनानी ता। वालवे + + गोदाजी क्रिष्ण हवालदार व कारकून माहाल हाये मालुम दानद सु॥ सन आर्बा सलासीन अलफ सभ भट बिन लक्ष्मण भट हे भले ब्राहमण सिधेश्वराचे पुजा करिताती म्हणोउनु यास रोजिना रुके ८३ गु॥ खैरत सालाबाद आदा होणें अहे म्हणोउनु भट मा। मालुम केले वरुन कारकीर्दीचे मिसली दाखविले हाली सालाबाद प्रमाणें आदा करीत जाणे तालीक लिहून घेऊन असल परतोन मोर्तब

तेरीख २८
जिल्हेज

---

ले. १३ १५५५ आषाढ शु॥ १

अज दिवाण तपे वालवे ता॥ खोतानि हजारती जमाती ता॥ मजकूर बिदानद सु॥ सन अर्बा सलासीन आलफ बा॥ खुर्दखत माहलानिहाये छ २८ माहे जिल्हेज पैकीं छ २९ मिनहू सादर जाहले तेथे रजा जे स द भट बिन लक्षुमण भट हे भले ब्राह्मण सिधेस्वराची पूजा करिताती यास रोजिना रुके ८३गु॥(पा)सून सालाबाद अदा होत असे म्हणौन मालुम केले मार्जी कारकीर्दीचे खुर्दखत दाखविले हाली सालाबाद चालवीत जाणे तालीक घेउन असल फिराउनु देणे म्हणौन रजा रजे बा॥ सालगुदस्ता प्रमाणे दरोज सदरहूप्रमाणें अदा करणें जो कोणी खोत होईल त्याणे इस्कील करील तरी गाईब्रामणाची आण असे धर्मकार्य चालविजे मोर्तब

तेरीख २९
माहे जिल्हेज

---

ले. १४

श्रीसिधेस्वर देऊ १५५५ मार्गशीर्ष व. ३

फारसी सिका

अज दिवाण तपे वालवे ता॥ हुदेदारानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि कसबे वालवे तपे मजकूर बिदानद सु॥ अर्बा सलासीन अलफ खु॥ रा॥ छ १ माहे जमादिलावल पा॥ छ २५ माहे मिनहू साधर तथें मजमू जे बा॥ संभु भट बिन लक्ष्मीधर भट सो॥ कसबे वालवे हुजूर येउनु मालुम केले जे अपणास ईनाम जमीन चावर '।' पाउ दर सवाद कसबे मजकूर जहती अभि-

सेखु श्रावण मास व अठा दिसा सोमवारी सिधेस्वर देउ मौजे सिरगौ तपे मजकूर देखील महसूल व नख्तयाती व बाजे उजुहाती कुलबाब कुलकानु कारकर्दि दर कारकीर्दी गहदम सालाबाद व बा। व खु।। प्रो बा। राजश्री मुरारी पडित ता। सालगु।। चालिले आहे हाली माहाल साहेबास मुकासा अर्जानी जाला आहे दरी बाब खु।। होये मालुम जाले सभुभट बिन लक्ष्मीधर भट सा। का। मा। यासि इनाम जमीन चावर पाव ।. दर सवाद कजबे मा। देखील सदरहु बाबे बदल अभिसेक यासि भोगवटा व तसरुफाती गहदम सालाबाद व बा। खु।। मा। रा। राजश्री पडित अजम ता। साल गु।। जैसे चालिले असेल तेणे प्रमाणे दुमाला कीजे दर हर साल खु।। उजूर न कीजे तालीक घेउनु असेली फिराउनु दीजे सदरहू जमीन चालिले सालाबाद सेत मोईन असेल तेणे प्रमाणें दुमाला कीजे म्हणौनु रजा तरी बा। रजा भट मा। इनाम सदरहू प्रमाणें आहे तो ता। साल गु।। जैसो तसरुफाती व भोगवटे बरवे रीती खातिरेस आणोन बा। भटा हवाल कीजे तालीक घेउन असेली ईनामदार यास फिराउनु दीजे मोर्तबसूद

तेरीख १६ माहे जमादिलाखर १

जमादिलाखर

---

ले. १५ १५५६ वैशाख व. ११

वाटोळे दोन फारसी सिके

अज दिवाण तपे वालवे साहेब सदर ता। लखम रसतीमाजी वा य थ टा बाजी खाते जकाती तपे मा। सु।। सन आर्बा सलासीन अलफ संब भट बिन लक्ष्मण भट हे भले ब्राम्हण सिधेस्वर देवाची पूजा करितात म्हणौनु यास रोजीना रुके ८३ ठेविले असेत बा। देत जाणे सालबसाल मिसलीचा उजूर न करणे तालीक घेउनु असल परतोन दीजे + + + त जाणे मा मोतर्ब

तेरीख २५

जिलकाद

---

ले. १६

संभट बिन लक्षमम भट उपा(ध्ये) कसबे वालवे हुजूर येउन मालूम केले जे आपण मौजे सागठाणे तपे मजकूर तेथे श्री नागेश देवाचे अभिसेख स्रावण मास करीत असे पूर्वी वडिली आपणास अभिसेख दिला खुर्दखत तरी देविले असे आसता आपले डाइज लोक आपण + सील प्रमाणें खाऊ म्हणताती

म्हणउन मालुम केले तरी राजश्री——राजे साहेबी संभटास अभिसेख देवला अहे या करवी करणे जे डाइजास समंध नाहीं दुसरेने फीर्याद येऊ ने देणे तालीक घेऊन अ +

---

ले. १७

चिरजीव हरि रामास विनति भट गोसावी व भट वालवेकर यासी होनु ०॥० देविल असे मालेवाडी मधें तरी यासी देवीले उजूर न कीजे

---

ले. १८ श्री सिधेश्वर

शके १५५७ फा शु ३

फारसी सिके दोन बाटोळे.

अज दिवाण तपे वालवे ताहां मोकदमानी देहाये ता मजकूर मालुम बाद सुा सीत सलासीन अलफ संदभट बिन लक्षुमीधर भट सो का मजकूर मालुम केले जे अपणासी धर्मादाऊ बदल अभिसेख——देऊ मोकाम सिर-गाऊ तेथें अभिसेख करितो म्हणउनु धर्मादाऊ गावगाना सादिलवार पैकीं सालाबाद ता साल गुा चालिले असे होनु ६॥= बिता

कसबा उरुण वगैरे

१८ गांवें ले. ९ प्रमाणें

येणेंप्रमाणें सालाबाद चालिले असे हाली साल मजकुरा ता मा साहे-बास मुकासा अर्जानी जाहला आसे साहेबाचे मिसेली पाहिजे म्हणउनु मालुम केले तरी बाये मालूमाती खातिरेसी आणून सालमजकुरासी मिसेली मऱ्हामत केले असे ता सालगुा भोगवटा चालिले असेली तेणप्रमाणे चालवीज तालिक लेहून घेउनु असली परतोन दीजे मोर्तबसुद* शिक्का

तेरीख २

सीवाळ

---

* ह्या पत्राप्रमाणेंच शके १५५९ पौष शु २ मितीचें दुसरें पत्र आहे. आणि त्यांतहि मोकासा अर्जानी जाहाल्याचा उल्लेख असाच आहे. त्यावर फारसी सिके आरंभीं तीन असून शेवटीं षट्कोनी मोर्तब आहे. ह्याप्रमाणेंच शके १५७५ चैत्र शु ९ चें पत्र असल आहे. मात्र त्यांत १८ गांवांची यादी नसून नुसती इनामपत्राची मागणी आहे.

' अज रखतखाने खोदाये बंद मुजाअत वा जाहा मोतमीद दस्तगाह फल
बा गाह शाइस्ते मदाहिम अलताफा इकिदखान अलिशान आदतनिशान खा
अजम——सरनौबत हुजुर साहेब दामदौलत हू ' अशा आरंभाचें शबे
१५६५ पौष व. २ ह्या मितीचें नकल पत्र असून त्यांतहि पुढें ' तपे मजकू
साहेबासी मोकासा अर्जानी जाहाले असे ' हें वाक्य आहे. पुढें ले. २० पहा

---

ले. १९ १५५९ श्रावण शुा ८

फारसी सिके तीन एक बदामी
दोन वाटोळे

अज दिवाण तपे वालवे ताहां हुदेदारानी व मोकदमानी मौजे फणदी त
मजकूर मालुम बाद सुा सन समान सलासीन अलफ सद भट बिन लक्ष्मी
धर भट यासी मौजे मजकुरी तीण बिघे ८१५ साला बाद चालत आसे साल गुा
सन सबा मधे भट पासी होनु १। घेतले असे ते परतोन देणे पेस्तर भटा
वाटे न जाणे व टिकण पंधरा बिघे ते फरा नाही म्हणे तरी भटचे टिकण को
गेले आहे ते फरा भरती करून देणे पेस्तर येक जरा तसवीस नेदणे तालिक लेहून
घेउनु असल परतोन देणे मोर्तब सुद षट्कोनी
फारसी

तेरीख ६ रबिलवल

---

ले. २० १५६५ माघ शुा ७

फारसी वाटोळा शिक्का
फारसी चार ओळी
बाजूस फारसी वर्तुळी शिक्का

अज दिवाण ठाणे ताा वालवे ताा हुदेदार वा मोकदमानी कसबे तपे मज
कूर बिदानंद की हर्चा सुा अर्बा अर्बैन व अलफ बाा खुाा छ + माहे सौवाल
पौा छ१ जिल्काद + दरीविले शभु भट बिन लक्ष्मीधर भट सेकीन कसबे
तपे माा हुजुर मालुम केले जे अपणसी इनाम बाा अभिसेक श्रवण मास वा दर
हत्फ सोमस्वार सिधेवार देउ मौजे सिरगाउ यासी इनाम जमीन रुद चावर
-।- दर सवाद कसबे माा बाा माा नखतयाती वा बाजे उजु हाती कुलबाब कुल
कानु सालबाद कारकीर्दी दर कारकीर्दी ताा साल गुाा कूर चालिले असे
हाली तपे माा साहेबासी मोकास अर्जानी जाहाली असे नजर इजायेत फर्मा-
उनु दुबाला खु + ख + त करणे म्हणौनु तरी स + रबु चावर -।- इनाम

दुबाला केले असे सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी ता। सालगु॥ भोगवट तश्रुफत पाहून दुबाला कीजे तालिक लिहून घेऊन असल परतोन दीजे हरसाल ताजा खुर्द खताचे उजुर न कीजे म्हणौनु तरी बरहुकूम रजाप्रमाणें इनामदार मजकुरास रुदु चावर दुबाला केले असे भोगवट तश्रुफत कारकीर्दी दर कार-कीर्दी ता। सालगु॥ जैसे चालिले असेल तेणप्रमाणें दुबाला कीजे तालिक लिहून घे(उन) असल परतोनु दीजे हरसाल ताजा मिसेली चे उजु(र) न कीजे

फारसी

मोर्तब

तेरीख ५ जिलकाद

( पाठीमागें जोडावर दोन फारसी सिके )

---

ले. २१ — १५६९ आश्वीन वद्य १

फारसी चौकोनी सिका

-॥द सौजने मोकदमानि मौजे नागठाणे यासि गोविंद नरसिंह बा॥ देसमुखी ता॥ वालवे ल्याहावयाकारणे सु॥ समान अर्बैन अलफ सभट उपाधे याणि साल मजकूर हकमी बा॥ अभिशक होनु १ येक देविले होते त्यास अदा जाहले नाही म्हणौनु मालुम केले तरी अता भट गोसावी यास रजीस न कारिता साल मजकूर हकमी १ अदा कीजे रजीस न कीजे

तेरीख १५ रमजान

---

ले. २२ — १५७१ भाद्रपद शु॥ ४

नागनाथ

-॥ द सौजने मोकदमानि मौजे नागठाणे यासि प्रतापराउ हवले देसमुखी ता॥ वालवे सु॥ इसने खमसैन अलफ साल मजकूर हसमी बदल अभिसेखु श्री——खंडेजी सभट उपाधे स्रावणमास यासि होन १ येक देविले असे आदा कीजे उजूर न कीजे मोर्तब (!) सुद

तेरीख २ माहे रमजान

---

ले. २३          १५७१ कार्तीक व. १

-॥ विनंती मा राजेश्री नारो रुद्र हवाले देसमुखी ता वालवे यासि राजेश्री खंडोजी राजे घोरपडे लेहावयाकारणे सुा खमसैन आलफ दरीविला बो संभभट उपाध्ये का मजकूर हुजूर येऊन मालुम केले जे अपणास नागनाथ देवाचे अभिशेक हर साला होन १ देविला होता दरीवख्त कारकून ताजा खुा उजूर करिताती म्हणौउनु मालुम केले तरी बा भोगवटा सालाबाद जैसे चालिले आहे तेणेप्रमाणे भट मजकुराचे स्रावण मासाचे अभिशेक दुमाले कीजे दर हर साला ताजा खुा उजूर न कीजे दरी बाबे ताकीद असे      मोर्तब

फारसी

एक चौकोनी

फारसी सिका

तेरीख १५ माहे जिल्काद प्रो

हुपरी !

---

ले. २४          १५७१ मार्गशीर्ष शु॥ १५

बावीस ओळी फारसी मजकूर खाली दोन सिके एक अष्टकोनी व एक सतकोनी व वरहि एक अष्टकोनी सिका

अज रख्तखाने खोदायेवंद सुजाअत वा रफाअत वा शाहमत दस्तगाहा मात मी +न्दर गाहा फलक (!) बार गाहा शा (!) स्ते मराहीम अलताफा बेकिरा खान अलिशान सादत निशान रफा अलकदर व ल मकान खाने अजम——सर सरनौबत हूजुर साहेब दामदौलत हू ता कारकुनानी हाल व इस्तकबाल देसकानी तपे वालवे बिदानंद की इर्चा सुा सन खमसैन अलफ दरीविला शंभु भट बिन लक्ष्मधर भट सा कसबे तपे मजकूर हुजुर येऊन मालुम केले जे अपणासी इनाम बा अभिशाक श्रावण मास वा हर हत्फे सोमवार सिधेस्वार देऊ मौजे सिरगाऊ यासी इनाम जमीन रुबु चावर -।- दर सवाद को तपे मजकूर बो नकदयाती वा माहसूल वा बाजे उजु हाती कुलबाब कुलकानु सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी व हजरत जिनत मकानिचे (!) खुर्दखता ता साल गुा चालिले असे हाली तपे मजकूर साहेबासी मोकासा अर्जानी जाहले असे नजर इनायेत फर्माऊन दुबाला खुर्द खत मराहामत कराव्या रजा फर्मावणे म्हणून तरी बराये मालुमाती खातीरेसी आणुन दुबाला खुर्द खत मराहामत केले असे सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी ता साल गुदस्ता तसरुफाती

पाहून दुबाला कीजे हर साला ताजा खुर्द खताचे उजूर न कीजे तालिक लिहून घेऊन असल परतोन दीजे× फारसी

तेरीख १३ माहे जिल्हेज मोर्तब

रुजु सा। रुजु माहल सुरू

मार्गे जोडावर सिके दोन ठिकाणीं दोन दोन आहेत. व एक जोड कागद डकविला आहे त्यावर " मोजे सिरगाऊ ता॰ " हा मजकूर आहे.

ह्या कागदांतील भट ह्या शब्दामधील भ उ सारखा काढून पुढें काना देऊन काढला आहे.

---

ले. २५ १५७१ माघ शु॥ १४

श्री नागनाथ

॥द सौजन्य जाउजी रैया पालक का मा। यासी नारायेण रुद्र हवाले देसमुखी तपे वालवे लेहाव्याकारणें सु॥ खमसैन अलफ मा। ना। साल मजकूर पै दा। बा। अभिसेख——बदल श्रावण मास ता। सभट उपाध्ये + + + + + देविले असे अदा कीजे उजूर न कीजे सदरहू खेरीज ता। नारो रुद्र खाशा येक १ होनु येकून होन ८≡ देविले असे तेरीख १३ माहे सफर

---

ले २६ शके १५७४ आश्वीन शु॥ ३

वेद मुहूत परायेण
समण भट बिन लक्ष
मणभट मोकास का॥
वाळवे

॥ द कौलनाम धुलोजी पटेल वा आबाजी पटेल वा *रामाजी कुलकर्णी वा कालोजी चउगला वा सोनजी मोकदम मौजे जाखले किले पनाले सु॥ सलास खमसैन अलफ कारण हे कौलनामा ऐसा जे तुम्हासी धर्मादाऊ पाहर काटे मोकासाइयानी सालाबाद भोगवटा प्रमाणें दिले असे तरी तुम्ही सदरहू + पाहर काटेचे जे काये गला होईल तो घेऊन कुस्णा तिरी वास करून आम्हासी अश्रीवाद देऊन सुखे असणे तुम्हासी फुडे कोणी अड येईल त्यासी गाइत्रीची अण असे हा कौल सही

तेरीख १ माहे जिलकाद

---

×पौष व. ११ शके १५७१ चें असेंच एक दुसरें नकल पत्र आहे.

*हें नांव मध्येंच शोधादाखल ओळीवर लिहिलें आहे.

ले. २७ शके १५७५-१५७६

फारशी सिका वाटोळा

ता हुदेदारानी व मोकदमानी मौजे मालवाडी मालुम बाद सुा आर्बा खमसैन अलफ आमचे ठाणे बाब पैकी वेदमुहूर्त सभट वालवेकर यासी होनु -॥- देविल आहे दीजे उजूर न कीजे आमचे नावे खर्च लिहिणे मग खतार रुजु सनद आहे आदा होईल

मोर्तब फारसी

---

ले. २८ फारसी तीन सिके व तीन ओळी वाटोळे.

शके १५७६ फा शुा ७

ले. २४ प्रमाणें सर्व मजकूर आहे. म्हणजे "सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी व हजरती जीनत मकानीचे खुा ता साल गुा चालिले असे हाली तो मजकूर साहेबास मुकासा आर्जानी जाला असे" हा मजकूर ह्यांतहि असून नवीन पत्राची मागणी केली आहे. पत्र असल आहे.

---

ले. २९ १५७९ शके

सिधेस्वर

संभट

दाा बो जाया घाटगुडा फ काा वालवे सुा समान खमसैन अलफ करणे उपाध्ये काा मजकूर लिहून दिल्हा काा बा यैसा जे तुमचे इनाम बाा चावर ।· येकुन होन १॥ काबूल केले आसे

कीर्द करून व हक पटेल कुलकरणी हर गला

सन स्थळ घाट कु.

---

ले. ३०

सौजन श्री मोकदमानि वा विठल पत कुलकर्णी मौजे धुणदी गोसावी यासी बापुजी सभ भट याचे इनामाचे विसी तुम्ही केला त्याण प्रमाणे याचे दुबाला कीजे यास रजीस न कीजे हे विनती

---

ले. ३१ तालीक

तुकोपंत स्वामी गोसावी

सौजन्य राजश्री व हणगोजी पटेल व जोगोजी पटेल मौजे कामेरी यासी रायाजी कृस्ण नमस्कार व आसिर्वादु विनती उपरी जलणाविसी लिहिले होते तरी मजुरी दर ना। ८१।। प्रमाणें करून येक माणूस भले त्या सांगाते देऊन पेस बरवे थोर च्यारी देहूचे ओडचे करून ठेवणें पेस्तर आणिले जाईल वाग बा दा चेबिसी होनु ५ दिले असे गहूं सीध करून ठेविले पाहिजे व फर्मासीविसी ताकीद करविलें पाहिजे तुम्हां करता निश्चित असो ठाउकें होये पेस तोडा विया माणसेला विजे २५ पेस तोडिले पाहिजे जे मजुरी लागेली ते गोविंद भटाचे धर्मादायामधें वजा करणें तुम्ही विवेकी असा बहुत काये लेहू हे विनंति

राजश्री तुकोपंतासी जायापाने नमस्कार विनती उपरी आम्ही कामेरीस आलो होतो ते वेलेसी तुम्हीं बोलिला की मी पेस तोडविले अ.हेती त्यासी मजुरी ८ =। लागले आसे ते आपण सादिलवारी घालितो यैसे बोलिला त्या-वरी साके कारणे सभटाचे धर्मादाऊ -।।- प्रताप घेणे आम्ही वागी -।।- वा गाजरे १५ यैसे पाठविजे म्हणौउनु सागितले होते त्यावरी ग जरे ।।।- वागी -। =।। यैसे पावले आहे त्याचे हिसेब पैकी होतील ते आम्ही सभटासी पावते करितो उरले पैकी आम्हास कांहीं समध नाहीं

---

ले. ३२ १५८० ज्येष्ठ शु।। ८

पंचवीस ओळी फारसी मजकूर खालीं दोन सिके

१ सप्त कोनी; वर एक भोंवरेवजा सिका. बाजूस १ अष्टकोनी

तीन ओळी फारसी

अज रखतखाने खोदायेवंद खुलासेखान दान बुलंद मरतबत सुलावे येक जा ह तानी ने क अकी दत कुदव मखालिसानि व फाकेश जुब्र दे ह वा खोबानी स ला बा अदेशखान आलीशान वाला कदर सादत निशान सर

सर सरनोबत साहेब दामलौलत हु ताा कारकुनानि व देसकानि तपे वालवा बिदानंद की हर्चीं सुहुर सन तिसा खमसैन व अलफ दरीविले शभु भट बिन लक्षमधर भट साो कसबे तपे मजकूर हुजर येऊन मालुम केले जे अपणासी इनाम बाा अभिशाक श्रावण मास वा हरहप्त सोमवार सिधेस्वर देऊ मौजे सिरगाऊ यासी इनाम जमीन रुबु चावर -।- दर सवाद काा तपे मजकूर बाा नकदयाती व माहसूल व बाजे उजुहाती कुलबाब कुलकानु सालाबाद कार-कीर्दी दर कारकीर्दी ताा साल गुाा चालिले असे हाली तपे मजकूर साहेबासी मोकासा अर्जानी जाहले असे साहेब नजर इनायेत फर्माऊन दुबाला खुर्द खत

मराहामत करावे रजा फर्मावणे म्हणून तरी सदरहू इनाम सालाबाद कारकीर्दी दर कारकीर्दी ता॥ साल्गुदस्ता हजरत मग फरत पनाही चे खुर्दखत बा॥ भोगवटा तसरुपाती पाहून दुबाला कीजे हर साल ताजा खुर्द खताचे उजूर न कीजे तालिक लिहून घेऊन असल परतोन दीजे पा॥ हु॥ बा॥ कासी पंडित व सरखेल

तेरीख ७ माहे रमजान

मागे जोडावर तीन ठिकाणीं तीन तीन सिके फारसी. ह्याहि पत्रांत भ ले. २४ प्रमाणें आहे.

---

शके १५८१ वैशाख शु॥ १४

ले. ३३ ता॥

अज दिवाण ठाणा तपे वालवे ता॥ हुदेदारानी वा मोकदमानी मौजे पुणदी तपे मजकूर सु॥ सन तिसा खमसैन अलफ दरीविले सभट बिन लक्षुमणभट सेकीन का॥ मजकूर हुजूर येऊन मालुम केले जे आपणासी इनाम कासीचं नावे जमीन बिघे १५ दर सवाद मौजे मजकुरी गाव तालुक बा॥ भोगवटा कारकीर्दी दरकारकीर्दी चालिले असे त्याणे प्रमाणे हाली साल मजकुरासी मिसेली देवणे म्हणुन तरी बराये मालुमाती खातिरेसी अणून बा॥ भोगवटा कारकीर्दी दर कारकीर्दी गाऊपासून हे चालिले आसेली तेणे प्रमाणे दुबाला सदरहू जमीन कीजे दरसाला ताजा मिसेलीचे उजूर न कीजे तालिक लिहून घेऊन असली मिसेली जुनारदार मजकुरासी दुबाला कीजे मा॥

तेरीख बारा माहे शाबान

---

ले. २४ व ३२ प्रमाणें श १५८१ ज्येष्ठ शु॥ ८ ह्या मितीचे दोन नकल कागद आहेत.

ले. ३४ शके १५८१ मार्गशीर्ष व. ११

तालिक

अज दिवाण तपे वालवे ता॥ हुदेदारानी व माकदमानी कसबे वालवे तपे मा॥ सु॥ सितैन अलफ बा॥ खु॥ छ २४ माहे सफर रजा जे दरीविले सभट बिन लक्षुमणभट भट जुनारदार सेकीन कसबे मा॥ हुजुर येउनु मालुम केले जे अपणासी इनाम बा॥ अभिसेख स्रवण मास वा॥ दर हप्ते सोमवार सिधेस्वर देऊ मौजे सिरगाऊ जमीन पाउ चावर दरसवाद का॥ मा॥ बा॥ मा॥ ना॥ बाजे उजुहाती बा॥ खु॥ मोकासाइयानी माजी नूतैन रवा आहे हाली तपे

मा साहेबासी मोकासा अर्जानी जाहाला असे माहाली कारकुनानी ताजा खुर्द खत उजूर करिताती साहेबी नजर इनायत करून खुर्द खत मन्हामत केले पाहिजे म्हणोनु तरी बराये मालुमाती व खातिरेसी अणुउनु सदरहू इनाम पात्र चावर दर सवाद का मा बा अभिशेख सिधेस्वर देऊ मौजे सिरगाऊ सभट मामासी बा खुर्दखत मोकासाइयानी माजी व भोगवटा व तसरुफाती सालाबाद तागायेत सा गु जैसे चालिले असेल त्याणेप्रमाणे दुबाला कीजे तालिक लिहून घेउनु असल परतोनी दीजे परवानगी हुजूर रो मा हजरत मेलगिरी पंडित दरसाला ताजा खुर्दखत उजूर न कीजे म्हणौनु तरी बा खु सदरहू इनाम जुनारदार मजकुरासी दुबाला केले असे सालाबाद ता सालगु चालिले असेल ते बरे संहत करून त्याणे प्रमाणे चालवीजे तालिक लिहून घेउनु असल परतोनी दीजे

तेरीख २५ माहे रबिलौवल

---

श. १५८१ माघ शु १०

ले. ३५ ता

अज दिवाण राजेश्री दादाजी अनंत नामजाद माहालानिहाये ता मोकदमानी देहाये ता वालवे चिदानंद सु सन सितैन अलफ हुजुर हात रोखा रा छ ५ माहे जमादिलौवल पो छ ८ माहे मिनहु सादिर जाहाले तेथे रजा जे ब्राम्हण ता वालवे हुजूर येउनु मालुम तरी ता साल गु चालिले असेली तेणेप्रमाणे चालवणे व अगाकिही हर कोणी तसवीस देईल ते तसवीस लागो नेदणे म्हणउनु तरी बा रजा सालाबाद चालिले असेली तेणेच प्रमाणे चालवीत जाणे तालिक लिहुन घेउनु असल इनामदार मजकुरासी फिराउनु देणे मो सुद

तेरीख ८ माहे जमा
जमादिलौवल दिलौवल

---

ले. ३६ १५८३ आषाढ शु ३

लंबवर्तुळ फारसी लहान सिक्का

ता सिलार नायक व मोकदमानि मौजे नागठाणे ता वालवे मालुम बाद सु इसने सितैन अलफ चौंडेस्वरांचे देउल पडिले आहे सभटानी भिती घालविले आहे जुनी लाकुडे पडिली आहेती ते घालून धड करीन म्हणतो नर-

सोजी:पटेल व लिंगोजी पटेल घालू देत नाही म्हणे इस्कीली कायेबदल कारितो अता देवाचे काम आहे तुम्ही मदत करावे अता सुतार देउनु तूर्त मुरतेद करून देविजे फिर्याद येऊ नेदीजे सभटचे माली मोडिली आहे त्याचे लाकूड घालितील ते हि घालून + मोर्तब कीजे

छ १ जिल्काद

---

ले. ३७

इनाम सिधेस्वर देऊ ता। सिवाजी बिन नागसेटी सिपी का। वाल्लवे सु॥ सितैन अलफ सके १५८० वरुशे विकारी नाम स्वछर ते वरिशी इनाम केले जमीन -।- येकुन मखत होनु ४॥

होनु

३। –

कि॥

| | |
|---|---|
| ८= देवाचे कामासी | -।० पछोडी |
| ८= पातल्ल वा चोली | ०३८– मुडासा |
| -।- विजापुरीसी जावी | टके |
| -॥- गवत बा। साडी सबब | ०३८– दुपेटा १ |
| गेले म्हणऊन | ०१८० रोख गु॥ नरसेटी |
| १ रोख | ८=० अगाऊ |
| -।- पछोडी | बदल |
| | -।= चा टके ! |
| २।० | ७८० |
| | -॥= दर १०९ ये॥ |
| | दास्तान |
| | १८– |

बाकी देणें होनु

१८≡

किा दुसरे साल ता। गु। सु। इहिदे सितैन अलफ शारवरी नाम स्वछरे सके १५८१ वरुशे की। होनु

२८०

बाकी देणें होनु

२८०

तेरीज बाकी होनु
१८॥
२८०
———
३८॥

---

सदर कागदांतील संवत्सरांचीं नांवें जमत नाहींत. शके १५८० विलंबी व १५८१ विकारी असें पाहिजे. पण पुढल्या संवत्सरांचीं नांवें दिलीं आहेत. म्हणजे विकारी व शार्वरी. म्हणजे संवत्सराचें नांव गत नसून आंकडा गत आहे.

वाटोळा तीन कडांचा सिका
फारसी
वाटोळा व अष्टकोनी फारसी शिक्का

अज दिवाण तो वात्लवे ता हुदेदारनी मोकदमानी कसबे ता मा मालुम बाद सुा सन्नास सितैन अलफ दरीविला देसमुखानी मालुम केले जे मशुरुल हजरत मेलगिरी पंडित पेशवे रा यास कसबे मा इनाम २॥ चावर दिले आहे ते येकदर धुरग घाटगुडे पैकीं दुबाला कारितां त्यामधें सिधेस्वर देवाचे इनाम बा अभिसेख निसबत सबभट बिन लक्षमणभट याचे इनाम पाव चावर -।- आहे तो भरीस पडतो तरी याचे मुबादला सिधेस्वरास इनाम धुरग वाली नाईक कीर्दी रुजु गुा कोमरग डा १ -।- सभटचे दुबाला करुनु पंडित मशारनुले येकंदर इनाम दुबाला करुन देवणे म्हणौन बरये मालुमाती खातिरेस अणून सभटसी सदरहू इनाम सिदेस्वार बा पाव चावर वली नाईक धुरंगनैकीं दुबाला केले असे दुबाला कीजे तालिक लिहून घेउनु असल परतोन दीजे

फारसी
मोर्तब

तेरीख १० जिल्काद

---

शके १५८७ आषाढ वा ३

संभट गोसावी

सिधेस्वर

यादो चिलोजी कोगर्डा प्रज का मा सुा सीत सितैन अलफ कारणे याचे सेवेसी लेहून दिला कबूल कतावा यैसा जे तुमचे इनाम बा

देवाचे धुा वाल्ल नाईक(क) पैकी जमीन ·।- पाव चावर यासी सीरव सी साला

| | | |
|---|---|---|
| सनसीत | सबा | समान |
| सालमाा | सितैन | सितैन |
| होनु ५॥ | ६८ | ६।० |

याणे प्रमाणें सदरहू जमीन दिल्हे असे ते आपण कबूल असे कीर्दी मामुरी करून हा कतबा सही

तेरीख १६ जिल्हेज

---

सौजन फिरगोजी व सटअर्जी पटेल सीवा ! विनंती उपरी संभटचे इनाम दरडे कडे जा जी करितो त्याचे दुबाला असता कोण्ही कांही इस्कील बोलते तरी तुम्ही ताकीद कीजे सालाबाद चालिले प्रमाणे दुबाला कीजे हे

---

शके १५८७— १५८८

श्री सिधेस्वर देऊ मो सिरगाव तर्पे माा

·॥द माहामेरु राजेश्री सभट बिन लक्षुमण भट ईना बाा गोसावी यासी विनती

कोटो नागोजी हावाले देसमूख बापुजी कामाजी सबनवीस +
शंकराजी भास्कर हवालादार महादो बलाल देसकुलकणी

\+ + + + +

\+ + + + +

सेब सेटी चौगला सीद सेटी माहाजन समस्त मोकदमानी काा वाल्लवे तर्पे माा सुा सीत सीतैन अलफ कारणे गोसावी याचे सेवेसी लिहून दिला कागद यैसा जे श्री देवाचा इनाम तुमचे निसबत सालाबाद मत कदम धुा घाटगुडा पैकी होता अर्णा साल गुा राजेश्री पेलगिरी पंडित पेशवे राा यास बाा मिसेली छ १० जिलकाद यास इनाम

\+ + + + पैकी देविले आहे ते येकदर धुा पैकी दुबाला करिता त्यामधे तुमचा इनाम पाव चावर ·।- होता तो भेरीस पाडिला तरी त्याचे मुबादला धुा वाल नाईक रुा कोपर्डी बाा जमीन ·।· पाव चावर दिल्हे असे तुम्ही सुखे कीर्दी करून इनाम खाऊन सुखे असीजे हे कागद लेहून दिल्हे सही

तेरी + + + +

(१) बापुजी काकाजी (२) काटो नागोजी (३) चंदो भिकाजी

शबनवीस हवाल देसमुखी सरदेसकुलकर्णी
(४) खुयेणा वगो (५) माहादो बलाल * बापुजी पटेल
नाडगौडा देसकुलकर्णी ता।
बिजापुर !
भैरोजी पटेल
५ अक्षर वेगळें आहे. * अक्षर वेगळें.

---

शके १५८८ चैत्र शु।। १

जाबिता रद्दा से बाजार मौजे कुडल तापे वालवे सु।। सीत सितैन अलफ बि।। हुदेदारानी व मोकदमानी व सेठयानी मौजे मा। छ २६ माहे रमजान रोज खुमा

खुर्दा दर होनासी

| | खरीदी | फरोख्त |
|---|---|---|
| | ९।।। | ९।। |

गला कैली

जोरी दर पाइलीसी
रुके ८११
हरभारे दर पाइलीसी
रुके ८१०।।
तेरीज

गेहू दर पाइलीसी
रुके ८११

१३७।=।
५१।। =।
१८८।।। –

७९।।। = छ २० रोज
५१। =। छ २१ रोज
१३१।०।
५७।।०।
२८८।।। –

---

+ आणीकाहि पुष्कळ आंकड्यांच्या बेरीज वजाबाकी ह्या कागदावर बऱ्याच केल्या आहेत. पण त्याचा संबंध कांहीं ध्यानांत येण्यास अन्य कांहीं लिहिलेलें नाहीं. सबब ते आंकडे नकलले नाहींत.

सवाई माधवराव

## १६ पेशवेकालीन इतिहाससंशोधनाचा प्रयत्न.

( रा. गणपतराव होनप देशपांडे दप्तर, पुणें. )

श्री

यादी

सिवाजी राजे माहाराज याचा काल जाहाला शके १६०२ रौद्र नाम सवछरे चैत्र शु॥ ५ पंचमी मंदवार १

राजाराम राजे महाराज याचा काल सिहगडावर जाला शके १६२२ विक्रम सवंछरी १

शाहु महाराज हिंदुस्तानातून सुटून आले शके १६२९ सर्वजित नाम सवछेरी १

बालाजी विश्वनाथ यास पेशवाई जाली शके १६३५ विजये नाम सवछर आर्बा अशर साली १

औरंगजेब पादशाह याचा काल जाहला आमदानगरी शके १६३१ विरोधी संवछरे वैशाख शु॥ १४

सिवाजी राजा याचा नातु राजाराम याचे पुत्र सिवाजी राजे होते त्याची पत्रे कोठे कोठे आहेत ता॥ शके १६२८ व्ययनाम सवछर

सिवाजी राजे यासी राज्याभिशक जाला शके १५९५ पधरासे पच्याणव आनंदनाम सवछरे १

ता॥

राजे केले

६ सिवाजी महाराजानी राजे केल वर्शे साह

२८ राजाराम व त्याचा पुत्र सिवाजी देखील ताराबाई साहेब

२२ ६

---

८

४२ शाहु माहाराज शके १६२९ ता॥ शके १६७१ ता॥

३९ आलीकडे रामराजे त्या आलीकडे शाहुराजे हली आहेत

---

कलमाचा शोध होणे

संभाजी राजे याचा काल तुलापुरी जाला त्यानतर राजाराम माहाराज यासी पुत्र १

स वित्री आवा याचे पाटी संभाजी राजे पनालकर हे जाले की आगोघर दुसरे कोणी जाले होते हे कलावे

सिवाजी राजे यानी गडकिले घेऊन राज्यांचा बंदोबस्त करून शके १६०२ रौद्र वछरी प्रतापगडास काल जाहाला त्यावर औरंगजेबानी येऊन गड किले घेतले औरंगजेबाचा काल शके १६३१ जालियावर पुन्हा गडकिले माव ले लोकांनी घेतले म्हणतात तेव्हां राजा कोण होता १

शाहुराजे धरून नेले तेव्हां लग्ने दोन्ही जाली होती की काये राणिया कोठे होत्या १

विज्यापूर व बेदर औरंजेबानी घेतले ही श्वारी पहिली की दुसरी १

संभाजी राजे धरून नेले ती स्वारी पहिली की दुसरी १

सिंव्हगड व सातारा येथें पातशहाचे निशाणं व व दाहीजा लोक चढले ही स्वारी कोणती

सिवाजी राजा यास बाइका येक की दोन होत्या राजाराम व सभाजी राजे हे सखे बधु की सावत्रबधु हे कलले पाहिजे १

शके १७११ सौम्य नाम सवछरे माघ शु॥ १० दशमी ते दिवसीं राजाराम मल्हार राजरीष कुलकर्णी नि॥ मुजेरी का॥ पुणे यास देव आज्ञा जाली + + वे दिवसी मारनिलेचे स्त्रीने रा॥ आपाजी मल्हार राजरीष याचा चौथा पुत्र होता तो घेतला दतविधान जाले नाहीं त्याचे नाव राघो राजाराम म्हणुन ठेविले लग्न पहिलेच जाले होते सन ११९९ सन तिसैन मया व अलफ

---

शके १७१३ आषाढ शु॥ ६ गुरुवारीं प्रहर दिवसास रघुनाथराव चिमणाजीपंत सचीव यांस देव आज्ञा भोरांस जाली हे वर्तमान पुणियांत शु॥ ७ भृगुवारी बारा घटका दिवसास + + + + + शु॥ इसने तिसैन मया व अलफ सन हजार १२०१ छ ५ जिलकादी देव आज्ञा जाली असे

शके १७१४ परिधावी नाम सवछरे आषाढ शु॥ ५ पचमी भृगुवारी राजश्री माहादजी सिदे हिदुस्थान संर करून आले येते समई पातशाही वजीरीची वस्त्रे व कितापत घेऊन आले तिचा समारंभ मिती मजकुरी गारपीराजवल दलबादल डेरा देऊन आरास केली तिचे नाव फरमानवाडी ठेऊन तेथें श्रीमंत राजश्री माधवराव नारायण प्रधान यास नेऊन पातशाही वस्त्रे देऊन पातशाही फरमान वजीरीचे आणले होते ते दिल्हे ते वेलेस पातशाही देणे श्रीमतास आणले होते ते दिल्हे बि॥

# १७ श्रीशिवाजींची खरी जन्मतिथि

( ले.—ज. स. करंदीकर, केसरी ता. २०।५।२४ )

पुणें येथील १९२४ सालच्या शिवजयन्तीच्या उत्सवांत प्रो. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं माझें शिवाजीच्या जन्मतिथीसंबंधानें व्याख्यान झालें. त्यांतील मुद्दे चर्चेकरितां जनतेपुढें मी मांडीत आहें. त्याचा विचार होऊन ज्योतिषी व इतिहाससंशोधक यांनीं कांहीं तरी विचार करावा. शिवाजीमहाराजांचा जन्मोत्सव वैशाखांत होत असलेला पाहून आतां इतिहाससंशोधकांना कसेसेंच वाटूं लागलें आहे. जेधे शकावलि प्रसिद्ध झाली नव्हती तोंपर्यंत शिवाजीचा उत्सव वैशाख शु. २ ला होत होता हें ठीकच आहे. पण आतां जेधे शकावली, तंजावरच्या बृहदीश्वराचे देवालयावरील शिलालेख आणि शिवभारत इतका भक्कम लेखी अस्सल पुरावा पुढें आल्यावर हा उत्सव फाल्गुनांत करणेंच योग्य होईल याचा विचार उत्सवमंडळानें करावा.

शिवाजीची म्हणून जी एक कुंडली हल्लीं प्रचलित आहे ती कशी चुकीची आहे याचा ऊहापोह कै. लोकमान्य टिळकांनीं ता. २४ एप्रिल १९०० च्या 'केसरी' त केला आहे. त्यांत त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "कुंडलींत गुरु कर्केचा आहे, पण शके १५४९ त गुरु कर्केला नसून शके १५४५ त तो कर्केला होता." त्यावरून शके १५४५ च्या वैशाख शु. २ चे गणित करून पाहतां ती कुंडली ( एक शनि तेवढा वगळून ) शिवाजीच्या जुन्या प्रचलित कुंडलीशीं जुळते. त्यावरून मला असें वाटतें कीं, शके १५४५ त शहाजीला जो पहिला मुलगा संभाजी झाला तो वैशाख शुध्द २ ला झाला असावा व त्याची ही कुंडली असावी. आणि शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर कित्येक वर्षांनीं ती कोणा तरी ज्योतिष्याच्या हातीं लागली असावी व त्या वेळीं संभाजीचें नांवहि विसरून गेल्यामुळें ती शिवाजीच्या नांवावर प्रचलित झाली असावी.

**संभाजीची कुंडली**



या कुंडलींत गुरु, मंगळ, रवि व चंद्र असे चार ग्रह उच्चीचे आहेत आणि शुक्र स्वगृहीं आहे. तथापि या कुंडलींत शनि बलवान् नसल्यानें मागाहून कोणीं तरी त्या शनीला षष्ठ स्थानांत ( शत्रुगृहीं ) आणून बसवून आपल्या मतानें तो दोष काढून टाकला असावा ! पण त्यामुळें या कुंडलीचा कोणत्याच कालाशीं मेळ बसेनासा झाला ! तथापि वरवर पाहतां ही कुंडली शिवाजीच्या पराक्रमाला शोभेशी बनल्यानें ती शिवाजीच्या नांवावर रूढ झाली असावी ! सूक्ष्म रीतीनें पाहणारास या कुंडलीचा शिवाजीशीं मेळ बसत नसून संभाजीशीं मेळ बसतो हें दिसून येईल. धनस्थानाचा स्वामी चंद्र व्ययांत गेला आहे; भाग्येशाची स्वगृहावर दृष्टि नाहीं आणि कोणता हि शुभ ग्रह भाग्यस्थान स पहात नाहीं. संभाजीचें आईवर प्रेम नसून बापावर अधिक प्रेम होतें; त्याच्या पाठीवरचीं एक-दोन भावंडें अल्पायु झालीं; आणि संभाजीस अखेरीस शस्त्राघातानें मृत्यु आला इत्यादि गोष्टींचा उलगडा या कुंडलीवरून होतो.

बरें, रूढ कुंडली चुकीची ठरली तरी तेवढ्यावरून शके १५४९ च्या वै. शु. २ ला शिवाजीचा जन्म झाला नाहीं असें कांहीं सिध्द होत नाहीं, हें खरें आहे. पण जेधे-शकावलींतल्या मित्या इतक्या विश्वसनीय ठरल्या आहेत कीं, शिवाजीचा जन्म शके १५५१ च्या फा. व. ३ ला झाला हें खरें मानण्याला इतर आधाराची जरूरच राहत नाहीं. तथापि शके १५४९ वै. शु. २ अगर ५ ही जन्मतिथि मानली जाण्याला कारण काय झालें असावें, या चुकीचा उगम कशांत असावा, याचा उलगडा केला पाहिजे. शिवाजीचा जन्मसंवत्सर शिवप्रतापांत रक्ताक्षी असा आहे. रायरीच्या बखरींत क्षय संवत्सर आहे, तोच इतरहि कांहीं बखरींत आहे. चिटणिसांच्या चरित्रांत प्रभव संवत्सर आहे; जेधे शकावलींत मात्र शुक्ल संवत्सर आहे. अशा रीतीनें संवत्सरांची मालिका शके १५४६ ते १५५१ पर्यंत लागली आहे. यावरून असें अनुमान निघतें कीं संभाजीच्या जन्मानंतर रक्ताक्षी, क्रोधन, क्षय आणि प्रभव; यांपैकीं एकाद–दुसऱ्या संवत्सरांत एक दोन अपत्यें जिजाईस झालीं असावीं. मूल जन्मतांच महिना, तिथिवार व घटकापळें टिपून ठेवण्याची वहिवाट सर्वत्र आहे. मुलाचें नांव त्या वेळीं ठेवलेलें नसल्यामुळें त्या टिपणांत मुलाचें नांव नसून प्रथमपुत्ररत्नं, द्वितीय पुत्ररत्नं असा मोघम उल्लेख असतो. पुढें तें मूल अल्पायुषी झालें तर त्या टिपणाचा कांहींच उपयोग नसल्यानें तें तसेंच गठड्यांत पडून राहतें. असलींच एक दोन टिपणें मागाहून कोणाच्या तरी हातीं लागलीं असावीं आणि त्यांतील द्वितीय अगर तृतीय पुत्ररत्न याचा खरा अर्थ विसरून गेल्यामुळें तें टिपण शिवाजीचें म्हणून रूढ झालें असावें. शके १५४९ च्या वैशाख शु. ५ ला जिजाईच्या पोटीं जें कोणतें मूल जन्मलें असेल त्याची कुंडली

पुढील प्रमाणें येईल. यांत द्वितीया व पंचमी अशा तिथि रूढ असल्यामुळें या मुलाची तिथि पंचमी घेतली आहे. जन्मवेळ माहीत नसल्यामुळें अंध कुंडली मांडली आहे.

**शके १५४९ वै. शु. ५**




या कुंडलीचें जन्मलग्न कोणतेंहि असलें तरी ती शिवाजीसारख्या प्रसिद्ध पुरुषाची नाहीं एवढें खरें. या कुंडलींत कन्या हे जन्मलग्न धरल्यास लग्नेश अष्टमस्थानीं अस्तंगत; कारकग्रहाची दृष्टि शून्य आणि अष्टमेश षष्ठस्थानीं शत्रुगृहीं शत्रूनें दृष्ट असल्याने मुलाचें अल्पायुत्व न सांगतांहि लक्षांत येतें. जन्मलग्न कर्क धरिले तरीहि अनिष्ट योग येतातच. पण जन्मलग्न कन्या धरण्यास एक गमक आहे. म्हणून तें कन्यालग्नच असावें असें मला वाटतें. हे जन्मलग्न धरल्यानें भ्रातृस्थानांत मंगळाचे घरांत गुरु हा शुभ ग्रह येतो, त्यावरून पाठीवरचे भावंड पराक्रमी निपजणार हें सूचित होतें. याप्रमाणें शके १५४९ च्या वैशाख शु. ५ ची वाट लागली. जेधेशकावलि, बृहदीश्वराच्या देवळावरील शिलालेख, शिवभारत इत्यादि लेखी निस्संदेह पुराव्यावरून शिवाजीची जन्मातिथि शके १५५१ फाल्गुन कृ. ३ ता. १९ फेब्रुवारी १६३० ही येते. शिवाजीची म्हणून जी प्रचलित कुंडली आहे ती अगदीं अशुद्ध आहे. ती शुद्ध करून घेतल्यास ती कुंडली शिवाजीच्या थोरल्या भावाची संभाजीची ठरते.( शके १५४९ वै. शु. ५ हा जन्मकाल शिवाजीच्या दुसऱ्या एकाद्या अल्पवयी भावंडाचा असावा.) जेधे शकावलि प्रसिद्ध झाल्यानंतर शिवाजीमहाराजांची म्हणून जी कुंडली इतिहाससंशोधक मंडळानें त्रैमासिकांत प्रसिद्ध केली तीहि छापण्यात अनेक चुका झाल्या आहेत. पण त्या योगानें जेधे-शकावलीस बाध येऊं शकत नाहीं. अर्थातच ही जन्मातिथि खरी धरून यापुढें शिवजयंतीचा उत्सव फाल्गुन कृ. ३ ला करावा, भलत्या तिथीला करूं नये, अशी महाराष्ट्रास विनंति आहे.

---

# १८. शकावलींच्या उपपत्ती.



शिवजन्मतिथींत स्थित्यंतर घडवून आणणाऱ्या साधनांपैकीं शकावली हें एक मुख्य ऐतिहासिक साधन असल्यामुळें या शकावल्यांच्या स्वरूपाबद्दल दोन शब्द लिहिणें वावगें होणार नाहीं. बखरींतील विसंगत दिसणाऱ्या तपशी-लाला संगती देणारें व कागदपत्रांतील त्रुटित माहितीस सांधणारें असें व मराठयांच्या इतिहासाची बिनचूक मांडणी करणारें असें शकावली हें एकच साधन महत्वाचें आहे. शिवकालीन घराण्यांतील कागदपत्रें जमविण्याचा प्रयत्न आजपर्यंत जितका यशस्वी व्हावयास पाहिजे होता तितका यशस्वी झाला नाहीं. परंतु असा प्रयत्न गेल्या दोन तीन वर्षांत विशेष जोरानें झाल्यामुळें, आपणांस आजच्या उपलब्ध इतिहासांतील गैरसमजुतींनें झालेल्या बऱ्याच परंतु ठळक ठळक चुका लक्षांत येऊं लागल्या आहेत. विशेषतः या चुका कालमर्यादेच्याच आहेत व त्या, या शकावल्यांचे सहाय्यानें इतक्या सहजपणें सोडविता येतात कीं, आजपर्यंत आपण बखरींतील वाचन असें कसें चुकीचें केलें याबद्दल आपलें आपणालाच आश्चर्य वाटूं लागतें. असो, पुराणीक व कथेकरी संप्रदायाच्या परिश्रमामुळें महाराष्ट्रावर झालेल्या तत्कालीन परिणामानें जशी आपल्या अद्वितीय राजाचें आख्यान रचण्याची महाराष्ट्रांत स्फूर्ती उत्पन्न झाली तशीच मुसलमानी राज्यांतील चालू असलेली, तवारिखा अगर आत्मचरित्रवजा रोजनिशी अगर पातशहाच्या कारकीर्दींतील हकीगतींची टिपणें वेळचे वेळीं मिळवून नोंद करून ठेवण्याची वहिवाट, शिवाजीपासून नंतरचे कालीं मराठ्याचे दरबारांत उचलली गेली. ही वहिवाट ज्या वेळीं शिवाजी महाराजांनीं आपली राज्यव्यवस्था मुक्रर केली त्याचवेळीं सुरु केलीसें वाटतें. शिवाजीमहाराजांनीं जरी राज्यसंपादण्याच्या मसलतीस इ. स. १६४६ अगर तत्पूर्वींहि प्रारंभ केला असें धरून चाललें तरी तिला दादाजी कोंडदेवाचे मृत्यूपर्यंत वाव मिळाला नव्हता. दादाजीच्या मृत्यू नंतर म्हणजे इ. स. १६४७ च्या अखेरी पासून जरी थोडासा वाव मिळाला तरी आदिलशाही व मोंगली कारभारी नंतर ७—८ वर्षें इतके बलजोरी होते कीं त्यांचे पुढें आपल्या तत्कालीन जमावानिशीं शिवाजीला महाराष्ट्रांत भांडण करून वागणें शक्य नव्हतें. म्हणून या मसलतीस मूर्तस्वरूप यावयास योग्य ती संधी मिळण्यास बराच अवधी लागला; व अशी संधी इ. स. १६५६त शिवाजीला प्राप्त झाली. त्यानें राज्यसंपादनेस सुरुवात इ. स. १६५७ व ५८ त करून मुलख, गड, किल्ले, काबीज केले व तो आपणास स्वतंत्र राजा म्हणवूं लागला.

शिबंदी वगैरेंची मुल्की व लढाऊ व्यवस्थाहि त्यानें लाविली. या सर्व व्यवस्थेंत मुसलमानी राज्यव्यवस्था तंतोतंत उचलली व त्यांतच राज्यांतील राजकीय व इतर महत्वाच्या घडामोडींची नोंद करण्याची पद्धतीहि चालू केली. अर्थात् राजा या नात्यानें आपल्या राज्यांतील जमीनमहसूल वगैरे बाबींची व्यवस्था करणें जसें जरूरीचें होतें तसेंच निरनिराळ्या भागांतील राजकीय व महत्वाच्या अशा सामाजिक घडामोडींच्या आढाव्यांचें टिपण करून ठेवून तदनुरोधें मुलुखाचा व नवीन राजकारणाचा बंदोबस्त करणें तितकेंच महत्वाचें होतें. तेव्हां अशीं टिपणें करून ठेवण्याची पद्धति चालू करणें महाराजांना आपल्या राज्याची मांडणी होतांच इष्ट वाटल्यामुळें आज आपण जिला शकावली म्हणत आहों त्या राजकीय घडामोडींच्या जमाखर्चाच्या कीर्दीस सुरुवात झाली. अर्थातच या जमाखर्चाचीं टांचणें जशीं सेनापती, सरनौबत, जमेनीस, सरकारकून, सुभेदार, इत्यादि लोकांकडून येऊन पोहोंचली तसतशीं तीं जमेस घेण्यांत आलीं. त्यामुळें या कीर्दीस असले जमाखर्च जरी त्या त्या शकांत जमेस धरण्यांत आले तरी ते मितीवार अगर तिथीवार जमेस धरणें शक्य नव्हते. अर्थात् या कीर्दीकाराला जसजशी सरकारी माहिती पुरविण्यांत आली तसतशी त्यानीं ती नोंदून ठेविली. या कीर्दीचा जमाखर्च संभाजी अखेरपर्यंत अखंड चालणें साहजीक होतें. परंतु राजारामकालीं जी घालमेल झाली त्यांत मराठी राज्यांत अस्वस्थता माजली. तरीहि राजारामानीं आपली प्रधान, मंत्री, कारकून, वगैरे मंडळी सर्व शिवाजीच्या कालापासून कारभारांत असलेल्या घराण्यांतूनच निवडल्याकारणानें सरकारी दप्तरखाना या घराण्याबरोबर कायम राहिला व तो तसाच शाहूच्या आगमनापर्यंत कायम राखणें या 'मऱ्हाठ' राज्याच्या मंडळानें केलें. परतु शाहूच्या आगमनानें मराठी राज्याचीं ताराबाईनें जीं दोन शकलें केलीं त्यायोगें व शिवकालीन कित्येक घराणीं 'मऱ्हाट' राज्यासाठीं केलेल्या आत्मयज्ञांत नामशेष झाल्यामुळें या सरकारी दप्तरांत खंड पडला व कित्येक प्रसंगीं त्यांतील धागा अजिबात तुटला व शाहूच्या नूतन कारकीर्दी बरोबरच नवीन दप्तर सुरू झालें. या नूतन अमदानींत जुन्या ागदपत्रांची अगर या राजकीय जमाखर्चाची जरी जरूर भासली असली तरी । पूर्ण करण्याची तेवढी निकड नव्हती. अशा कागदपत्रांच्या अभावीं केवळ ोताच्या सांगण्यावर भरंवसा ठेवून नूतन सनदाहि देण्यांत आलेल्या बहुत आपल्या पहाण्यांत येत आहेत. त्यावरूनहि सरकारी दप्तरखाना शिवकालच्या घराण्यांबरोबर मराठी राज्याला अंतरला हें सिद्ध होत आहे. राजाराम कालीन सभासदी बखरहि नंतर शोध करून लिहिणाऱ्या बखरकारांनाहि उपलब्ध होऊं नये व त्यांतील कोणताहि भाग त्यांना उद्‌धृत करितां येऊं नये याचेंहि कारण या घालमेलीनें दप्तरखान्याचा संबंध तुटणें हेंच होय. असो, अशाप्रकारें शाहू-

कालीं नूतन राज्यबंधारणेत जरी या राजकीय घडामोडींच्या कीर्दीची वहिवाट चालू करणें इष्ट होतें तरी सुद्धां तिची पूर्तता मागील जमाखर्चानें करणें तितकें जरूरीचें नव्हतें. या कारणानें ही कीर्द शाहूकालापासून नवीनच चालू होऊन ती पेशवाई अखेरपर्यंत बिनहरकत चालू राहिली यांत शंका नाहीं. अशा रीतीनें या मराठी राज्याच्या दोन कीर्दी स्वतंत्रपणें महाराष्ट्रांत उत्पन्न झाल्या. वास्तविक या दोन्हीहि एकच. परंतु उपरिनिर्दिष्ट कारणानें या तुटल्यामुळे दोन झाल्या. शिवाय याचें मुख्य कारण म्हणजे सरकारी दप्तरखाना हा खास राजाच्या मालकीचा म्हणून मानला जात नसून तो ज्या व्यक्तीकडे कारभार आला त्याच्याच मालकीचा रहात असे हें होय. असो, याप्रमाणें आपल्या आजच्या शकावल्या किंवा तत्कालीन मराठयांच्या राजकीय घडामोडींच्या कीर्दी कशा अस्तित्वांत आल्या याबद्दल विचार झाल्यानंतर, या शकावलीचा प्रसार कसा झाला व आज ज्या या शकावल्या अगर राजकीय कीर्दीच्या नकला पहावयास मिळतात त्या नकलांचें प्रयोजन काय होतें याचा विचार करूं.

२ शिवकाली नूतन राज्यारंभ झाल्यानें गोताच्या साक्षीनें गांवाशिवांचे खटले तोडतांना ज्या राजकाजांवरून अगर स्वामीकार्यावरून न्याय मिळविण्याची अपेक्षा करावयाची तीं सर्व राजकारणें अगर स्वामीकार्यें केवळ एका पिढीच्याच कालाला मर्यादित असल्यानें अशाप्रकारची माहिती मिळविण्यासाठीं अन्यसाधनांची अपेक्षा करण्याची जरूर नव्हती. परंतु, शिवाजीच्या मृत्यूनंतर व विशेषतः औरंगझेबाच्या स्वारीनें महाराष्ट्रांत उत्पन्न झालेल्या महाराष्ट्रांतील कित्येक भागांतील अनिश्चित परिस्थिती व विशेषतः आण्णाजी व सोयराबाईच्या कारस्थानामुळें कित्येक शिवकालीन एकनिष्ठ घराण्यांत उत्पन्न केलेली तेढ यांमुळें अनेक गांवाशिवांचे वगैरे खटले उपस्थित झाले व तत्कालीन घराण्यांना न्यायाचा कांटा आपलेकडे झुकवून घेण्याकरितां आपल्या घराण्यांतील पुरुषांनीं शिवशाहीस केलेल्या मदतीची व शौर्यपूर्ण स्वामीकार्याची जंत्री देणें जरूर पडेल. अर्थात् आपल्या तर्फेच्या तकरीरा अगर करिने तयार करितांना आपल्या घराण्याची नोंद त्यांत नमूद करण्यासाठीं त्यांना राजकीय घडामोडींची माहिती बिनचूक मिळविणें इष्ट असे; व अशी माहिती बिनचूक मिळविण्यास केव्हांहि मुसलमानी राज्यांतील तवारिखांप्रमाणें कांहींतरी योजना असणें साहाजिक होतें. म्हणून उपरिनिर्दिष्ट राजकीय घडामोडीच्या खतावणीकडे धांव घेणें त्यांना जरूर पडे. अर्थात् अशा खतावणींतून उतारे घेतांना आपल्या कालास जरूर असणाऱ्या तेवढयाच भागाचे उतारे घेतले जात. उदाहरणार्थ, संभाजीच्या उत्तरकालीं एखादा माणूस फितूर होऊन औरंगझेबास मिळून नंतर राजारामकालीं मराठयांचा जम बसत आहे असें पहातांच मराठ्यांकडे आला, किंवा एखादे घराण्यांतील एक वडील बाजू मोंगलांस मिळाली व दुसऱ्या बाजूस

आपल्या घराण्यांत चालत आलेले पूर्वापार हक्क राजारामकालीं परत मिळवावयाचे असतील तर तो माणूस राजारामकालपर्यंतच्या त्या कीर्दीचा उतारा आणवून त्यांत त्याचे घराण्यांत परंपरेनें चालत आलेली व अस्सल कागदपत्रांवरून निश्चित समजणारी हकीकत घालून एक टांचण तयार करी व नंतर त्या आधारानें करिना अगर तकरीर लिहिण्यांत येई. अर्थात् असली तकरीर अगर करिना गोतापुढें ठेवतांना त्यांत दिलेल्या माहितींतील बिनचुकतेबद्दल विशेष खबरदारी घ्यावी लागे. कोठें कोठें गोताला न पटणारे विषय आल्यास त्याबद्दल त्याला अधिक पुरावे द्यावे लागत. निदानपक्षीं दिव्य तरी घ्यावें लागेच. यावरून तकरीरा व करिने तयार करितांना केलेलीं विधानें तत्कालीन पुराव्याप्रमाणें बिनचूक राखण्याची खबरदारी किती घेतली जात असे याचा बोध होईल व अशा प्रकारचे करिने अगर तकरीरा तयार करितांना शकावली अगर या राजकीय घडामोडींच्या जमाखर्चांचे उतारे बिनचूक करून घेणें कसें अवश्यक असें हें दिसून येतें. बखरी या आख्यानाकरितांच विशेषतः लिहिल्या गेल्यामुळें त्यांची नकल करून घेणें ती पूर्ण करून घेणें जरूर पडे. परंतु तशी स्थिति या राजकीय घडामोडींच्या कीर्दीची नव्हती. ज्या कालांत त्या त्या घराण्यांतील कर्त्या पुरुषांचा संबध तुटला तेथें तेथें हें नकलेचें कारण पूर्ततेस जाई व आपली आजची त्या घराण्यांतील शकावली तेथेंच विराम पावे. अर्थात् या विरामावरून आपल्याला शकावलीच्या नकलेचा कालनिर्णय करणें जसें सोपें जातें तसेंच हीं घराणीं केव्हां विराम पावलीं याचाहि कालनिर्णय करितां येऊन त्या घराण्यांच्या ऐतिहासिक कामगिरीचा बोध होतो. प्रथम प्रथम जरी मूळ कीर्दीवरून नकल करून घेण्याचा प्रयत्न झाला असला तरी नंतर नकलेवरूनच नकला होणें अगदीं साहाजिक होतें. सारांश, ज्याला आपण आज शकावली म्हणत आहों तिची जोपासना कशी सहेतुक झाली हें समजून येतें. वर सांगितलेंच आहे कीं, कालप्रसंगानें अगर महाराष्ट्रांत झालेल्या राज्यक्रांतीनें या राजकीय घडामोडीच्या कीर्दीचा धागा इ. स. १७०८ त तुटल्यामुळें व त्याबरोबरच शिवकालीन घराणींहि बहुतेक नामशेष झाल्यानें राजारामकालीं ज्या तकरीरा व करिने तयार करण्यांत आले त्यांसाठीं जशी या पहिल्या कीर्दीची जोपासना झाली त्याचप्रमाणें शाहूच्या उत्तरकालीं व नंतर ज्या तकरीरा व करिने तयार करण्यांत आले त्यांत या दुसऱ्या कीर्दीची जोपासना झाली. यानंतर शिवकालीन पुरुषांच्या पराक्रमावर दौलतीचे खटले सांगणारीं अगदींच विरळ घराणीं राहिल्यानें या कीर्दीच्या दोनीहि तुकड्यांची सांधणी क्वचित् प्रसंगीं करितां येण्यास या दोन्हीहि तुकड्यांची जोपासना करणारीं घराणीं आढळणें जरी शक्य असलें तरी तें तितकें आशास्पद नाहीं. सभासदी बखर राजाराम कालीन असूनहि

ती पेशवेकालीन शोधक बखरकारांनाहि उपलब्ध नसावी, किंवा खंडो बल्ला-ळानें तयार केलेल्या बखरी त्याच्याच घराण्यांतील प्रसिद्ध बखरकार मल्हार रामराव चिटणीसास उपलब्ध न व्हाव्या इत्यादि अनेक उदाहरणांवरून आपणाला तत्कालीन दप्तरखान्याच्या व्यवस्थेचा बोध करून घेतां येतो. असो, शाहूनंतरचीं किंवा पेशवे कालीन घराणीं बहुतेक नवीनच उदयास आल्यानें व विशेषतः राजारामकालीन महाराष्ट्रावरील संकट हेंच स्वामीकाजाचें मुख्य व महत्वाचें स्थान झाल्यानें या पेशवेकालीन घराण्यांतील तकरीरासाठीं जी माहिती मिळविणें जरूर होतें ती सर्व या नूतन कीर्दीतूनच मिळविल्यानें कार्यभाग साधे. त्यामुळें या घराण्यांतील तकरीरांत विशेषतः राजारामकालीनच वर्णन दृष्टीस पडतें व फार तर स्वतःचे कागदपत्रांवरून सांपडणारी वंशवेल किंवा थोडी-बहुत शिवकालीन माहिती त्यांत दिली जाई. यावरून आपणांस असें अनुमान काढतां येतें कीं या घराण्यांना ही पहिली खतावणी उपलब्ध नव्हती व राजाराम, संभाजी व शिवाजी यांचे अमदानींतील पुरुषांचा उल्लेख करितांना या कालांतील राजकीय घडामोडींचा उल्लेख करणें जेव्हां जरूर पडे तेव्हां तो मोघम व ऐकीव माहितीच्या जोरावरच करणें भाग असे. अर्थात्‌च अशा ऐकीव माहितीची जोड करून देतांना या मंडळीना तत्कालीन माहिती जमेस धरावी लागे व अशा तऱ्हेनें मिळविलेल्या माहितीनें ही मंडळी शाहूकालीं सुरु केलेल्या कीर्दीची पूर्तता करीत असत. अर्थात्‌च या शकावलीच्या पूर्वकालीन नोंदीचे रचनेंत राजाराम कालीन हकीकत प्रत्यक्ष पहाणाऱ्या मंडळीच्या स्मृती-मुळेच विपुल सांपडणें जसें शक्य आहे तसेंच त्यांत शिवाजी व संभाजी कालीन माहिती सांपडणें कालमानानें झालेल्या विस्मृतीमुळें कठीण असे. अशा तऱ्हेनें या दोन प्रकारच्या कीर्दी अस्तित्वांत येऊन आजच्या शकावल्यांचा प्रसार झाला व नकलावरून नकलाहि तयार करण्यांत येऊं लागल्या. भाऊबंद-कीचे खटले जसजसे वाढूं लागले तसतसा या शकावल्यांचा प्रसार प्रत्येक घराण्यांत अधिकाधिक होऊं लागला.

३. आतां वर केलेल्या स्पष्टीकरणाप्रमाणें या राजकीय घडामोडींच्या जमाखर्चाच्या नोंदी अगदीं तत्कालींच झाल्यानें या शकावलींतील माहितीला ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्व प्राप्त होत आहे ही गोष्ट जरी सिद्ध असली तरी या शकावलीच्या नोंदींत कोणत्या चुका आढळणें साहजिक आहे व असल्या शकावल्यांतील माहिती इतिहासास घेतांना आपल्याला तिचें परिक्षण करण्यास कोणत्या कसोटीस उतरवून घेणें जरूर पडेल त्याचें विवेचन करूं. मूळ प्रतीच्या अभावीं, तकरीरा अगर करिने तयार करण्याकरितां केलेल्या नकलांबद्दल आपण नंतर विचार करूं. प्रथम मूळ कीर्दीच्याच प्रामाण्याबद्दल ऊहापोह करूं. सरकारांत माहिती पुरविणाऱ्या माणसांचे मनांत विकल्प नसला व

ती लिहितांना मुख्य बाबीबद्दलची माहिती जरी अगदीं बिनचुक असली तरीहि एखाद्या अनुषंगिक बारिकसारिक बाबींतील काल अगर किरकोळ भागाविषयीं अप्रत्यक्ष रीतीनें मिळविलेल्या माहितींत गैरसमजुतीचा प्रकार शिरणें साहजिक असतें. परंतु असले प्रसंग क्वचितच आढळतात. कारण विशेषतः शकावलींतील टिपणें अगदीं ठळकठळक बाबींचीच असतात. माहिती कळविणाऱ्या अगर ती संकलित लिहून ठेवणाऱ्या माणसांकडून नावातील वर्णन्यासांत वगैरे हस्तदोष अगर इतर शब्दलोप अगर मुसलमानी वगैरे नांवाबद्दलच्या अज्ञानामुळें त्या नावांतील वर्णन्यासांत कांहीं दोष या शकावल्यांत शिरकले जातात. उदाहरणार्थ, 'शहादीखान' 'शहाबादीखान' इत्यादीनें 'शहाबुद्दीन' खानाचा नामनिर्देश करणें वगैरे. तसेंच एखाद्या सरदाराचें अगर राजाचें नांव देणें वगैरे ते टोपण नांवानीं देणें वगैरेहि दोष दृष्टीस पडतात. परंतु हे दोष कोणत्याहि कालीं घडणारे व सामान्य असतात. अर्थात् अशा प्रकारचे दोष दृष्टीस पडल्यानें या कीर्दीची बिनचुकता नाहींशी होत नाहीं हें जरी खरें असले तरी संशोधकानें असल्या चुका सुधारून शुद्ध प्रत लोकांपुढें ठेवणें हेंच त्याचें कार्य असतें. मूळ प्रतींत किंवा असल्या कीर्दीच्या लेखनात आणखी एक चूक राहाण्याचा संभव असतो; ती चूक म्हणजे एखाद्या शकाचे नंतर त्या शकांतील मजकूर लिहून आला व आपल्या मजकुराचा कालनिर्देश नंतर 'एका महिन्यांनीं' वगैरे सारख्या मोघम शब्दांत लिहून आला असला व हें टांचण तितकें नीट काळजीपूर्वक उतरून न घेतलें गेलें तर ती नोंद दुसऱ्या किंवा नंतरच्या शकांत जाणें साहजिक असतें; तसेंच कोणताहि शोध देणें तो जर एखाद्या अक्षराला गिरवूनच दिल्यास वाचनांत दुर्बोधता आणणें किंवा शोध घातला असतांहि त्या शोधाची नक्की जागा दाखविणारें काकपद न लिहिणें असलेंहि बारिक सारिक दोष मूळ कीर्दीत राहणें शक्य आहे. अर्थातच अशा दोषामुळें त्यावरून नक्कल करणाराची समजूत न पटल्य मुळें ते दोष अधिकच विपर्यस्त झालेले आहेत. वर ज्या दोषावलीचा निर्देश केला ती मूळ कीर्दींतील आहे असा म्हणण्याचा माझा मुळींच आशय नाहीं. व मूळ प्रत पाहावयास मिळाल्याखेरीज असें विधान करणें चुकीचें होईल हीहि गोष्ट माझ्या लक्षांत आहे. परंतु उपरिनिर्दिष्ट विवेचन करण्याचें कारण इतकेंच कीं त्यायोगें आपणाला एकच चूक सर्व अगर बऱ्याच नकलांत कां दृष्टीस पडते याचा उलगडा करतां येतो. असो. या प्रकारें शकावलींत सामान्यतेनें आढळणारे गुणदोष कसे कसोटी लावून सुधारावयाचे याचें स्पष्टीकरण केल्यानंतर प्रत्येक व्यक्तिशः नकलेंत किंवा नकलेवरून केलेल्या नकलेंत चुका कोणत्या रीतीनें घडून येतात व शोधानंतर त्या कोणत्या मार्गानीं सुधारतां येणें शक्य असतें याचा विचार करूं. नकलकारांचे हस्तदोष दोन प्रकारचे आहेत. एक

मोडी लिपीचें वाचन चुकीचें केल्यामुळें किंवा दिलेल्या नोंदीचा मूळ अर्थ न समजल्यामुळें अर्थविपर्यासानें एखादें अक्षर अगर शब्द बदलण्यानें दोष घडून येतात; व दुसरे लिहितांना सहज अजाणतेपणें हस्तदोषानें एकादा शब्द, वाक्य अगर ओळ गाळण्यानें अगर एखाद्या शब्दाबद्दल चुकीचा शब्द नजर चुकीनें लिहिण्यानें दोष घडून येतात. कित्येक आधुनिक नकलकारांनीं जुनी भाषा काढून टाकण्याचा प्रयत्न केल्यामुळे असल्या नोंदींत बराच अर्थविपर्यास होऊन मजकूर लिहिलेला आढळतो. परंतु असल्या दोषांबद्दल लिहिण्याचें येथें प्रयोजन नाहीं. आपण असल्या नकलांना नवीन सुधारलेली आवृत्ति म्हणूं व या बाबीचा ऊहापोह करण्याचें येथेंच सोडून देऊं. सारांश, वर सांगितल्याप्रमाणें दोन्ही प्रकारच्या घडून येणाऱ्या चुकांचें शुद्धीकरण आपणाला आंतील अनुमानिक अगर तदवलंबी मजकुरावरून करितां येण्यासारखें असतें. 'ब', 'द', 'ह', 'ल', 'ला', 'क' इत्यादि अक्षरवाचनाच्या चुका संदर्भावरून तेव्हांच शुद्ध करितां येतात. अक्षर, शब्द, अगर सबंध ओळ अगर वाक्य गळलें असेल तर तें दुसऱ्या नकलेवरून भरून काढतां येतें. तिथी, वार, पक्ष, मास, शक, व संवत्सर यांतील हस्तदोष गणिताच्या सहाय्यानें दूर करितां येतात. एकाद्या शकांतील प्रथम अगर शेवटचें कलम नजरचुकीनें पूर्वींच्या अगर नंतरच्या शकांत घुसडलें गेलें असेल तर त्या नोंदीचा शक मागें अगर पुढें होतो तो गणिताच्या प्रमाणानें अगर प्रत्यंतर पुरावा पाहून सुधारतां येतो. या चुका विशेषतः एखाद्या शकाच्या शेवटच्या पौष–फाल्गुनादि एकदोन महिन्यांतील नोंदी प्रथम येऊन त्यानंतर प्रथमचे चैत्रवैशाखादि महिने आले असले तर होतात. नकल करितांना हे या शकाचे शेवटचे महिने पूर्वील शकांतील असें समजून लेखन केलें जातें; किंवा एखाद्या शकाचे चैत्रादि प्रथम महिने शेवटीं आले म्हणजे या प्रथम महिन्यांच्या नोंदी नंतरच्या शकाखालीं घालण्याचा नकलकारांना मोह पडतो. वस्तुतः मूळ नोंदीचा क्रमांक माहितीच्या पोहोंचेवर अवलंबून असतो. मुसलमानी व युरोपियन नांवांतील चुका इतर पुराव्यांवरून दुरुस्त कराव्या लागतात. असो. अशा प्रकारें नकलांतून वगैरे जसे लेखनदोष दृष्टीस पडतात तसेंच विसाव्या शतकांतील माणसांस घोंटाळ्यात घालणारे कांहीं विशेष सोळा-सतराव्या शतकांतील लेखनांत पहावयास सांपडतात. ह्या लेखनपद्धतींतील कांहीं प्रकार पुढें देतों. एखाद्या बाबीची नोंद करितांना जेव्हां तदनुषंगी परंतु तत्पूर्वीं घडलेल्या एका अगर अधिक बाबींची नोंद करावयाची असते तेव्हां ती 'ऊन' प्रत्ययांत धातुरूपें योजून नंतर या बाबीपुढें मुख्य बाब दिलेली असते. परंतु या सर्व बाबी एकाच कार्याच्या भागमात्र असतात. अर्थात् ज्या तिथीपुढें अशी माहिती दिलेली असते तींतील मुख्य बाबीचा त्या तिथीशीं संबंध धरावयाचा

असतो, व 'ऊन' प्रत्ययांत धातुरूपानें दर्शित केलेल्या बाबी तत्पूर्वी घडल्या, असें समजावयाचें. नोंद करितांना ज्यावेळीं दोन अगर अधिक बाबी स्वतंत्र परंतु एकमेकांशीं संबंधित असून एकाच तिथीला अगर मितीला घडल्या असें दाखवावयाचें असतें तेव्हां 'ते समई', 'तेव्हां' यासारखीं क्रियाविशेषणें योजून संबंधित परंतु स्वतंत्र बाबी दर्शविल्या जातात. जर एखाद्या गोष्टीचें विवेचन करितांना नंतर घडलेल्या तत्कार्यसंबंधीहि बाबी सांगणें जरूर किंवा इष्ट वाटल्यास 'मग', 'नंतर', 'उपरि' इत्यादि शब्दांचा उपयोग केला जातो. अर्थात् ज्या तिथीला ही नोंद केलेली असते त्या तिथीशीं मुख्य बाबीचा संबंध असून 'मग', 'नंतर' वगैरे पुढें येणारीं कलमें त्या तिथीनंतरचीं आहेत असें समजावें. एकाच तिथी अगर मितीपुढें येणाऱ्या स्वतंत्र बाबीची नोंद करितांना या बाबींतील स्वतंत्रपणा दर्शविण्यासाठीं या बाबींतील प्रत्येकीपुढें '१' हा आंकडा घातलेला असतो. एखाद्या मुख्य बाबीची फोड करितांना जर तत्पूर्वी घडलेल्या गोष्टी अनुसंधानवाचक अगर कारणात्मक म्हणून लिहिणें जरूर असल्यास हीं कारणात्मक किंवा अनुसंधानवाचक वाक्यें एकापुढें एक परंतु पूर्ण क्रियापदांनीं युक्त अशा अगदीं स्वतंत्र वाक्यांचा उपयोग करून कोणत्याहि कारणात्मक अव्ययाची योजना न करितां एकापुढें एक संगतवार लिहिलेलीं असतात. अशा वेळीं अनुसंधानवाचक सर्व वाक्यांनीं दर्शविलेल्या स्वतंत्र बाबींची कालमर्यादा भिन्न असून मुख्य बाबीच्या तिथीच्या बरीच पूर्वीची असते. अर्थात् दिलेल्या तिथीचा अगर मितीचा संबंध मुख्य बाबीकडे घ्यावयाचा असतो हें सांगावयास नकोच. तसेंच एकाद्या नकलेंत चूक अगर द्विरुक्ति असेल तर या नकलेवरून दुसरी नकल करून घेतांना नकलकार ती न सुधारतां तशीच देऊन तीपुढें तो 'रुजू' हा शब्द लिहितो. असो. आज जिला आपण शकावली म्हणतो त्या राजकीय घडामोडीच्या कीर्दीच्या इतिहासाचें व तिच्या सामान्य स्वरुपाचें हें ठोकळ मानानें विवेचन केलें आहे. शकावलीबद्दलचा विचार अधिक सविस्तर रीतीनें मीं माझ्या ' मराठी राज्याची उदयकाल–शकावली ' या निबंधांत केला असून हा निबंध मीं भारत इतिहास संशोधक मंडळाच्या १३व्या संमेलन प्रसंगीं ता. ३० मे १९२५ रोजीं वाचला आहे. तसेंच शकावल्यांच्या अनेक प्रती मिळवून त्या संकलित किंवा एकत्रित करून व त्यांतील नोंदींचीहि मांडणी तारीखवार देऊन मीं एक संशोधनपूर्ण शकावलीहि प्रकाशनार्थ मंडळास सादर केलेली आहे. ती प्रकाशित झाल्यानंतर साधारण वाचकालाहि तिचा उपयोग करण्यास फारच सोपें जाईल. असो. या लेखांत आजपर्यंत छापल्या गेलेल्या अगर उपलब्ध असलेल्या शकावल्यांचें व्यक्तिशः परीक्षण वगैरे करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं म्हणून येथेंच मीं वाचकांची रजा घेतों.

वा. सी. बेंद्रे.

# १९ शिवाजी महाराजांची स्वराज्यकल्पना.

( ले—चिं. वि. वैद्य )

हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापण्याचें श्रेय शिवाजी महाराजांसच आहे असें आम्हांस वाटतें. शहाजीनें मोठ्या सैन्याच्या जोरावर पुष्कळ सत्ता मिळविली व भोगली, तरी मुसलमानांच्या ताब्यांतून महाराष्ट्रास सोडवितां येईल आणि येथें स्वराज्य स्थापन करितां येईल ही गोष्ट अशक्य आहे असे त्यास वाटत असावेसें दिसतें. यासाठीं स्वराज्यस्थापनेचें अविभाज्य श्रेय शिवाजी महाराजांसच आहे. ही शिवाजी महाराजांची स्वराज्यकल्पना पुष्कळशी अलिकडच्याच प्रकारची होती अशी आमची समजूत आहे. शिवाजी महाराजानींच स्वराज्य शब्द हिंदुस्थानाच्या इतिहासांत प्रथम उच्चारला. आणि तो शब्द दादाभाई नौरोजींनीं उचलून अलिकडील राजकीय चळवळींत पुढें आणला. असा शब्द व अशी कल्पना परराज्यानंतरच उत्पन्न होणें शक्य आहे. मुसलमानांच्या तीन-चारशें वर्षांच्या परकीय अमलानंतर खऱ्या स्वराज्याची कल्पना महाराष्ट्रांत उत्पन्न झाली व ती शिवाजी महाराजांच्या प्रथम डोक्यांत आली 'हें देणें ईश्वराचें'. प्राचीन काळीं आपल्याच राजांचें राज्य हिंदुस्थानांत नांदत असल्यानें हिंदुस्थानांत खरी स्वराज्याची कल्पना उत्पन्न न होणें साहजिक आहे. हिंदुस्थानांतील लोकांच्या राजकीय कल्पनाहि चुकीच्या होत्या व हें स्वराज्याची योग्य कल्पना उत्पन्न होण्यास पुष्कळ काळ पावेतों आडवें आलें, हेंहि मान्य करावे लागेल.

राज्य किंवा राष्ट्र लोकांचें आहे ही कल्पना अति प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत असली तरी ती लौकरच नष्ट झाली. वैदिककाळीं किंवा भारतकाळीं कुरु, पांचाल, मद्र वगैरे लोकांचींच नांवें देशास व राजास असत. परंतु पुढें राजसत्ता चोंहीकडे प्रबल होऊन राजांचीं नांवें देशास पडूं लागलीं. किंवा राजधानीच्या नांवानेंहि राज्य ओळखूं लागलें. राज्य शब्दांतच ही चुकीची राजकीय कल्पना प्रतिबिंबित झालेली दिसते. राजाचा मुलूख ते राज्य अशा अर्थानें राष्ट्र शब्द मागें पडून राज्य शब्द पुढें सरसावला. त्यामुळें देश राजाचा ही कल्पना रूढ व प्रसृत झाली. हिंदुस्थानांतील राज्यें म्हणजे राजांचे देश असाच शब्दव्यवहार चालू झाला. राष्ट्रभावना नष्ट होऊन राजभक्ति चोहींकडे आदरणीय झाली. राजास जें राज्य मिळतें तें परमेश्वराच्या कृपेनें मिळतें, लोकांच्या संमतीनें नव्हे, असाहि सिद्धांत राजकीय तत्त्वज्ञानांत प्रविष्ट झाला. आणि देशावर प्रचलित राजवंशांत जन्मलेले पुरुष यांचीच मालकी अशी लोकांची समजूत झाली.

संसारांतील हजारों घडामोडी कल्पनांवर कशा चालतात हें पाहिलें असतां आश्चर्य वाटतें. संकल्पावर संसारांतील हजारों व्यवहार चालतात व

उच्च नीच संकल्प उत्कर्षापकर्षास कारण होतात. युक्त व पायाशुद्ध राजकीय कल्पना नसल्यानें हिंदुस्थानांतील लोकांचें फारच नुकसान झालें आहे. देश राजाचा, ही कल्पना रूढ झाल्यानें हिंदुस्थान देशावर मालकी दिल्लीच्या बादशाहाची ही कल्पना कित्येक शतकें लोकांत रूढ होती. यांचा उगम कल्पनेनें पांडवांपर्यंत पोहोंचिवला. हिंदुस्थानचे सार्वभौम पांडव, त्यांचे वंशज तंवर, त्यांचे स्थानापन्न मुसलमानी बादशाहा असा संबंध लागून 'मुलूख बादशाहाका' अशी समजूत हिंदुस्थानांत अगदीं अलिकडेपर्यंत होती. या समजुतीला धक्का न बसावा म्हणून इंग्रजांनीं बंगाल्यांत सत्ता चालविली तेव्हां बादशाहापासून बंगाल खंडानें घेतलें !! आणि 'मुलूख बादशाहाका अमल अंग्रेज सरकारका' अशी द्विदल राज्यपद्धति दर्शनी सुरू केली.

दक्षिणेंतहि बेदरचे बादशहा दिल्लीच्या बादशहाचे प्रतिनिधि, ईश्वरकृपेनें सत्तावान्, अशीच समजूत शेकडों वर्षे होती. त्या वेळचे मराठी लेख पाहिले म्हणजे बेदरचे बादशहा म्हणजे दक्षिणचे मालक ही सर्वव्यापी समजूत दिसते. तीच समजूत बेदरचे पांच तुकडे झाले तेव्हांहि राहिली. नगर किंवा विजापूरचे बादशहा हे परमेश्वरकृपेनें महाराष्ट्राचे मालक आहेत असेंच लोक समजत. स्वामिभक्तीनें म्हणा किंवा लोकांच्या समजुतीनें म्हणा शहाजीस सामर्थ्य होतें तरी निजामशाहीचा वारस लहान मुलगा मांडीवर घेऊन शाहाजी गादीवर बसे, तेव्हां त्या मुलास अधिकार कां आणि मी महाराष्ट्राचा राजा कां नाहीं ? ही कल्पना त्यास सुचत नव्हती. कदाचित् सुचली असती तरीसुद्धां लोकांच्या कल्पनेंत जोंपर्यंत परिवर्तन झालें नव्हतें तोंपर्यंत त्यास कांहींच करितां आलें नव्हतें. निजामशाहिच्या वंशातील अल्पवयी मुलगा हाच देशाचा मालक अशी सर्व लोकांची समजूत होती. तात्पर्य, बादशहा हा हिंदुस्थानचा मालक ही समजूत प्रथम घालविणें जरूर होतें. राज्याचे मालक लोक आहेत हें प्रथम शिवाजी महाराजांनीं लोकांच्या मनांत ठसविलें. विजापूरहशींतील जुलूम व मोंगलशाहींतील औरंगजेबाचा धर्मच्छल यामुळे ही कल्पना रूढ होण्यास मदत झाली ही गोष्ट खरी. पण एक कल्पना घालवून दुसरी कल्पना प्रसृत करणें व तीस योग्य नांव देणें, हें जें महान् व्यक्तीचें लक्षण तें शिवाजी महाराजांस लागूं पडतें. महाराष्ट्र विजापूरच्या बादशहाचें नसून महाराष्ट्रीयांचें आहे ही भावना त्यांनीं जागृत केली व यासच त्यांनीं स्वराज्य हें नांव दिलें.

शिवाजी महाराजानंतर ही भावना महाराष्ट्रांत पुष्कळ वर्षे जोरांत होती. पण पेशवाईच्या उतरत्या काळांत ती नष्ट झाली असें म्हणावें लागतें. याचे अनेक दाखले देतां येतील, पण शेवटचा दाखला म्हणजे दुसऱ्या बाजीरावानें इंग्रजांच्या हातावर मराठी साम्राज्याचें उदक घातलें तो होय. लोकांची समजूत अशी दिसते कीं, मराठी साम्राज्याचे मालक पेशवे आणि खासगी मिळ-

कतीप्रमाणें हें राज्य पेशव्यांस वाटेल त्यास देतां येणें शक्य आहे; पण खरा राजकीय सिद्धांत म्हटला म्हणजे राष्ट्र लोकांचे आहे, राजाची खासगी मिळकत नव्हे; राजा लढाईंत हारला तरी राष्ट्र शत्रूचे होत नाहीं; आणि राजाच्या सनदेनें किंवा लेखानें राज्य किंवा राष्ट्र दुसऱ्याकडे जात नाहीं. असा सिद्धांत पाश्चात्य देशांत संमत झाला आहे. तिसऱ्या नेपोलियनच्या वेळेला जेव्हां फ्रान्सचा पराभव होऊन नेपोलियन जर्मनीच्या स्वाधीन झाला, तेव्हां जर्मनीनें नेपोलियनशीं तह करून कोणताही संधि केला नाहीं किंवा कोणताही मुलूख घेतला नाहीं. पॅरीस येथें नवे लोकसत्ताक राज्य बनल्यावर त्या राज्याशीं तहाचें बोलणें जर्मनीनें केलें. हल्लींसुद्धां पाश्चात्य देशांत कोणत्याही तहाचीं कलमें लोकसभेपुढें मंजूर करून घ्यावीं लागतात. राजास स्वतंत्रपणें राष्ट्राची किंवा प्रांताची विल्हेवाट करण्याचा अधिकार नसतो. असो. राष्ट्र राजाचें आहे ही कल्पना हिंदुस्थानच्या लोकांच्या मनांत खिळलेली नष्ट होऊन त्याऐवजीं राष्ट्र लोकाचें आहे व राजा हा लोकांचा प्रतिनिधि आहे ही पायाशुद्ध कल्पना खिळली पाहिजे. शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांतील लोकांच्या मनांत ही कल्पना भरवून जोराची राष्ट्रीय भावना कशी जागृत केली हें आपण पाहूं.

शिवाजी महाराजांचें स्वराज्य म्हणजे भोसल्यांचें राज्य नव्हे, किंवा उच्चवर्ण मराठे क्षत्रियाचेंहि राज्य नव्हे. राज्य बादशाहाचें किंवा राजाचें ही कल्पना नष्ट करून राज्य लोकांचें ही कल्पना लोकांच्या अन्तःकरणांत शिवाजी महाराजास ठसवावयाची होती. त्याप्रमाणें राष्ट्र महाराष्ट्रीयांचें आहे असें ते लोकांच्या मनांत बिंबवीत. याचा प्रत्यंतर पुरावा अफझुलखानाच्या वेळीं मावळच्या देशमुखांमध्यें जी भवतिनभवति झाली त्याचें वर्णन करणारे एक पत्र सांपडलें आहे त्यांत मिळतो. विजापूरच्या बादशाहानें या देशमुखांना असा हुकूम पाठविला होता कीं बादशाही गादीस स्वामिभक्तीनें मदत करून शिवाजीचा उच्छेद होईल अशी व्यवस्था करावी. त्यावेळीं देशमूख लोक जमा होऊन अफजुलखानास मदत करावी किंवा शिवाजीस करावी, या प्रश्नाचा विचार सुरू झाला असतां; बादशाही गादी कोठून आली, " हें महाराष्ट्र राज्य आहे; " आपल्यास शिवाजीसच मदत करावयास पाहिजे असें त्यांनीं ठरविलें. 'महाराष्ट्र' हा संस्कृत शब्द त्यांनीं वापरला, मराठी शब्द वापरला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचें राज्य म्हणजे स्वराज्य अशी ही कल्पना असून ती सर्व लोकांत पसरली व स्वराज्य शब्दांत याप्रमाणें मोहिनी भरून लोकांत उमेद उत्पन्न झाली.

याच कल्पनेंत स्वधर्माची कल्पनाहि अन्तर्भूत होती; आणि रामदासांचा महाराष्ट्र धर्म हा शब्द याच अर्थानें भरलेला होता. महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचें स्वधर्मयुक्त म्हणजे वैदिकधर्म-युक्त राज्य, म्हणजे महाराष्ट्रधर्म अशी

कल्पना रामदासांनीं रूढ केली. 'रामदास आणि रामदासी' या मासिकांत 'महाराष्ट्रधर्म' या मथळ्याखालीं जी विस्तृत माहितीनें भरलेली विचारपरिप्लुत लेखमाला प्रसिद्ध होत आहे, त्यांत दाखविल्याप्रमाणें महाराष्ट्र धर्म हा शब्द रामदासापूर्वी गुरुचरित्रांत आला आहे हें खरें. तथापि पूर्वींचाच शब्द विशिष्ट अर्थानें वापरून त्यांत रामदासांनीं नवीन सामर्थ्य उत्पन्न केलें असें दिसतें. शिवाय महाराष्ट्रधर्म आणि भारतव्यापी वैदिकधर्म यांत कांहीं अंतर असलेंच पाहिजे. हिंदूंच्या धर्मकल्पनेंत राजकीय बाबींचाहि अन्तर्भाव होतो. आणि म्हणूनच स्मृत्यांतून इतर धर्मांबरोबर राज्यव्यवहाराचाहि उल्लेख येतो. तात्पर्य, महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्रांत वैदिकधर्मयुक्त महाराष्ट्रीयांचें राज्य, अशी कल्पना हरिभजन आणि राजकारण यांची सांगड घालणाऱ्या रामदासांनीं प्रसृत केली. हीच कल्पना शिवाजी महाराजांचीहि होती. ते "हें राज्य देवाब्राह्मणांचें आहे" असेंच म्हणत असत. शिवाजी महाराजांनीं रामदासापासून ही कल्पना घेतली असें नाहीं. दोघांची एकच कल्पना व वृत्ति जुळली, तेव्हांच गुरुशिष्य-नातें जडलें. असो. स्वराज्य आणि स्वधर्म यांच्या जोडीनें महाराष्ट्रधर्म लोक मानूं लागले आणि महाराष्ट्रांत स्वधर्मयुक्त स्वराज्य असावें ही लालसा लोकांत वावरूं लागली.

शिवाजी महाराजांच्या स्वराज्याची व्याप्ति महाराष्ट्रापुरती होती असें आमचें मत आहे. हल्लीं स्वराज्याची व्याप्ति प्रांतभेद उल्लंघून हिंदुस्थानास व्यापून आहे, तशी त्या वेळीं नसणें साहजिक आहे. दिल्लीहून बाळाजी विश्वनाथानें स्वराज्याची सनद आणिली याचा अर्थ महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचें स्वतंत्र राज्य बादशहास मान्य आहे असाच होता. संभाजी व राजाराम यांच्या वेळींहि स्वराज्याचा हाच अर्थ होता. माळवा किंवा बंगाल येथें मराठ्यांचें राज्य नसून साम्राज्य होतें. असें साम्राज्य स्थापण्याची कल्पना पहिल्या बाजीरावाची. शिवाजी महाराजांच्या मनांत असें साम्राज्य स्थापण्याची कल्पना होती कीं नाहीं, ही गोष्ट तपासून पाहिली पाहिजे. आणि हिंदु-पद-पादशाही हा शब्द समकालीन लेखांत केव्हां येतो हें तपासलें पाहिजे. पण शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापिलें म्हणूनच साम्राज्य स्थापणें शक्य झालें, आणि स्वराज्य-स्थापनेची मनोभावना साम्राज्यस्थापनेच्या भावनेपेक्षां नेहमींच उच्चतर असून शिवाजी महाराजांचें कार्य जास्त उदात्त होतें हें सांगावयास नको.

प्रबळ झालेल्या यवनसत्तेस हाणून पाडून महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन कर-ण्याचें अत्यंत बिकट काम शिवाजी महाराजांस तडीस न्यावयाचें होतें, तें लोकांत राष्ट्रीय भावना जागृत केल्याशिवाय शक्य नाहीं, हें शिवाजी महारा-जांनीं ताडलें, आणि लोकांत राष्ट्रीय भावना उत्पन्न केली. हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून राष्ट्रीय भावना कोठेंच नसून 'लॉयलटी' अथवा

स्वामिभक्ति हीच भावना नेहमीं चालत असे व हल्लींहि चालत आहे. यामुळें परकी राजा असला तरी त्याची सेवा करून त्याच्या तर्फेनें आपल्याच लोकांशीं लढण्यास हिंदुलोक मागेंपुढें पहात नसत. यामुळें मराठे वीर बादशहाच्या बाजूनें मराठ्यांशींच लढत. 'तुम्ही यवनाची नोकरी कां करितां' असें मराठे सरदारांस विचारलें तर 'गादीशीं निमकहरामी होणार नाहीं.' असेंच उत्तर मिळे. पण स्वराज्याशीं व स्वधर्माशीं निमकहरामी होते हें त्यांच्या लक्षात येत नसे. 'हें राज्य महाराष्ट्रीयांचें आहे. यवनांचें नाहीं; देवाब्राह्मणांचें आहे, यावनी धर्माचें नाहीं' अशा प्रकारची स्वराज्य भावना महाराष्ट्रीयांत शिवाजी महाराजांनीं उत्पन्न केली; आणि मराठे लोकांचे लक्ष यवनसेवेपासून परावृत्त करून स्वराज्यस्थापनेकडे लाविलें.

'महाराष्ट्रीय' लोकांत सर्व लोकांचा अन्तर्भाव शिवाजी महाराजांनीं केला. यवनी सत्ता हाणून पाडण्यास्तव व प्रबळ सार्वभौम मोगल सत्तेस तोंड देण्यास केवळ लढवय्य मराठे क्षत्रिय वीर, यवनसेवेपासून विन्मुख करणें पुरें नव्हतें; तर देशांतील सर्व लोकांच्या अन्तःकरणांत राष्ट्रीय भावना जागृत करून सर्व लोकांचा पाठिंबा स्वराज्यस्थापनेस मिळविणें जरूर होतें. अशी राष्ट्रीय भावना हिंदुस्थानांत सर्व लोकांच्या अन्तःकरणांत जागृत करण्याचें प्रथम श्रेय शिवाजी महाराजांसच आहे. हिंदुस्थानच्या इतिहासात दोनच ठिकाणीं अशी राष्ट्रीय भावना जागृत झालेली दिसते; शिवाजीच्या वेळीं महाराष्ट्रांत आणि गुरुगोविंदसिंगाच्या वेळीं पंजाबांतील शिखात. परकीय सत्ता प्रबळ झाली असतां, तिच्याशीं विरोध दहापांच लढवय्ये लोकांनीं करून चालत नाहीं, तर सर्व लोकांनीं असा विरोध करावा लागतो. असा विरोध हिंदुस्थानच्या इतिहासांत वरील दोनच ठिकाणीं झालेला दिसतो. राजाचा पराभव एखाद दुसऱ्या लढाईत होतो. पण लोकांचा विरोध असल्यास स्वातंत्र्य नष्ट होत नाहीं. रामदेवराव जाधव याचा पराभव झाल्यावर महाराष्ट्र एकदम परतंत्र होऊन यवनसत्तेखालीं कां गेलें याचें पुष्कळांस गूढ पडतें. पण याचें उत्तर हेंच कीं, लोकांमध्यें राष्ट्रीय भावना किंवा स्वदेशभक्ति त्यावेळीं जागृत नव्हती. यादवांचा पराभव झाल्याबरोबर मुसलमानांची सत्ता महाराष्ट्रानें निमुटपणें मान्य केली. राष्ट्रीय भावनेचें सामर्थ्य किती आहे, हें शिवाजी महाराजांस कळलें होतें असें मला वाटतें. त्यांच्या महाराष्ट्रीय शब्दांत सर्वांचाच अन्तर्भाव होत होता. ब्राह्मण, प्रभु, मराठे क्षत्रिय, मराठे कुणबी, मावळे, वगैरे सर्वांसच शिवाजी महाराजांनीं हातीं धरलें आणि सर्वांच्या अन्तःकरणांत राष्ट्रीय भावना जागृत करून त्यांस स्वदेशाच्या कार्यास अनुकूल करून घेतलें. राष्ट्रीय भावना-अर्थात् स्वदेशभक्ति महाराष्ट्र धर्मांत अन्तर्भूत होती असें आम्हास वाटतें. स्वदेश आणि स्वदेशभक्ति हे शब्द मराठ्यांच्या स्वराज्य वाङ्मयांत सांपडत नसले तरी,

त्याची कल्पना त्यावेळीं शिवाजी महाराजांनीं व समर्थ रामदासस्वामींनीं उत्पन्न केली होती. 'मराठा तितुका मेळवावा आणि महाराष्ट्र धर्म वाढवावा' असें जें रामदासांनीं म्हटलें आहे, त्यांत ' मराठा तितुका ' या शब्दांनीं केवळ मराठा क्षत्रियच बोधित होत नसून जो जो महाराष्ट्रांत राहतो तो तो मराठा समजून स्वराज्याला म्हणजे महाराष्ट्र धर्माला अनुकूल करून घ्यावा, असें रामदासांचें सांगणें दिसतें; व हीच कल्पना शिवाजी महाराजांची दिसते. त्यांनीं उच्चवर्ण क्षत्रियांसच नव्हे, तर महाराष्ट्रांतील सर्व जातींच्या लोकांस स्वराज्यास अनुकूल करून घेतलें; व वैदिक धर्म चालविणारे ब्राह्मण, लेखणी चालविणारे प्रभु, आणि नांगर चालविणारे कुळंबी ह्या सर्वांस वीर बनविलें.

अशा प्रकारची सर्व लोकांत राष्ट्रीय भावना म्हणजे स्वधर्मयुक्त स्वदेशाभिमानासहित स्वराज्यप्रेम शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांत किती जोरानें जागृत केलें, याचें प्रत्यंतर शिवाजी महाराजानंतर महाराष्ट्रावर जी आपत्ति कोसळली, त्या आपत्तींत महाराष्ट्रानें वीस वर्षें टिकाव धरून, अवरंगजेबाच्या प्रचंड शक्तीस विरोध करून, शेवटीं आपलें स्वराज्य कायम राखिलें, ह्यावरून दिसून येतें. हा मराठ्यांच्या इतिहासांतच नव्हे, तर हिंदुस्थानच्या किंबहुना जगताच्या इतिहासांतील अत्यंत उत्साहजनक देखावा होय. अवरंगजेब सर्व साम्राज्याचें सामर्थ्य घेऊन आपल्या लाखो फौजेनिशीं महाराष्ट्रांत वीस वर्षें बसला, महाराष्ट्रांतील सगळे किल्ले घेऊन देश उध्वस्त केला. पण मराठ्यांनीं त्याची सत्ता किंवा त्याचा धर्म कबूल केला नाहीं. संभाजी कितीहि दुर्गुणी असला तरी त्यानें आपल्या पित्याच्या ब्रीदास व कीर्तीस साजेल असेंच धैर्य दाखवून स्वधर्मासाठीं देहाचे अनेक क्लेश सोसून प्राणत्यागहि केला. राजारामानें स्वराज्यासाठीं देशत्याग करून बाहेरून इतकी जोमाची व चिकाटीची लढाई चालविली व महाराष्ट्रानें त्यास इतका पाठिंबा दिला कीं, अवरंगजेबास त्राहि त्राहि झालें. मराठे वीरांनीं त्याच्या भोंवतीं घिरट्या घालून त्याच्या सैन्यास इतकें जेर केलें कीं, अवरंगजेब फौजेंतून बाहेर पडेनासा झाला; व महाराष्ट्रास पादाक्रांत करण्याचा हव्यास सोडून अवरंगाबादेस परतून, निराश होऊन परलोकास गेला. तात्पर्य, शिवाजी महाराजांनीं जागृत केलेली राष्ट्रीय भावना किती जोराची होती हें ह्यावरून दिसेल. अल्लाउद्दीनानें यादवरावास जिंकून एका लढाईत सबंध महाराष्ट्र एका वर्षांत खालसा केला, तर अवरंगजेबास अनेक लढाया जिंकूनहि व मराठ्यांचे सर्व किल्ले घेऊनहि त्रीस वर्षें महाराष्ट्र व्यापून महाराष्ट्र काबीज करतां आला नाहीं. या भिन्न दृश्यांचें कारण अल्लाउदिनाच्या वेळीं महाराष्ट्रांत राष्ट्रीय भावना नव्हती व अवरंगजेबाच्या वेळीं शिवाजी महाराजांनीं जागृत केलेली राष्ट्रीय भावना तीव्र कायम होती. स्वधर्म, स्वदेश व स्वराज्य या विषयींचें निःसीम प्रेम महाराष्ट्रांतलि प्रत्येक व्यक्तीच्या अन्तःकरणांत वसत

होतें. ज्या लोकांत तीव्र राष्ट्रीय भावना जागृत आहे त्या लोकांस जिंकणें अशक्य आहे. 'No people actuated by a strong feeling of nationality can be conquered by a foreign army however large.' ह्या पाश्चात्य राजकीय सिद्धांताचा प्रत्यक्ष अनुभव याप्रमाणें महाराष्ट्राच्या इतिहासात नमूद केला.

असो; तर शिवाजी महाराजांची स्वराज्यकल्पना याप्रमाणें असून, तींत स्वधर्माचाहि अन्तर्भाव होत होता; अलिकडच्या कल्पनेप्रमाणे ती महाराष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीस व्यापून होती. स्वराज्य म्हणजे शिवाजीचें किंवा भोसल्यांचें किंवा मराठे क्षत्रियांचें राज्य नव्हे, तर महाराष्ट्रांत राहणाऱ्या सर्व लोकांचें स्वराज्य अशी शिवाजी महाराजांची कल्पना होती. त्यांत मुसलमानांचेंहि अस्तित्व शिवाजी महाराजांस मान्य होतें असें दिसतें, ज्यानीं त्यांनीं आपला धर्म दुसऱ्याच्या धर्मास त्रास न देतां चालवावा अशी त्यांची कल्पना दिसते; आणि महाराष्ट्रांतील मुसलमानांसहि मराठा समजून त्यांनीं आपल्या स्वराज्याच्या स्थापनेस मदतीस घेतलें. हीच दृष्टि लावून हल्लींच्या काळांत आपल्यास जें स्वराज्य पाहिजे, त्यांत सर्व धर्मांचा अन्तर्भाव करणें शक्य आहे. आणि बॅप्टिस्टासाहेब खिस्ती असले तरी त्यास महाराष्ट्राचा अभिमान असून, महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचें राज्य असावें असेंच मानणारे असल्यानें, ते आपल्यास मराठा योग्य रीतीनें कां म्हणतात हें आपल्या लक्षांत येईल. शिवाजी महाराजांची स्वराज्य–कल्पना कशी उच्चतम राष्ट्रीय भावनेची होती, हें शिवजन्मतिथीच्या उत्सवप्रसंगानें वाचकांसमोर मांडून मी त्यांची रजा घेतों.

---

॥ ॐ ॥

# २० भोसल–वंशावली

## वेंकट भट्ट विरचिता

( संशोधक —रा. स. म. दिवेकर, कल्याण.)

॥श्रीगणेशाय नमः॥

आसीदाशावकाशप्रसृतसितयशा दक्षिणाशाविभूषा
शौर्यश्रीकेलिसौधायितकरकमलोदग्रराजत्कृपाणः ।
नानादेशोपसीदद्बुधजननिकरस्तूयमानोवदान्यः
चण्डांशोरन्ववाये त्रिभुवनमहिते श्रीवराट क्षितींद्रः ॥ १ ॥

सौन्दर्यसिन्धुरिति सारसलोचनाभिः
सौजन्यभूमिरिति साधुजनावलीभिः ।
वैदग्ध्यभूरिरिति पंडितमंडलीभिः
आलक्ष्यते स्म कलितावतरः सुधीमान् ॥ २ ॥

तदन्ववाये प्रथितप्रभावः । श्रीमानभूदेकनराधिपो यः ।
औदार्यशौर्यादिगुणैरवन्यां । पुरातनक्षोणिभृतोऽत्यशेत ॥ ३ ॥

त्यागे दधीचिशिबिकर्णमुखाः प्रतीताः
शौर्येऽर्जुनप्रभृतयो धरणीमहेन्द्राः ।
आसन्कृतादिषु युगेषु कलौ तु तेषाम् ।
तेषां च यो धुरमगाहतपूतकीर्तिः ॥ ४ ॥

तस्मादजायत निजायतनं गुणानाम् ।
आजानबोधविमलः परसोजिनाम ।
यस्य प्रतापदहनं करवालधूमः ।
प्रायो विपक्षमनुमापयतीह चित्रम् ॥ ५ ॥

यत्प्रत्यर्थिवसुन्धराधिपतयः संग्रामसन्नाहिनो
दृप्यद्गन्धकरीन्द्रतुंगतुरगाव्रातैर्मदांधीकृताः ।
कल्पान्तांबुदगर्जनारभटिकाकुट्टाकभेरिध्वनिं
श्रावं श्रावमनल्पसाध्वसभृतः कान्तारमाशिश्रयन् ॥ ६ ॥

अस्तोका चक्रवालाचलवलयलसत्कीर्तिरासीदमुष्मा—
दासीत्कारातिभूमीपरिवृढदलनोद्दामभीमप्रतापः ।
तत्तादृग्दानलक्ष्मीविहरणकलनासौधहस्तारविन्दो
भूपः पुण्यैरगण्यैर्जनकमनुसरन्वीर बाबाजि नामा ॥ ७ ॥

येन दूषणनिरासकारिणा विश्रुतेन जनकानुवर्तिना ।
इह दाशरथिनेव किं जनस्थानमन्वरचि नोपकंटकम् ॥ ८ ॥

तस्मादुद्यत्प्रतापः कमलभव इवाभ्यस्तसत्यानुवृत्ति—
र्जज्ञे पाठीनकेतुप्रमथन इव प्राप्तभूमिप्रकर्षः ।
क्ष्मालक्ष्मीसाहचर्यस्फुरदुरुमहिमा पद्मनाभेन तुल्यः
प्रौढत्यागावधूतामरतरुविभवो वीर मालोजी नामा ॥ ९ ॥

जगत्त्रयनिरन्तरभ्रमणसंभ्रमोदित्वरः—
रमातुरयशःसितक्रदवरस्यणडूपतेः ।
सुधानिधिसुरापगाप्रभृतयः प्रपागारताम्
भजन्ति धरणिमणेश्चरितमस्य पारे गिराम् ॥ १० ॥

तस्यासीत्पूर्णपुण्यः सुरयुवतिगणस्तूयमानप्रशस्तिः
सूनुः शाहेन्द्रनामार्जुन इव नियतं धर्ममार्गानुसारी ।
राकानीहारभानुद्युतिहसनरुचिर्भासुरा यस्य कीर्ति-
र्दानश्रीश्रोज्जजंभे सततमातिधरं कर्णमार्गप्रवृत्ता ॥ ११ ॥
यस्य प्रौढिरपास्तवाक्पतिकला प्राविण्यमिष्ठानिधिः
शौर्ये न्यक्कृतकर्णपार्थसमरप्रावीण्यविस्तारितम् ।
औदार्ये पुनरस्तवैबुधगवीचिंतामणिप्राभवम् ।
शीलं तस्य वसुन्धराधिपमणेः केनोपमीयेत तत् ॥ १२ ॥
तस्मादत्रेरिवासन्विधिहरहरयः पूर्वपुण्यप्रभावात्
एकक्ष्मापालशम्भुक्षितिपातिशिवभूजानयो नामतो ये ।
तत्र ज्येष्ठो गुणौघैरपि च जननतः शंभुभूमीमहेन्द्रो
धरिस्तस्यानुजन्मा शिवनृपातिरभूत् एकभूभृत् ततोपि ॥ १३ ॥
धर्मार्थकामैरिवमूर्तिमद्भिः सदानुवृत्तस्तनयैरमीभिः ।
स्वतेजसा निर्जितशत्रुवर्गः स राजसिंहः पृथिवीं शशास ॥ १४ ॥
तेष्वग्रजः शंभुमहीमहेन्द्रो नदीदशाक्षाच्छिवधर्मवक्ता ।
अरातिदंतावलिदर्पहंता संतापहारी वसुधासुधादाम् ? ॥१५॥
शिवक्षमेशः शिव एव साक्षाद्दहीनसत्वाभरणो व्यराजत् ।
यस्य स्मिते न ह्यभवन्नराणां नामावशेषा नगरी विशेषाः ॥ १६ ॥
दिल्लीपुराधीशमुखावनीशदुर्वारगर्वग्रहमान्त्रिकः सः ।
वरूथिनीरन्वहमेतदीया निजप्रतापज्वलने जुहाव ॥ १७ ॥
अनेकदुर्गाधिपतिःशिवोऽसौ सामन्तचूडामणिरञ्जितांघ्रिः ।
चमूपतीनां यवनावनींदोः संवर्तकालानलतां प्रपेदे ॥ १८ ॥
यमंतराविश्य मुदा भवानी कर्तव्यचिंतासमकालमेव ।
निवेदयन्ती हितकार्यजातमन्वग्रहीत्स्कंदमिवातिवेलम् ॥ १९ ॥
निर्जित्य सर्वानवनीमहेन्द्रान् नृपः स सिंहासनमध्यरोहत् ।
योधत्त दिल्लीपतिचित्तशल्यमनन्यगच्छन्नृपतीतिशब्दम् ॥ २० ॥
तस्यानुजन्मैकधलाब्दलारिः मुक्तामणिर्भोंशलवंशजातः ।
गुणैरशेषैः विबुधप्रशस्तैरन्वर्थनामेति यमाहुरार्याः ॥ २१ ॥
सत्ये हरिश्चन्द्रमिव क्षमायां तुल्यं दशस्यन्दननन्दनेन ।
आसेदिवांसं रणरङ्गभूमौ जयेंदिरा यं वृणुते स्म नित्यम् ॥ २२ ॥
तेनोर्वीरमणेन राज्यमखिलं धर्मेण संरक्षता
पूर्वे राघवधर्मनन्दनमुखा विस्मारिता भूभुजः ।

यस्योत्तुंगतरंगपाणिविगलद्दानांबुपंकीभवत्-
क्षोणिसंभवकीर्तिकैतवलतापद्मः सुवर्णाचलः ॥ २३ ॥
स चोलदेशं पृथुनालिकेरश्रियं समाक्रम्य महीमहिष्याः ।
कवेरजाकैतवहाररम्यं सान्द्रानुरागं बुभुजे महीन्द्रः ॥ २४ ॥
बुद्ध्या बृहस्पतिसमः किल तस्य मन्त्री
**काकाजिपंडित** इति प्रथितो बभूव ।
तद्बुद्धिमार्गधरिताखिलकार्यजातः
स्वर्गे पुरंदर इवैष शशास पृथ्वीम् ॥ २५ ॥
**तस्यैकराजस्य** गुणैरनूना वाणी विधातुः कमलेव विष्णोः ।
दाक्षायणीव स्मरशासनस्य दीपांबिकाऽभूत्किल धर्मपत्नी ॥ २६ ॥
अरुंधतीवात्मभुवस्तनूजं सीतेव रामं नलिनीव भानुम् ।
ज्योत्स्नेव चन्द्रं ललनामणिः सा संप्राप्य कान्तं तमियं व्यलासीत् ॥ २७ ॥
तस्यामभूवन्नवनीसुधांशोः **शाहेन्द्र** नामा **शरभा**भिधानः ।
भुवि प्रतीतस्**तुलजा**भिधश्च समानरूपाकृतिशालिनोमी ॥ २८ ॥
तेष्वग्रजः **शाहमहीमहेन्द्रो** भीमार्जुनाभ्यामिव धर्मसूनुः ।
अमुक्तपार्श्वोगुणशेवधिभ्यां सहोदराभ्यामवनीं प्रशास्ति ॥ २९ ॥
एकत्रतारापतिसुन्दरस्य परत्र पार्श्वे स्फुरदर्कभासः ।
हेमज्वलस्यानुकरोति लक्ष्मीं सदा नृपोऽसौ सह सोदराभ्याम् ॥ ३० ॥
उर्वरा परिचितेव पारदैः शारदैरिव घनैर्घनं नभः ।
आचरत्यपररूपनिह्नवं जान्हवीसदृशयद्यशोभरैः ॥ ३१ ॥
अस्य क्षोणिभुजः प्रयाणपटहध्वानैरुदारक्रमैः
वैरिस्त्रीकुचकुंभपत्ररचनासंवर्तमौहूर्तिकैः ॥
आक्रांते हरिदन्तरे विजघटे विध्यंडभांडोदरे-
र्ध्वंसे शिथिलीकृतोन्नतिधराभृत्संधिबन्धैरपि ॥ ३२ ॥
गद्यप्रबन्धैरपि पद्यबद्धैश्चपूप्रबन्धैरपि हृद्यबन्धैः ।
शास्त्रप्रसंगैर्विविधैर्दिनानि नयत्यसौ साहमहीबलारिः ॥ ३३ ॥
हृद्ये सारस्वताध्वन्यनवरतरसह्लादिनीनिर्गताभिः ।
शृंगारोत्कृष्टतत्तद्रसमयविसरत्सारणीधोरणीभिः ।
व्यासे वैरिंचवामामृदुलपदतलन्यासधन्ये महीन्दो-।
रालोकालोकभूमीधरमाधिभुवनं कोऽध्वनीनो विनास्मात् ॥ ३४ ॥
श्रीशाहजीभूपतिवंशवर्णना रामस्य पूर्वैरिव भूसुरेन्द्रैः ॥
गंगाधरार्यैर्विहिता मखीन्द्रैः रामेण सेयं लिखिता तदाज्ञया ॥ १ ॥

## कोष्टक १

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| श्री | तः | च | रा | र | ण | रं | म्य |
| सु | षु | शा | ति | तु | ते | दा | द्रे |
| ग | न | स | स | म | सा | भ्रा | गी |
| वें | ग्न | वे | दे | श्वो | य | चं | प्र |
| प्र | चं | य | श्वो | दे | वे | ग्न | वें |
| गी | भ्रा | सा | म | स | स | न | ग |
| द्रे | दा | ते | तु | ति | शा | षु | सु |
| म्य | रं | ण | र | रा | च | तः | श्री |

*श्रीशारदाप्रसादेन चतुरंगीयसद्मसु।
सर्वेषु रामचंद्रेण भ्राम्यतेऽश्वोऽतिवेगतः ॥ २ ॥
श्रीर्वेप्रसगणतेचं सायतः सदामतुभ्रा ।
षुशादेवेप्रम्यद्रेश्वो नतिगीर सुचरारं ॥ ३ ॥

अत्र तृतीयस्य पद्यस्य प्रथम द्वितीय तृतीय चतुर्थ पादाः प्रथम द्वितीय तृतीय चतुर्थ पंक्तिषु चतुरंगीयासु यथाक्रमं लेख्याः । तथाष्टमपंक्तिमारभ्य पञ्चमान्तमपसव्येन लेख्याः एवं च चतुः षष्टि ग्रहा : परिपूर्णा भवन्ति । ततश्च श्रीशारदा प्रसादेनेति द्वितीयं पद्यं उच्चार्य प्रथमः श्रीवर्णो यत्र तत्राश्वः स्थापनीयः तदुत्तरं शारदादयो यत्र वर्णा वर्तते तत्र तत्र क्रमेणाश्वश्चालनीयः एवं

---

* हा श्लोक को. नं. १ मध्ये आहे. पण तो बुद्धिबलाच्या डावांतील घोड्याच्या गतीप्रमाणें म्हणजे कसा वाचावयाचा हें को. नं. २ वरून कळेल. मूळ प्रतींत जशा क्रमानें (श्लो. ३) तो लिहून अश्वगती प्रमाणें वाचावा म्हणून लिहिलें आहे त्या क्रमानें तो संपूर्ण वाचतां येत नाहीं. मुळांतहि त्या अक्षरक्रमाबद्दल संशय दर्शविला आहेच.

प्रकारेणे पद्यं आवर्तितं चेदंश्चश्चतुः षष्टि ग्रहेष्वीप गच्छति । यथा उपरिलिखितं + + नेन द्रष्टव्यं । इदं श्रीमल्लक्ष्मी + + सकोल्लपुरकरींगीडेंवकटभट्टसुरि + + + + पद्यम् ॥ ३ ॥

का. ६१

कोष्टक २

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३२ | ९ | २० | ३ | २४ | ११ | २६ |
| १६ | १९ | २ | २९ | १० | २७ | ४ | २३ |
| ३१ | ८ | १७ | १४ | २१ | ६ | २५ | १२ |
| १८ | १५ | ३० | ७ | २८ | १३ | २२ | ५ |
| ५ | २२ | १३ | २८ | ७ | ३० | १५ | १८ |
| १२ | २५ | ६ | २१ | १४ | १७ | ८ | ३१ |
| २३ | ४ | २७ | १० | २९ | २ | १९ | १६ |
| २६ | ११ | २४ | ३ | २० | ९ | ३२ | १ |

## २१ शिवकालीन ग्रहसाधन.

( रा. द. वि. आपटे. )

१. **मध्यम ग्रह.** जुन्या कुंडल्यांची सत्यता पाहतांना रवि चंद्र यांची स्थिती महिना व तिथी यांवरून तपासतां येते. परंतु गुरु, शनि व राहु यांचीं स्पष्टस्थानें निश्चित करणें तितकें सोपें नसतें; त्याकरितां पुष्कळ आंकडेमोडी करावी लागते. तथापि मध्यममानानें या ग्रहांचीं स्थानें ठरविणें कठिण नाहीं; व पुष्कळ वेळां मध्यमग्रहसाधनावरून आपणापुढें आलेली कुंडली काल्पनिक आहे किंवा काय हें ठरवितां येतें. याकरितां या तीन ग्रहांची अंशात्मक मध्यमस्थिती साधण्याचीं कोष्टकें देऊन ठेवतों.राहूची गती ऋण असतें ( वजा करावी लागते ) हें या कोष्टकावरून गणित करतांना लक्षांत ठेवलें पाहिजे.

| वर्षें | गुरु | शनि | राहु | वर्षें | गुरु | शनि | राहु |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३० | १२ | १९ | १० | ३०३ | १२२ | १९४ |
| २ | ६१ | २४ | ३९ | २० | २४७ | २४४ | २७ |
| ३ | ९१ | ३७ | ५८ | ३० | १९० | ७ | २२१ |
| ४ | १२१ | ४९ | ७७ | ४० | १३४ | १२९ | ५४ |
| ५ | १५२ | ६१ | ९७ | ५० | ७७ | २५१ | २४८ |
| ६ | १८२ | ७३ | ११६ | ६० | २१ | १३ | ८२ |
| ७ | २१२ | ८६ | १३६ | ७० | ३२४ | १३५ | २७५ |
| ८ | २४३ | ९८ | १५५ | ८० | २६८ | २५८ | १०९ |
| ९ | २७३ | ११० | १७४ | ९० | २११ | २० | ३०२ |
| शके १५०० | १७३ | २७४ | ३४४ | शके १६०० | ३२७ | ५६ | २०९ |

## २२. शहाजहानाचा राज्याभिषेककाल.

(रा. द. वि. आपटे.)

मुनीश्वरानें सिद्धांतसार्वभौम नांवाच्या ग्रंथांत आपल्या आश्रयदात्या शहाजहान बादशहाच्या राज्याभिषेक कालाचा उल्लेख केला आहे. (भारतीय-ज्योतिषशास्त्र पृ. २८७) त्यावरून हिजरी सन १०३७ जमादिलाखर ७= १५४९ माघ शु।। १०=४ फेब्रुवारी १६२८ सोमवार या दिवशीं सूर्योदयानंतर तीन घटकांनीं हा राज्याभिषेक झाला असें ठरतें. महमद शरीफ इनफीकृत मजालिसुस-सलातीन नांवाच्या तत्कालीन मुसलमानी ऐतिहासिक ग्रंथांत “ ७ जमादिलाखर, २५ बहामन सोमवार ” हीच तारीख शहाजहानाच्या राज्याभिषेकाची दिली आहे.[Elliot and Dowson Vol. VII p 137] अबदुल हमीद लाहोरी यानें बादशाहनाम्यांत १८ जमादिलाखर १०३७ ही तारीख दिली आहे ( E and D p. 6). पण ती विश्वसनीय दिसत नाहीं. कारण, महमदशरीफाचा ग्रंथ या राज्याभिषेकाच्या वर्षींच लिहिला गेला व अबदुल हमीदाचा त्यानंतर कित्येक वर्षांनीं लिहिलेला आहे. सार्वभौमसिद्धांताच्या पहिल्या अध्यायांतील एतद्विषयक श्लोक असे आहेतः—

श्रीसार्वभौम जहंगीरसुनंदनोऽयम्
श्रीशाहजाहधरणीपुरुहूत एताम्।
निष्कंटकां वसुमतीं प्रविधाय तस्याः
संरक्षणार्थमथ सिंहगतासनेऽस्मिन् ॥ ४ ॥

माणिक्यमुक्ताफलनीलवज्र
सुरत्नराजि(?)घटितेऽतिरम्ये
चामीकरीये शशिदर्शनादि
मासस्य जूमादिलसानिकस्य ॥ ५ ॥
मंगलप्रमित तारिखादिने
वासरे त्रिनयनोभ्दवस्य च ।
सप्तवान्हिवियदिन्दु ( १०३७ ) संमिते
पारसीकशशिमाससनाब्दैः ॥ ६ ॥
बहमन मासि शराक्षि तारिखायां
दिनकर मानवशाच्छुभे दिनेऽस्मिन् ।
दिनकरभूमिजमंडलैक्यकालात्
गणकानिवोदितयातरामनाड्याम् ॥ ७ ॥
मीने विलग्ने शशिभूमिपुत्रौ तृतीयगौ पंचमसंस्थराहुः ।
वक्री शनिः सप्तमभावसंस्थो बृहस्पतिःखे मकरे प्रकेतू ॥ ८ ॥
दैत्येज्यसूर्यौ व्ययगौ परंतु भावप्रमाणेन कविर्विलग्ने ।
एवं यदा तत्समयेऽतिभावो महाशयः सूर्यसमप्रतापः ॥ ९ ॥
कृपावशात् साधुजने कृपालुः संगीतचातुर्यकलानुरक्तः ।
दीर्घायुषस्तस्य सुराज्यकाले श्रीसार्वभौमो रचितो मयायम् ॥१०॥

यावरून त्यावेळची कुंडली ठरते ती अशीः—




येथे १५४९ माघ म्हणजे १५५० शकाचा प्रारंभ धरून या कुंडलीतील ग्रहस्थितीचा मेळ वर दिलेल्या कोष्टकावरून येणाऱ्या आंकड्यांशीं नीट बसतो तो असाः—

| शके | गुरु | शनि | राहु |
|---|---|---|---|
| १५०० | १७३ | २७४ | ३४४ |
| ५० | +७७ | +२५१ | −२४८ |
| १५५० | २५० | ५२५ | ९६ |
| | धनु | −३६० | कर्क |
| | | १६५ | |
| | | कन्या | |

# २३ अथ राजव्यवहारकोशः

## उपोद्घातः

॥ श्रीगणाधिपतये नमः ॥

मदोत्कटकटभ्रमद्भ्रमरवृंदपक्षानिला--
शनप्रमुदितस्फुरत्फणिफणामणिज्योतिषा ॥
घनीभवदनेकपाकृतिमुखे सखे चिंतय
प्रवालदलमंजुलं किमपि तुंदिलं तन्महः ॥ १ ॥
मुक्तादामरुचि क्वचित् क्वचिदपि स्वाराण्मणीभासुरम्
गंगाक्लिन्नजटं क्वचित्सुमरसाक्लिन्नालकं कुत्रचित् ॥
एकत्राजिनभृत्परत्रविमलक्षौमं क्वचिद्वासुकिम्
मंजीरं च पदे क्वचिद्दधदहं सेवेऽर्धयोषं महः ॥ २ ॥
भजेयं शर्वाणीचरणयुगुलं दैवतगणा
नमंतो यच्छोणच्छविसुचिरमालोक्य रुचिरम् ॥
नमद्भक्तस्वांतस्थितगुरुतमः पाटनपटु-
र्भवेद्बालादित्यः किमयमिति तर्कं विदधते ॥ ३ ॥
अधराहितमंजुवेणुनालं
घननीलं व्रजबालिकाविलोलम् ॥
अलकावलिभासमानभालं
कलये चेतसि नंदगोपबालम् ॥ ४ ॥
यस्योरसि रमा भाति चपलेव शरद्घने ॥
सुधांशु धवलाकारं वासुदेवं विनौमि तम् ॥ ५ ॥
चिंतामण्यवतार एव भगवान् यः पावनीरोधसि
ग्रामे चिंचवडाभिधे वितनुते वासं सतामग्रणीः ॥
लोकानुग्रहकारिणं गजमुखध्यानात्तसिध्यष्टकम्
श्रीनारायणदेवमार्यमनिशं सेवे तमिष्टार्थदम् ॥ ६ ॥
पृथ्वी कदाचिद्यवनाभिधानैस्तिष्यावतीर्णैः किल यातुधानैः ॥
संतापिता सर्वसुराग्रगण्यं लोकेशमागाच्छरणं शरण्यम् ॥ ७ ॥
वशिष्ठमुख्यैर्विहितात्मसख्यैर्ब्रह्मर्षिभिः सन्नुतपुण्यकीर्तिम् ॥
तपोनिकायैः प्रणतं सकायैर्वाग्देवताऽलंकृतदिव्यमूर्तिम् ॥ ८ ॥

कृतावलोकं त्रिदिवेशवृंदे किरीटसंस्पृष्टपदारविंदे ॥
चतुर्मुखं संसदि सत्यलोके पद्मासनं सा सहसालुलोके ॥ ९ ॥
कृतप्रणामाऽथ तदक्षिसंज्ञा ज्ञाताभ्यनुज्ञा निजखेदमुर्वी ॥
विज्ञापयामास न हि प्रभूणामाज्ञांविना कोऽपि वदंति विज्ञाः ॥ १० ॥
लोकेश लोके शयितां कथं वा नावैषि को वैष विभोरुदासः
दीनामनाथामिव बाधते मां हीनाशयोऽयं कलिदैत्यसंघः ॥ ११ ॥
भयादमीषां द्विजदेवतानामर्चाविधौ संप्रति नैव चर्चा ॥ ?
धर्मांकुरे दुष्कृतिभिर्विलूने स्वप्नेऽपि नाज्ञासिषि हंत यज्ञान् ॥ १२ ॥
अलं बहूक्त्या ननु दीनबन्धो त्वं मां तथाभ्युद्धर शोकसिंधो-॥
मग्ना यथा दैत्यभयादहं सा पुरोध्दृताब्धेः प्रथमेन पुंसा ॥ १३ ॥
इतीरितः संसदि पद्मजन्मा मृद्या समाश्वास्य गिरा धरित्रीम् ॥
साकं तया सर्वसुपर्वभिश्च द्रुतं मुरारेः स जगाम धाम ॥ १४ ॥
तत्रायमाखंडलरत्ननीलं प्रतप्तजांबूनदतुल्यचैलम् ॥
वक्षस्थलोद्भासितकौस्तुभालं कृतस्फुरन्मौक्तिकगुच्छमालम् ॥ १५ ॥
अंगप्रभाभिर्घनमेचकाभिः किर्मीरभूषामणिकांतिजालम् ॥
भुजोपगूढांकनिषण्णलक्ष्मी पीनस्तनाश्लिष्टभुजांतरालम् ॥ १६ ॥
घोरारवक्षोभितसागरांबुं वामेन हस्तांबुरुहेण कंबुम्
दधानमुच्छिन्नकठोरनक्रं सव्येतरेणापि करेण चक्रम् ॥ १७ ॥
अभीतिमुद्रांकितहस्तकंजं देवर्षिगीतामलकीर्तिपुंजम् ॥
शार्ङ्गादिभिः शस्त्रवरैः सदेहैरुपस्थितं दारितदैत्यदेहैः ॥ १८ ॥
सरत्नसिंहासनसन्निविष्टं पुरस्थितप्रांजलिताक्ष्यर्जुष्टम् ॥
चराचराणां जगतामधीशं नारायणं कोटिरविप्रकाशम् ॥ १९ ॥
दृष्ट्वा विरिंचिः प्रसृतेन दिक्षुस्तत्तेजसा व्याकुलितात्मचक्षुः ॥
निमील्य चोन्मील्य मुहुः स्वनाम संकीर्त्य साष्टांगमथो ननाम ॥ २० ॥
उत्तिष्ठ वत्सेति सुधातिशायि वचो मुकुंदस्य निशम्य वेधाः ॥
उत्थाय बाष्पाकुलितायताक्षस्तुष्टाव संतुष्टमना मुरारिम् ॥ २१ ॥
जगद्विधात्रे रजसावृताय सत्वेन तत्पालनतत्पराय ॥
संहारकायापि च तामसाय नमो नमस्ते त्रिगुणात्मकाय ॥ २२ ॥
यदंघ्रिनिष्यंदपयः पुनाति यन्नामसंकीर्तनवज्जगंति ॥
यदृग्द्वयीकालमिमं व्यनक्ति नक्तं दिनं चेति नमोऽस्तु तस्मै ॥ २३ ॥
भवानजन्मापि जगद्धिताय मत्स्यादिजन्मानि तनोति विष्णो ॥
अनंतरूपेण बिभर्षि भूमिं सहस्रशीर्षा पुरुषस्त्वमेव ॥ २४ ॥
त्वन्मायया मोहित एष लोकः कलत्रपुत्रादिषु बभ्रमीति ।
त्वदंघ्रिमेकं शरणं प्रपन्नस्तामाशु जंतुः प्रतरीतरीति ॥ २५ ॥

यस्मिन्ननंताः श्रुतयोपि मूकाः खंजानि योगींद्रमनांसि यत्र ॥
तं ते समस्तं महिमातिरेकं स्तोतुं प्रभुः स्यां कथमब्जनाभ ॥ २६ ॥
न यावनं दुर्नयजातमेषा सर्वंसहापि क्षमते विसोढुम् ॥
तद्भारमस्याः परिहर्तुमाशु म्लेच्छापहाराय हरे यतेथाः ॥ २७ ॥
उदीरितामात्मभुवा गिरं तामाकर्ण्य मंदस्मितमंजुलास्यः॥
विचिंत्य भूशर्मविधावुपायं वाचं गभीरां भगवानुवाच ॥ २८ ॥
कार्ये महत्यत्र नियोजयामश्चंद्रार्धचूडं वयमेव गत्वा ।
ध्रुवं विधाता हितमस्मदीयं देवो जगत्त्राणधुरंधरः सः ॥ २९ ॥
विना तमेनान् किल यातुधानान् संहर्तुमीष्टे विबुधेषु को वा ।
गाढं तमिस्रासु तमः समस्तं प्रभुः प्रहर्तुं रविरेव नान्यः ॥ ३० ॥
इतीरयित्वा हरिरब्धिकन्या हस्तावलंबी सहसोदतिष्ठत् ॥
कैलासशैलं च सुरैः समेतस्तार्क्ष्यं समारुह्य रयादयासीत् ॥ ३१ ॥
उत्फुल्लदृष्टि मुहुरुन्नतकंठनालं शैलं शिवस्य गगनंलिहमुच्चशृंगैः ।
ईक्षांबभूवुरमरा जवनैर्विमानैराकाशभागमवकाशविहीनयंतः ॥ ३२ ॥
यश्चंबदंबुददलेन शिरःस्थितेन सानुद्वयेन कुहचित् समये विभाति ॥
शृंगाग्रजाग्रदिव(?) कुलविदारणेन जंबालजालमसितं दधदीशवाहः॥३३॥
यत्रेशमौलिहरिणांककरद्रतासु चंद्रोपलालिषु मुहुः स्खलनेन खंजः ॥
विश्रम्य मंदमरविंदवने समीरः क्रीडाश्रमं हरति कुंजगतामरीणाम् ॥३४॥
यत्र वीक्ष्य रहसि प्रतिबिंबान्रत्नभित्तिषु धृतेतरशंकाः ॥
वारयंति सुरते सुरमुग्धाः कामिनो मुहुरपत्रपमाणाः ॥ ३५ ॥
यत्र कीचकरवश्रुतितानैः कुंजवेश्मसु हयास्यवितानैः ।
काकलीकृतपिकालिविगानैः स्तूयते मृडयशो मृदुगानैः ॥ ३६ ॥
बकुलैः कुसुमाकुलैः प्रियालैरपि यः कूजितकोकिलै रसालैः ॥
निबिडालिकुलैरनेकसालैः कृतमालैरपि भासते तमालैः ॥ ३७ ॥
हरिणाः करिणश्च यत्र मूका हरिभल्लूकवृकाश्च दंदशूकाः ॥
जहति श्रुतकिन्नरालिगीता निजवैरं वनजंतवोऽप्यभीताः ॥ ३८ ॥
यानादवारुह्य महीधरेशे तस्मिन् जनानंदकरप्रदेशे ।
आसेदुरीशस्य सभानिवेशं प्राप्याथ ते नंदिमुखान्निदेशम् ॥ ३९ ॥
जयशंकरपार्वतीशशंभो जगदीशेति शिवं मुहुः स्तुवंतः ।
प्रणिपत्य यथाधिकारमेते विभुनेत्रांचलसंज्ञया निषेदुः ॥ ४० ॥
स्वागतं तव हरे समास्यतामत्र पीठ इति विष्णुरादरात् ।
आसने पुरभिदोपवेशितः स प्रणम्य नुतिपूर्वमभ्यधात् ॥ ४१ ॥
वीक्षितुं यदहमंबुजासनस्पर्धया कलितकोलविग्रहः ॥
नैव दीर्णसुतलोप्यपारयं हंत तत्पदमपीक्ष्यतेऽधुना ॥ ४२ ॥

दग्धकाममपि वामलोचना सात्कृतात्मकतयाऽतिकामिनम् ॥
त्वां धृतास्थिमपि सर्वमंगलालंकृतं कथमवैमि तत्त्वतः ॥ ४३ ॥
देवदेव रिपवो वसुंधरां पीडयंति यवना भृशातुराम् ॥
तत्कुरुष्व जगतीसमीहितं म्लेच्छवर्गमधुना शृणीहि तम् ॥ ४४ ॥
आकर्ण्य बलिजिद्वाचं निर्वर्ण्य च महीरुजम् ॥
शरण्यः शंकरो वाणीमभाणीन्मधुसूदनम् ॥ ४५ ॥
निहता भवता हरे पुरा ये ननु पौलस्त्यमुखाः सुखाय भूमेः ॥
अहितान् पुनरेव जन्मभाजो जहि तान् प्रातनराकृतिस्त्वमेव ॥ ४६ ॥
येषां कलौ दुर्नयमेव सोढुं बुद्धावतारः कलितोमयाभूत् ॥
तेषां विनाशं स्फुटमेव कर्तुमसांप्रतं मे मनुषे यदीत्थम् ॥ ४७ ॥
उपायमप्यत्र वदामि भूमिमवाप्य मन्नामनिगूढभावः ॥
साहाय्यमंशेन पुनर्भवान्या लब्ध्वापि तानाशु सुखेन हन्याः ॥ ४८ ॥
अस्ति प्रशस्ताविभवो भुवि भानुवंशे विख्यातभोसलकुलामृतसिंधुचंद्रः ॥
श्रीशाहवर्मनृपतिर्विधिपार्वतीश श्रीशा हविः क्रतुषु नित्यमदंति यस्य॥४९॥
तस्य प्रिया भूपतिभर्तुरार्या रूपेण संतर्जितकामभार्या ॥
साध्वी जिजूर्नाम सुलक्षणास्ते पत्नी दिलीपस्य सुदक्षिणेव ॥ ५० ॥
त्वं शाहपृथ्वीपतिवीरपत्न्यामस्यां समासाद्य मनुष्यजन्म ॥
म्लेच्छापहत्या सुखमारचय्य भूमेः पुनः स्थापय वर्णधर्मान् ॥ ५१ ॥
पार्थंप्रति प्राक् तव धर्महानौ सृजेयमात्मानमिति प्रतिज्ञा ॥
जगत्सुगीतैव तदत्रकार्षीः कार्येऽधुना माधव मा विचारम् ॥ ५२ ॥
तथेति तां पुंगव केतुराज्ञां शौरिः प्रतिज्ञाय सहृष्टचेताः ॥
विसृज्य सर्वानमरान् गृहाय प्रणम्य चेशं स्वगृहानियाय ॥ ५३ ॥
अथ पांडुमुखेन सूचितं सा गृहिणी शाहनृपस्य धाम विष्णोः ॥
यवनांधतमिस्रहारि गर्भे शशिनं माधवनि दिशेव दध्रे ॥ ५४ ॥
समये सुदती शुभावहे सा जगतीमानसशर्मानिर्मिमाणम् ॥
सुषुवे तनयं शरीरभासा सहसा हंत जयंतमर्यमाणम् ॥ ५५ ॥
नेदुर्दुंदुभयो मुदाऽथ ननृतुर्देवांगनाश्चारणाः
पुष्पौघं ववृषुर्जगुश्च सुकलं विद्याधराः किन्नराः ॥
भास्वानप्यऽतिभासते स्म परितः शीताश्च वाता ववु-
स्तस्मिन् सर्वजनावनाथकमलानाथेऽवतीर्णे भुवि ॥ ५६ ॥
संस्कारकर्म निखिलं गुरुणा विधाय
बालः शिवेति कृतमंगलनामधेयः ॥
एधांबभूव जनतानयनोत्सवेन
साकं स सौष्ठवपुषा वपुषा शशीव ॥ ५७ ॥

किं भाविदिग्जयमसूसुचदात्मनोऽगै-
वार्ल्ये क्रमादपगते नृपशाहसूनुः ॥
यस्मात्कपाटमुरसा ककुदं वृषस्य
स्कन्धश्रिया भुजयुगेन युगं जिगाय ॥ ५८ ॥
नयनोत्पलमालयैव पूर्वं
वृतमप्याऽर्द्रमधूकमालिकाभिः ॥
तमनन्यजसुंदरं कुमारं
वरयामासुरथ क्षितीशकन्याः ॥ ५९ ॥
कृतोद्वाहः सोऽयं पितुरथ समादायशिरसा ॥
निदेशं भूदेवैः कृतविजयदस्वस्तिवचनः ॥
प्रतस्थे दिक्चक्रं यवनगणसंक्रांतमखिलम् ॥
विजेतुं निःसाणध्वनिबधिरिताशः सहबलैः ॥ ६० ॥
त्वंगत्तुंगतुरंगमक्षुरपुटक्षुण्णक्षितिप्रोच्छल-
द्धूलीधूसरतांबरांगणगणीभूतामराश्चर्यदम् ॥
खड्गत्रोटितकुंभिकुंभविगलन्मुक्तावकीर्णं रणम्
संदष्टौष्ठपुटैर्भटैः सह तदा तस्योदभूद्यावनैः ॥ ६१ ॥
तत्खड्गोत्कृत्तमत्तप्रमुखरिपुगणोद् वृत्तनृत्यत्कबंधै-
र्भल्लाग्रोदस्तमस्तालिभिरपि विकटाभिस्ततं खं समस्तम् ॥
दृष्ट्वोद्यत्केतुराहुप्रकरमिवभयाच्छंकमानस्य भानो-
रुद्दीर्णं बिंबमेव ध्रुवमरिनिकरद्वारभावं बभार ॥ ६२ ॥
दिल्लीशस्याथ पत्तिप्रकरमिषचलद्वीचिमालान् समंता-
दुग्रग्राहौघशंकावितरणनिपुणोद्दामवाहद्विपाद्यान् ।
सेनांभोधीननेकान्वलदीसभुजगोद्दंडदोर्दंडमन्था
निर्मथ्योदारकर्मा रणभुवि जगृहे वीरलक्ष्मीः स नैकाः ॥ ६३ ॥
शिवः स्वनामानुगुणं गुणज्ञः
प्रायो निवासं स विधातुकामः ॥
शैलावलिं दुर्गविधानदंभात्
कैलासकल्पामखिलामकार्षीत् ॥ ६४ ॥
क्रमेण जित्वा स दिशश्चतस्रो
राजा शिवच्छत्रपतिः प्रतापात् ॥
निःशेषयन् म्लेच्छगणं समस्तं
पाति स्म पृथ्वीं परिपूर्णकामः ॥ ६५ ॥
यः सिद्धिमावहति चिंचवडाधिवासी
हेरंबपादभजनेन महानुभावः ॥

नारायणाभिधसुधीतिलकादवाप
तस्मादनुग्रहमसौ शिवसार्वभौमः ॥ ६६ ॥
आसंस्तस्य कुलामात्यः शिववर्ममहीभृतः ॥
केचिन्मौद्गल्यावंशाब्धिपूर्णचंद्रा महीसुराः ॥ ६७ ॥
तेषु विख्यातकर्माऽभूत् त्रिमल्लाख्यो युधाग्रणीः
दधते हनुमन्नाम यद्वंश्या विक्रमार्जितम् ॥ ६८ ॥
तस्याऽसीत् तनयो धीमान्यज्वा नारायणाभिधः ॥
यद्यशोराजहंसस्य ब्रह्मांडं पंजरीयति ॥ ६९ ॥
ब्रह्मप्रमोदानुभवे विदेहः
शस्तो नु षट्कर्मविधिः सदेहः ॥
यो दानविस्मारितकामधेनुः—
स्वर्गद्रुचिंतामणिभानुसूनुः ॥ ७० ॥
यस्याध्वरे बुभुजिरे विधिनार्पितानि
हव्यान्यनादृतसुधा विबुधा रसेन ॥
आतेनुरस्वरसतामथ मंत्रपूत—
मास्वाद्य सोममपि सोमकलास्वजस्रम् ॥ ७१ ॥
प्रत्याम्नायः सुरर्षेः प्रतिनिधिरथवा किं दधीचेरयं किं
विश्वामित्रावतारः किमखिलविबुधाचार्यपर्याय एषः ॥
व्यासादेशः किमत्रेः प्रतिकृतिरथवा किं वसिष्ठागमोऽसा—
वित्थं यस्मिन्नुदाराद्भुततरचरिते तेनुरार्या वितर्कम् ॥ ७२ ॥
शुद्धाशयस्याऽभवदस्य सूनुः
सन्मार्गचारी विमलः कलावान् ॥
भूदेववर्यो रघुनाथनामा
पीयूषराशेरिव शीतधामा ॥ ७३ ॥
योऽसौ सुधीगीतगुणप्रकाशो
विश्राणनापूरितयाचकाशः।
यशःसुधाभिर्धवलीकृताशः
कथं न वर्ण्यः कृतवैरिनाशः ॥ ७४ ॥
प्रथित यशसि यस्मिन् संतताभीष्टदान—
व्रतकृतदृढदीक्षे मोदिताऽशेषलोकम् ॥
भुवममरगवी सा वीक्षितुं लज्जमाना
कलयति किमजस्रोत्तानसंचारमभ्रे ॥ ७५ ॥
नारायणात्मा यः साक्षात् कमलाकरसंग्रही ॥
कथं न स्यात् पदाक्रांतबलिप्रत्यार्थिमस्तकः ॥ ७६ ॥

नारायणांशभूतोपि शिवस्य हृदयंगमः ॥
रामोऽस्य सुकवीशस्य न समो भूतकाकविः ॥ ७७ ॥
क्रांत्वा मंत्रबलेन यस्य निखिलामाशामवार्चीं क्रमात् ॥
कर्नाटक्षितिपांश्च भागनगराधीशं च कृत्वा वशे ॥
आसेतुप्रसृतांश्च यावनगणान्नुच्छिद्य तत्रावनी-
पातारं व्यदधाद्यमेव तु शिवः सम्राडमात्यं निजम् ॥ ७८ ॥
तद्राज्यमस्मिन् विनिवेश्य राज-
गिरिं शिवच्छत्रपतौ प्रयाते ॥
शासत् क्षितिं धर्मपरः प्रदाय
वृत्तीः स भूदेवगणानपुष्णात् ॥ ७९ ॥
उत्सादितां चिरतरं यवनैः प्रतिष्ठाम्
शोणाचलेशितुरयं विधिवद्विधाय ॥
श्रीमुष्णवृद्धगिरिरुक्मसभाधिपानां
पूजोत्सवान् प्रथयातिस्म सहात्मकीर्त्या ॥ ८० ॥
कृते म्लेच्छोच्छेदे भुवि निरवशेषं रविकुला-
वतंसेनात्यर्थं यवनवचनैर्लुप्तसरणिम् ॥
नृपव्याहारार्थं स तु विबुधभाषां वितनितुं
नियुक्तोऽभूत् विद्वान्नृपवरशिवच्छत्रपतिना ॥ ८१ ॥
सोऽयं शिवच्छत्रपतेरनुज्ञां
मूर्धाभिषिक्तस्य निधाय मूर्ध्नि ॥
अमात्यवर्यो रघुनाथनामा
करोति राजव्यवहारकोशम् ॥ ८२ ॥
उद्देशाय गृहीताऽत्र म्लेच्छभाषा न दुष्यति ॥
नापेक्ष्यते किं रत्नानि खचितुं जतु जातुचित् ॥ ८३ ॥
विपश्चित्संमतस्यास्य किं स्यादशविडंबनैः ॥
रोचते किं क्रमेलाय मधुरं कदलीफलम् ॥ ८४ ॥

---

# अथ राजव्यवहार-कोशः *



## १ राजवर्गः

राजा ज्ञेयः पादशाहः स्वामी साहेब ईरितः ॥
अन्तःपुरं तु दरुनीत्याहुर्यवन-भाषया ॥ १ ॥
युवराजा परिज्ञेयो वलीयहद-नामकः ॥
शाहजादा राजपुत्रः प्रधानः पेशवा तथा ॥ २ ॥
अमात्यः स्यान् मजुमदारः सेनाध्यक्षो हुकूमतः ॥
युक्त्यभिज्ञो दबीर स्यात् सुर्नीसः सचिवस्तथा ॥ ३ ॥
वाकानवीसो वृत्तान्तलेखकः परिकीर्तितः ॥
बहुदेशेष्वधिकृतः कारमुल्की प्रकथ्यते ॥ ४ ॥
उपद्रष्टा तु नाजीरो दाता नाम सखी मतः ॥
सर्खेल इति तु प्रोक्तो ध्वज-वृंदाधिकारवान् ॥५ ॥
संदेशलेखश् चिट्णीसो दूतो हेजीब—नामक ॥
सौदागरस्तु धनिकः कार्बारी कार्यपुरुतः ॥ ६ ॥
सबनीसस्तथा सेनालेखेकः परिकीर्तितः ॥
मजालसी सभा ज्ञेया न्यायाधीशस्तु आदिलः ॥ ७ ॥
उपमन्त्री मुतालिको गुरुः पीर इतीरितः ॥
शिष्यो मुरीद-नामा स्याद् सिद्धो वलीति शब्दितः ॥ ८ ॥
अफ्ताब इति सूर्यः स्यान् महताबस्तु चन्द्रमाः ॥
आतष्नामा भवेदग्निर्वायुर्बाद इतीरितः ॥ ९ ॥

---

* 'अथ राजकोशो लिख्यते.' पाठभेदः

१ 'उच्यते' पाठान्तरम्.

२ 'सेनाकर्ता' पाठान्तरम्.

३ 'प्रवीणस्तु' पाठान्तरम्.

४ 'वाकेनीसोऽपि मन्त्री स्यान् न्यायाधीशोऽप्यदालतः। कार्मुल्की तु सुमन्त्रः स्यात्सभासत्स्यान्मजालसी'॥पा०

५ 'सर्खेल इति तु प्रोक्तः कार्यस्थानाधिकारिकः। पाठभेदः

६ 'व्यापारी' पाठभेदः

७ 'पदाति-लेखकः पाव-सबनीस इतीरितः' अधिकतरम्.

८ 'परकर्मी'

९ 'वाव'
'बाव'
'बात' इति पाठभेदाः

अलमाब इति प्रोक्तम् आस्मानाकाशमीरितम् ॥
मेघो बादल-नामा स्याद् बिजली विद्युदुच्यते ॥ १० ॥
दुर्दिनं स्याद् बदहवा मेहुं[११]ः पर्जन्य उच्यते ॥
ऋषिः पैगंबरो ज्ञेयो योगीशस्तु कलंदरः ॥ ११ ॥
योगी फकीर इत्युक्तः काजी पण्डितनामकः ॥
मुल्ला भट्टः परिज्ञेयो नुजूमी[१२] ज्योतिषी तथा ॥ १२ ॥
सर्पदारश्चोपदारो वेत्रदण्डधरौ क्रमात् ॥
स्यादन्तर्द्वारपालस्तु दरबंकी[१३] प्रकीर्तितः ॥ १३ ॥
दौलद्बंकी महाद्वारपाल इत्यभिधीयते ॥
सर्खवासो ऽप्यनुचराधिकारीति निगद्यते ॥ १४ ॥
हुजूरी स्यात्सन्निहितोऽनुचरस्तु महालदार् ॥
हर्कारा सर्वकारी स्याद् अफ्रादः परिचारकः ॥ १५ ॥
चाकरः सेवकः प्रोक्तो नफरः किङ्करः स्मृतः ॥
वेगल्वारो वेगचारो[१४] जासूदश्चारनायकः ॥ १६ ॥
प्रणिधिश् चोरजासूदः खोजा सौविद उच्यते ॥
वार्ताहरो खबर्दारः[१५] परिचर्या तु खिज्मतिः ॥ १७ ॥
[१६]गुप्तचारी तथा चोरहरकारः[१७] प्रकीर्तितः ॥
खासदारः[१८] पादरक्षाधर इत्यनुवर्ण्यते ॥ १८ ॥
कलाचीधारक[१९] उगाल्दानबर्दार ईरितः ॥
अफ्ताब्गिर्या त्वातपत्रधरश्छत्रधरस्तु यः—॥ १९ ॥
स छत्र्या, चामरधर श्चौरीबर्दार उच्यते ॥
तर्कश्कमानबर्दारो[२०] धनुर्धारी स तु स्मृतः ॥ २० ॥
पासबान[२१] स्त्वसौ राज्ञो द्वारपाल इतीरितः ॥
पताकाधर इत्येष विज्ञेयश्च निशानदार् ॥ २१ ॥

---

११. ' मेहुं ' साठेप्रत.
१२. ' नुजुमी', 'नुजुमो' साठे प्रत. पाठभेदः
१३. 'हरबंकी' 'हरबंकी' पा० भे०
१४. 'वेगचरो' पा० भे०
१५. 'बखैर्दारः' पा० भे०
१६. 'गुप्तकारी' पा० भे०
१७. 'चोरहर्कारा' पा० भे०
१८. 'खौसदारः', 'कौस(श)' पा. भे.
१९. 'कलाची-धारकः पीकदानी-बार्दार ईरितः' पा० भे०
२०. 'तर्कश् बार्दार इति यः स तु तूणधरः स्मृतः । ' पा० भे०
२१. 'धनुर्धरः कमान्दारो बंकी तु द्वारपालकः' पा० भे०

**मोर्तब्बदार**[२२] इति च राजमुद्राधरो[२३] भवेत् ॥
**माहीदारस्तु** मकरध्वजी दीपधरा स्तु ते — ॥ २२ ॥
**मशाले**[२४] स्यु,–**हिलाली** तु प्रदीपधर उच्यते ॥
दीपिका **दिवटी** प्रोक्ता **हिलालस्तु** प्रदीपकः ॥ २३ ॥
**गुलाम**[२५] **बंदा** द्वावेतौ दास-नाम्ना प्रकीर्तितौ ॥
**नेजदारः** कुन्तधरस् **तख्तं** सिंहासनं स्मृतम् ॥ २४ ॥
यस्तु **तख्तहवाल्दारः** स सिंहासनपालकः ॥
चतुष्पदी तु **चौरंगचौकी** त्वासन्दिका मता ॥ २५ ॥
**पलंगो** मञ्चकश् **छप्रपलंगो** मञ्चमण्डपः ॥
दोला नाम तु **झूला**[२६] स्यात् **तस्तं** गण्डूषपात्रकम् ॥ २६ ॥
**पीकदानी**-नामनी द्वे पतद्ग्रह-कलाचिके ॥
दीपशाखा तु **समयी फिल्सोजः** स्तम्भदीपकः ॥ २७ ॥
दीपश् **चिराग् सीखचिराग्** तु ज्ञेयो रोपण[२७]दीपकः ॥
स्यादन्तरालदीपस्तु **खंदील**[२८] इति नामतः ॥२८ ॥
**उत्सोजः** स्याद्धूपतरु[२९] **रुदानी** धूपपात्रकम् ॥
मैणकोशस्तु **मोम्दानी मोम्बत्ती** मैणवार्तिका ॥ २९ ॥
शिबिका **पालखी डोली** सुखासनमिति द्वयम्—॥
तुल्यं भाषाद्वये, दीपनडिं स्याद्**बाजवां**[३०]निति ॥ ३० ॥
विलासो **मौज** नामा स्याद्**गोशा** त्वन्तःपुरस्थितिः ॥
स्त्रीजातिस्तु **जनानी** स्यान् **मर्दः** पुरुष ईरितः ॥ ३१ ॥
हृष्टिप्रियस्तु **नुर्चश्मो सरायंदा**[३१] तु गायकः ॥
कलावंताभिधा वेश्या **मेहरी**[३२] वनिता मता ॥ ३२ ॥
नाट्यस्त्री **सुरता**[३३]ऽऽख्या स्वरूपं तु **शबी** स्मृतम् ॥
उष्णं तु **गरमं** शीतं **ठंडा** स्वेदस्तु **खोय्** स्मृतः ॥ ३३ ॥

---

२२. 'बार्दार' सा० प्र०
२३. 'ज्ञेयो ध्वजधरो बुधैः' पा. भे.
२४. 'दिवटे' पा. भे.
२५. 'गुलाम बंदा फर्जंदा दासचण्डप्रचण्डकाः'। पा. भे.
२६. 'दोला--नामा तु डोल्हारा' पा० भे०
२७. 'रोपणदीपकः' पा. भे.
२८. 'कंदील' पा० भे०
२९. 'दीपतरुः' पा. भे.
३०. 'वाजवानिति' पा. भे.
३१. 'गायकस्तु गुनीजनः' पा. भे.
३२. मूळ 'मह-रू'=चंद्रानना.
३३. 'वनिताभिख्या' पा. भे.

# २ ॥ कार्यस्थानवर्गः ॥



कार्यस्थानं तु **कार्खाना**-नामतः परिभाषितम् ॥
कोशागारं **खजाना** स्याज् **जामदारः** कोशरक्षकः ॥ ३४ ॥
यस्तस्य तु **हवाल्दारः** कोशपालः स ईरितः ॥
अधिकारी सैनिकानां **सर्हवाल्दार** नामकः ॥ ३५ ॥
निक्षेपस्तु **दफीना** स्याद् **दास्तानं** सचितम् स्मृतम् ॥
व्ययस्थानं **खर्चपोतं** तदीयस्तु **हवालदार्**—॥ ३६ ॥
व्ययाधिकारी, तस्यैव **जामदारो** व्ययकिङ्करः ॥
तत्रत्यो **निविसिंदा** यः स भवेद् व्ययलेखकः ॥ ३७ ॥
**पोतदारो** नाम बुधैर्ज्ञेयो द्रव्यपरीक्षकः ॥
द्रव्यं तु **नख्त**-संज्ञं स्याद् वराटो **होन** उच्यते ॥ ३८ ॥
तदर्धं तु **प्रतापः** स्याद् भाषयोरुभयोरपि ॥
वराहपादो **धरणश्** **चवल**स्त्वष्टमांशकः ॥ ३९ ॥
**दुवलः** षोडशांशः स्यान्**मोहरा** तु बुधैः स्मृतम्- ॥
सुवर्णनिष्कं, रजतनिष्कं स्याद् **रूपयाभिधम्** ॥४०॥
वाच्या रजतवर्ती त **लाहरी** **फलमः** पणः ॥
ताम्रद्रव्यं तु **खुर्दा** स्याद् **बस्तनं** बन्धनं स्मृतम् ॥ ४१ ॥
**कर्दनं** तु परिज्ञेयं त्रोटनं सूक्ष्मदृष्टिभिः ॥
रत्नशाला **जावहीरखाना** तस्य **हवालदार्**- ॥ ४२ ॥
रत्नाधिकारी, **जाम्दारो** रत्नभृत्यः प्रकीर्तितः ॥
भवेद्रत्नपरिक्षस्तु **जोहरी** भूषणं **नगः** ॥ ४३ ॥
**तुराऽ**वतंसः **पदकं** ज्ञेयं वै **कतकों**भिधम् ॥
ग्रैवेयकं **धुग्धुगी** स्यात् **कुडक्या** कर्णभूषणम् ॥ ४४ ॥
**सीस्फुलं** तु शिरःपुष्पं **भांग्लीलीं** तु ललामकम् ॥
तिलकः स्याद् **बिजवरा** नासापुष्पं तु **बेसरम्** ॥ ४५ ॥

---

१. ‘ सर्वाधिकारकः प्रोक्तः ’ पा. भे.
२. ‘ वराहो ’ पा. भे.
३. ‘कर्तन ’ पा. भे.
४. ‘ कृतकाभिधम् ’ पा. भे.
५. ‘ कर्णकुण्डलम् ’ पा. भे
६. ‘ भांग्तिला ’ पा. भे.
७. ‘नासापत्री तु बेसरं’ पा. भे.

नासामणिर्नथो मुक्ताफलं मोती फुलीति तु— ॥
नासापुष्पं, बाहुमणिर्बाजूबंदाभिधायकः ॥ ४६ ॥
अङ्गद तोर्लबंदः स्यान्मणिबन्धः तथा जवे ॥
पहुंच्या स्यान्मणिकटो मुद्रिकात्वंगठी मुदी ॥ ४७ ॥
शस्तमंगुष्ठकं हस्तकडें स्याद् हस्तकङ्कणम् ॥
कर्णिका स्यात् तानवडं वांकी कूर्परभूषणम् ॥ ४८ ॥
तथा मोहनमाला तु ज्ञेया प्रालम्बिका बुधैः ॥
कटिसूत्रं जर्कमरो घुंगुरः किङ्किणी स्मृता ॥ ४९ ॥
जंजेरिया शृङ्खलिका पैंजणें नूपुरं स्मृतम् ॥
पोल्हारा तु तुलाकोटिर् बाला हंसकनामकः ॥ ५० ॥
हिरा तु वज्रं माणिक्यं लालो नीलः समोद्वयोः ॥
पीचो गारुत्मकमणिः पुष्परागः समोद्वयोः ॥ ५१ ॥
स्याद् वैदूर्यं लसणिया गोमेदोऽप्युभयोः समः ॥
गुली नाम प्रवालः स्याद् बिलोरः स्फटिको भवेत् ॥ ५२ ॥
हुमा पक्षोद्भवा या तु कल्गी पक्षावतंसकः ॥
काचसारस्तु मीना स्यात् सफापः काच ईरितः ॥ ५३ ॥
जरखाना स्वर्णशाला सुवर्ण जर-नामकम् ॥
रौप्यं रूपा तथा ताम्रं तांबा पित्तलिकं पितल् ॥ ५४ ॥
स्यात् संगबसरि धातुविशेषः रसकाभिधः ॥
कांसे कांस्यं सिसे सीस कथिलं वंगमुच्यते ॥ ५५ ॥
कालायसं तु पोलादः स्याल्लोहमुभयोः समम् ॥
जाम्दारखाना तु वसनागारं तस्य हवालदार्- ॥ ५६ ॥
वस्त्राधिकारी, तत्रस्थो जाम्दारो वस्त्ररक्षकः ॥
निविसिंदा त्वस्य वस्त्रलेखकः परिकीर्तितः ॥ ५७ ॥
शिरोवेष्टनमित्येतन्मुंडासा कञ्चुकं झगा ॥
मंदीलं नाम विशेयमूष्णीषं स्वर्णरौप्यजम् ॥ ५८ ॥

---

८. 'तोलबंदी स्यात्' पा० भे०
९. 'ज्ञेया मोहनमाला तु बुधैर्ज्ञेया प्रलंबिका' पा० भे०
१०. 'घुंघुरः' पा० भे०
११. 'पाचिर' पा० भे०
१२. 'उमा मौक्तिकनामः स्यात्' पा० भे०
१३. 'जर्गखाना स्वर्णशाला स्वर्ण रजतनामकम्' पा० भे०
१४. 'पित्तालिकं पितल्' पा० भे०

कटिबन्धः **कमर्बंदो विजारूर्ध्वमुखी** भवेत् ॥
**चादरः** स्यात् प्रावरणी निचोलो **दुतु**-नामकः ॥ ५९ ॥
[15]कार्पासकञ्चुको नाम **डगला** पान्थकञ्चुकः— ॥
ज्ञेयः **फतू** नाम बुधैः **कुडती** कूर्परकञ्चुकः ॥ ६० ॥
**तिरमा** पार्वतीयोर्णा **पल्लोदारस्तु** पल्लवी ॥
**सलायी** तु शलाकी स्यान्न **म्याना** मध्यमईरितः ॥ ६१ ॥
**किनारा** तु प्रदेशः स्यात् **कस्बी** हेमगुणान्वितम् ॥
सौवर्णतान्तवं **नग्दी पटेदारस्तु** रेखितः ॥ ६२ ॥
**भर्जरी** स्वर्णभरितं गन्धाली **चर्मपोस्तनी** ॥
ऊर्णावस्त्रं तु **शालः** स्याच्छशोर्णे **तोष**-नामकम् ॥ ६३ ॥
**दुर्मा** तु राङ्कवं ज्ञेयं **सखलाद्** द्वीपकम्बलः ॥
इन्द्रगोपस्तु **मखमल् ताफ्ता** कौशेयनामकः ॥ ६४ ॥
**सोनेरीनिलखः** स्वर्णपटो रौप्यपटस्तथा — ॥
**रुपेरीनिलखश् छीटं** चित्रवस्त्रमुदाहृतम् ॥ ६५ ॥
यद् **बुटेदारनिलखः** स पुष्पितपटः स्मृतः ॥
पुष्पितोर्णा **चिकंदोजी शाला**ख्या परिभाषिता ॥ ६६ ॥
**खिसा** तु गोपकमुपावरणं **दुपटा** भवेत् ॥
**पासोडी** द्विपटी ज्ञेया **साडी** स्त्रीवसनं तथा[16] ॥ ६७ ॥
अन्तरीयं **तोहबंद**[17]**श्चोली** कूर्पासनामिका ॥
**पाटावूं**[18] चित्रकौशेयं दुकूलं[19] **मुकटा** भवेत् ॥ ६८ ॥
**गोशपेचः** कर्णबन्धः स्याद् **दुस्ता** स्याद्वस्त्रपञ्चकम् ॥
नीशारो नाम **फर्गोलो** वराशि**र्बुरुखा** तथा ॥ ६९ ॥
**तोसदानं** जविनकं **संदूकस्तु** समुद्गकः ॥
समूरुचर्म गदितं **सामरं** नाम कोविदैः ॥ ७० ॥
ज्ञेयं सुवासचर्मेति **बुलगारा**भिधानकम् ॥
**तिमाचा**ऽविकचर्म स्याद् वस्तुनिर्माणनाम तु— ॥ ७१ ॥
**रासकर्दन**मित्युक्तं **बेतणि** रूपिकाभिधा ॥

---

१५. 'कार्पासकंचुकं' पा० भे०
१६. 'स्मृतं' पा० भे०
१७. 'तहबंद' पा० भे०
१८. 'पटावूं' पा० भे०
१९. 'कौशयम्' पा० भे०

भवेदरत्निमानं तु गज्ञमजूँ[२०] तूल आयतम् ॥ ७२ ॥
भवेद्र्जस्तु-विस्तारो द्व्यरत्निर्गज ईरितः ॥
अरत्निः स्याद्र्धगजस् तसू द्व्यंगुलमुच्यते[२१] ॥ ७३ ॥
पूर्वभागः पृष्ठभागःकञ्चुकस्य क्रमात् स्मृतौ– ॥
पेशपुस्तौ, तथा जेहेपटी कण्ठपटी भवेत् ॥ ७४ ॥
अस्तनी नामबाहा स्याद् दुटा बाहुकमुच्यते ॥
बाहामुखं मोहलं स्यात् खपवा पार्श्वकं विदुः ॥ ७५ ॥
दौरोदावणमित्येतद्द्वयं परिकरः स्मृतः ॥
तखूता खण्डः कशा बन्धश् चीनः स्यात् कटिकूर्चनम ॥ ७६ ॥
प्रान्तस्यूतं तु नेफा स्यान्मोठा तु स्थूलमुच्यते ॥
सूक्ष्मं बारिक-नाम स्याच्छ्लक्ष्णं नरम-नामकम् ॥ ७७ ॥
पलंगपोश इति यः स प्रच्छदपटः स्मृतः ॥
कौशेयजातं नर्माना वस्त्रजातं तु कापडम् ॥ ७८ ॥
उर्णाजातं तु पश्मी स्यात् सोख्ता नाम पटच्चरम् ॥
आच्छादकस्तु सर्पोशो वसला चेलखण्डकः ॥ ७९ ॥

---

# ३ ॥ भोग्यवर्गः ॥

अथ पाकालयं मुद्बख्खानेति[१] परिभाषितम् ॥
मुद्बखी पाककारः स्याच् चासणीकार नाम तु–॥ ८० ॥
रुचिग्राहिः[२], पाकपरीकर्मी तु स्याद् दवादवी ॥
रसोयी[३] स्यात्तु सिद्धान्नं कंदोरी त्वन्नमुच्यते ॥ ८१ ॥
आब्दार्खाना जलस्थानं सक्का तु जलदः स्मृतः ॥
पशुभस्त्रा पखालः स्यान् मशकः स्कन्धभस्त्रिका[४] ॥ ८२ ॥
डोलो जलहरश्चर्मभृङ्गार श्छागलः स्मृतः ॥
अस्तावा नाम भृङ्गारी कुजा कर्करिका मता ॥ ८३ ॥

---

२०. 'गुम् गज्ञु तूल आयातिः', 'गुंजजुंतूल आयातिः' पा॰ भे.
२१. 'द्व्यंगुल उच्यते' पा॰ भे॰
१. 'खाना इत्येव भाषितम्' पा. भे.
२. 'रुचिकारः' पा. भे॰
३. 'रसोयी स्याद्रसवती'. पा॰ भे॰
४. 'मेषभस्त्रिका' पा॰ भे॰

औंडे नाम तुला प्रोक्ता **कूजादान** मुदपञ्जरः ॥
**आडेकरी** तुलावाहः **पखाली** जलवाहकः ॥ ८४ ॥
**हौदं**[6] नाम जलाधाने दीर्घिका **बाव**-नामिका ॥
**पाणशाला**[7] निपानं स्यात् कूपो नाम भवेत् **कुवा** ॥ ८५ ॥

पानकादिरसस्थानं **शर्बत्खाना** प्रकीर्तितः ॥
फलजातं तु **मेवा** स्यात् **खुषतरं** खाद्यवस्तुनि ॥ ८६ ॥
**काह्वा** नाम विश्रामकषायः परिभाषितः ॥
**अफीम्** नामा हि फेनः स्यादवलेहं[9] तु **मोरबः** ॥ ८७ ॥
मदद्रव्यं तु **कैफः** स्यात् सुधा **शरबतादिकम्**[10] ॥
**प्याला** तु चषको ज्ञेयः **शीसा** नाम भवेत् कुपी ॥ ८८ ॥

धूमयन्त्रं **गुडगुडी तमाखू** धूमपत्रकम् ॥
अथोपस्करपात्रं[11] तु **तबकं** परिकीर्तितम् ॥ ८९ ॥
**खुषबोय्** इति तु प्राहुः सुगन्धिद्रव्य-नामकम् ॥
कस्तूरी **मुष्क**मित्युक्ता मात्सिकं **स्वंबरं** विदुः ॥ ९० ॥
**चोवा** त्वगरुसारः **स्यादगजा** यक्षकर्दमः ॥
**जवादी** नाम मार्जारमद इत्यामनन्ति हि ॥ ९१ ॥

**गुलालः** स्याद्रक्तचूर्णम् **अबीरं** गन्धचूर्णकम् ॥
**अत्तरः** पुष्पसारः स्याद्वस्तुसारोऽर्क नामकः ॥ ९२ ॥
मकरन्दो **गुलाबः** स्यात् केसर **जाफरा** भवेत् ॥
मल्लीतैलं **मोगरेलं चंमली**[12] जातितैलकम् ॥ ९३ ॥
तथा चम्पकतैलं तु **चांपेल**मितिकीर्तितम् ॥
ऊदो धूपो लिप्तपात्रं[13] **मर्तबान**मितीरितम् ॥ ९४ ॥

---

५. 'मीजान् इति तुला प्रोक्ता मुर्दा मृतकलेवरम्' पा० भे०

६. 'हौदनाम तटाकः स्याद्दीर्घिका बाविनामिका' पा० भे०

७. 'हौदखाना' पा० भे०

८. 'सुधास्थानं तु शरबत्खाना तस्य हवालदार् । सुधाकारः परिज्ञेयो मेवा स्यात् खाद्यवस्तुनि ॥ फलजातं तु तत्रैव भंगनाम कलिंजकम् ॥' पा० भे०

९. 'अवलेह्यम्' पा० भे०

१०. 'शरबताभिधा' पा० भे०

११. 'अथोपहारपात्रं तु' पा० भे०

१२. 'चंबेली' पा० भे०

१३. 'ऊदो धूपः काचपात्रम्.' पा० भे०

ण्यांत अर्थ नाहीं. तत्कालीन पंचांग आणि आजमितीला केलेलें गणित यांत अंतर पडतें हें दर्शविण्याकरितांच पुढील उल्लेख करीत आहे. श्रीयुत खरे व रेळे यांनीं चित्रमयजगतमधील आपल्या लेखांत शिवाजीच्या मृत्युकाळचे ग्रह दिले आहेत. सुदैवानें येथील इतिहास–संशोधक–मंडळास एक अस्सल जन्मपत्रिका कसब्याच्या गणपतीचे पुजारी ठकार यांच्या घरांतून मिळाली आहे. ठकार यांच्या घराण्यांतील या मुलाचा जन्म शके १६०२ रौद्र संवत्सरीं चैत्र कृ. ३ रोज बुधवार या तिथीचा म्हणजे शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर बराबर चारच दिवसांनीं झालेला आहे ( वद्य प्रतिपदेची वृद्धि असल्यानें चार दिवस झाले ). या जन्मपत्रिकेंत त्या दिवसाचे स्पष्टग्रह दिले असून प्रत्येक ग्रहाची रोजची गतिहि दिली आहे. अर्थातच चै. कृ. ३ या तिथीच्या स्पष्टग्रहांतून चार दिवसांची गति वजा केल्यास चैत्र शु. १५ च्या दिवशींचे स्पष्टग्रह निघतात. अशा रीतीने काढलेले स्पष्टग्रह आणि रेळे व खरे यांनीं दिलेले ग्रह यांत कोणत्या ग्रहांत किती अंतर पडतें तें पुढील तुलनात्मक कोष्टकावरून दिसून येईल.

## शके १६०२ चैत्र. शु. १५ या दिवशींचे स्पष्टग्रह.

| रेळे व खरे यांनीं दिलेले | ठकार यांच्या पत्रिकेवरून काढलेले. |
|---|---|
| रवि ०–५–४ | रवि ०–५–४५ |
| चंद्र ५–२४–९ | चंद्र ५–२४–९ |
| मंगळ ११–२३–३६ | मंगळ ११–२३–१९ |
| बुध १–२–२६ | बुध ०–१८–४२ |
| गुरु ०–२९–२४ | गुरु ०–२९–२५ |
| शुक्र १—६—३० | शुक्र १०—२७—४८ |
| शनि २–१२–० | शनि २—१७—३६ |
| राहु ५–१९–० | राहु ५—१९—२७ |

वरील कोष्टकांत गुरु, चंद्र, मंगळ, राहु व रवि यांत अंतर बहुतेक नाहींच म्हटलें तरी चालेल. पण शनि, शुक्र व बुध यांत फारच मोठें अंतर पडलें आहे. यावरून तीनशें वर्षांपूर्वींचे ग्रह वर्तवितांना 'पिले' यांची सारणी जपूनच वापरावी लागते असें दिसतें. अर्थातच रेळे व खरे यांनीं दिलेलें शिवाजीच्या जन्मकाळचे स्पष्टग्रहहि बिनचूक मानतां येत नाहींत.

शिवाजीच्या निधनकाळीं मारकेश शनि जन्मकालीन मंगळावर, रवि जायास्थानचा कारकग्रह जो शुक्र त्याजवर, मंगळ व केतु जन्मस्थ चंद्राशीं प्रतियोगकारक, रवि, बुध, गुरु हे सगळे राशि कुंडलीच्या अष्टमांत, अशी ग्रहस्थिति

आली आहे. या ग्रहस्थितीवरून, त्याचप्रमाणें राज्याभिषेककालीन ग्रहस्थितीवरून जन्मकालीन मंगळ, शुक्र, बुध, शनि, चंद्र इत्यादि ग्रहांचे अंश ठरविण्यास एक प्रकारचें साधन मिळतें; त्याचा उपयोग करून जन्मकालीन ग्रहांत दुरुस्ती करून ते पुढें दिल्याप्रमाणें निश्चित करण्यांत येत आहेत.

| ग्रह | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि | राहु | लग्न |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राशि | १० | ५ | २ | ११ | १० | ० | ६ | १ | ८ |
| अंश | २२ | २९ | १३ | ६ | ६ | ५ | १३ | २९ | १६ |
| कला | ५० | ४८ | ५ | ४४ | ५० | ४५ | ३० | ५१ | ३० |
| नवमांश | मेष | कन्या | मकर | कन्या | धनु | वृषभ | कुंभ | कन्या | सिंह |

या लग्नांशास व ग्रहांच्या स्थितीस अनुसरून जन्मलग्न कुंडली, राशि कुंडली व नवमांश कुंडली पुढीलप्रमाणें बसतात.

जमलग्न कुंडली




नवमांश कुंडली




जन्मराशि कुंडली




या कुंडल्यांचें जितकें सूक्ष्म निरीक्षण करावें तितक्या त्या शिवाजी महाराजांच्या चरित्रास बरोबर पटल्याची खात्री पटते. कुंडलींत उच्चीचे ग्रह किती आहेत एवढी एकच गोष्ट पाहून अनुमान करण्याची ज्यांना संवय लागली आहे त्यांचें या कुंडलीनें सकृद्दर्शनीं समाधान होणार नाहीं. आणि यामुळेंच शके १५४९त वैशाखांत जन्मलेल्या शिवाजीच्या एकाद्या अल्पवयी भावाच्या कुंड-

लींतले रवि, चंद्र, शुक्र हे तीन ग्रह उच्चीचे असलेले पाहून इतर ग्रहांची सापेक्ष स्थिति न पाहतां ती कुंडली शिवाजीच्या नांवावर कोणातरी ज्योतिष्यानें प्रथम दडपून दिली असावी आणि इतर ज्योतिष्यांचें तेवढ्यानें समाधान होण्याजोगें नसल्यानें एकाद्या धीट ज्योतिष्यानें मूळ कुंडलींतला गुरु उचलून कर्क राशींत ठेवून आणखी एका उच्च ग्रहाची भर त्यांत घातली असावी. आणि अशा रीतीनें हल्लींची शिवाजीच्या नांवावर प्रचलित असलेली कुंडली बनली असावी. शिवाजीची चुकीची जन्मतिथी प्रचलित होण्याला हें एक कारण संभवनीय आहे.

तें कसेंहि असो; जेधे शकावली व शिवभारत यांवरून जी तिथि निश्चित होते त्या दिवशींचीं सर्व लग्नें तपासून त्यांतून जे लग्न वर दिलें आहे त्याचा शिवाजीच्या चरित्राशीं उत्तम मेळ बसतो एवढेंच या लेखांत दाखवावयाचें आहे. त्यांत प्रथम तूळ व मकर हीं लग्नें अग्राह्य कां ते सांगून नंतर धनुलग्नानें साधणाऱ्या योगांचें विवेचन करूं.

तूळ लग्न मानल्यास राजभुवनाचा अधिपति चंद्र व्ययांत जातो, जन्मस्थ शनि, अष्टमांत राहु, द्वितीय (मारक) स्थानांत केतु, लग्नेश शुक्रहि मारकस्थानांत, भाग्याधिपति शत्रुस्थानांत असे ग्रह बसतात व ही ग्रहस्थिति कोणत्याहि प्रकारें वैभवाची द्योतक नाहीं. शिवाय मुख्य गोष्ट ही कीं, राज्याभिषेक वृषभ लग्नावर झाला असून ते लग्न या कुंडलींत उपचयस्थानीं न येतां अष्टम स्थानीं येतें. आणि जन्मकुंडलींतलें अष्टमस्थानचें लग्न राज्याभिषेकाला घेतलें गेले असेल असें म्हणवत नाहीं.

मकर लग्न ग्रहण केल्यास धनुलग्नापेक्षां राजयोग चांगला साधतो व मुख्यतः याच मुद्यावर पंडित होसरित्ती, अनंतशास्त्री थत्ते, नारायणशास्त्री पुरंदरे वगैरेनीं मकर लग्न दिले आहे. परंतु शिवाजीच्या एकंदर पराक्रमांत राज्याभिषेक ही एक केवळ आनुषंगिक गोष्ट आहे. अतुल पराक्रम व स्वराज्य संपादन या गोष्टीच शिवाजीच्या चरित्रांत मुख्य आहेत, हें लक्षांत घेतां मकर लग्नापेक्षां धनु लग्नच पसंत करावें लागतें.

मकर लग्नावर जन्मलेला इसम महत्वाकांक्षी व बंडखोर असत नाहीं; तो अल्पसंतुष्ट असतो. मेष, सिंह व धनु या तीन राशीच बंडखोरपणा आणि दुर्दमनीय महत्वाकांक्षा उत्पन्न करितात. पिळदार शरीर, आजानुबाहुत्व व गरुडासारखें नाक हीं शारीरिक लक्षणेंहि धनुराशीला जुळतात; मकराला जुळत नाहींत. सिंहराशी पराक्रमाची व अधिकाराची दर्शक आहे. ती मकर लग्न घेतल्यास अष्टमांत बसतें; यामुळें मकर लग्नावर जन्मलेला इसम स्वपराक्रमानें राजा बनलेला क्वचितच आढळून येईल. शिवाजीचे बरेचसे पराक्रम गुरु, रवि, चंद्र इत्यादि ग्रह सिंह राशींत

असतांना घडलेले आहेत. मकर लग्न धरिल्यास अफजलखानाच्या वधाच्या वेळचे ग्रह शिवाजीला अपयश व मृत्यु देणारे असे ठरतील. शिवाय चतुर्थाधिपति षष्ठस्थानीं गेल्यानें मातृवैर योग होतो; लग्नाधिपति शनि व सुखाधिपति मंगळ हे परस्परांचे शत्रु असल्यानें तिकडूनहि मातृवैर योग होतो. सुखाधिपति मंगळ क्रूर ग्रह असून तो शत्रुस्थानांत गेल्याने सुखाचा नाश दर्शवितो. पराक्रम स्थानांत एकहि पराक्रमी ग्रह नसून पराक्रमकारक ग्रहांची शुभ दृष्टीहि येत नाहीं. हर्शल हा अधिकारद्योतक ग्रह मृत्यु स्थानांत जातो. मकर लग्न व तूळ लग्नीं चंद्र ही स्थिति, किल्ल्यावर जन्म दर्शवीत नसून समुद्राच्या किंवा महान् जलाशयाच्या समीप जन्म दर्शाविते. 'शुक्रर्क्षे चन्द्रमन्दौ शस्त्रतो मृत्युः' हा अनिष्ट योगहि दर्शविला जातो व तो घडलेला नाहीं. पचमस्थानीं समराशी असून त्या स्थानावर एकाहि पुरुषकारक ग्रहाची दृष्टि नसल्यानें पुत्रसंतति दर्शविली जात नाहीं. हे व असेच अनेक दोष या मकर लग्नीं आढळून येत असल्यामुळें मकर जन्मलग्नहि अग्राह्य ठरतें. आतां धनु लग्नांतील ग्रहसंस्था व तिचा प्रभाव याचा विचार करूं.

धनुलग्नांत रवीचा नवमांश घेतल्यानें शिवाजीचा पराक्रम, प्रस्थापित सत्तेविरुद्ध बंडखोरी आणि राज्यस्थापना या सर्व गोष्टी सकृद्दर्शनींच व्यक्त होतात. कारण, लग्न स्वामी व नवमांश स्वामी हे परस्परांचे मित्र व स्वतः पराक्रमी असून पराक्रमस्थानांत नवमांश स्वामी (भाग्येश) व दशमेश यांची युति आहे व रवि हा भाग्य स्थानाचा अधिपति असून बुध शुभ ग्रहासह भाग्य स्थानाला पूर्ण दृष्टीनें पाहतो. तृतीयस्थान हें उपचयस्थान असल्याने रवि, बुधासारखे मूळचे बलवान ग्रह या स्थानांत बलवत्तर झाले असून त्यांची जन्म लग्नावर त्रिरेकादश म्हणजे उत्तम शुभ दृष्टि आहे.

गुरु हा एकच ग्रह लग्नाधिपति व मातृस्थानाधिपति असल्याने शिवाजी महाराज नुसते मातृभक्तच नसून सर्व कार्यांत उभयतांचा अगदीं एक विचार जुळत असे. मातापुत्रांचा इतका एकात्मभाव धनुलग्नीं किंवा मिथुन लग्नीं दिसून येतो. इतर कोणत्याहि लग्नीं हा योग असा जमून येत नाहीं. असो.

धनुलग्नाचा उत्तरार्ध रात्रीं बलवान आहे आणि पूर्ण बली असा चंद्र दशमस्थानीं आहे. सर्व केंद्रस्थानांत दशमस्थान प्रबल असल्यानें त्या केंद्रांत असलेला एकच ग्रह इतर सर्व दोष नाहींसे करून टाकतो. पण या कुंडलींत दशमस्थानच्या राशीचा अधिपति बुध हा कन्या नवांशांत उच्चीचा असून भाग्याधिपति रवीशीं त्याची युति झाली आहे. या योगाने ही कुंडली विशेष बलवान झाली आहे.

शिव-भारतांत शिवाजीच्या जन्मकालीं जे शुभ योग घडल्याचें वर्णन आहे त्यांत—

" अनुकूलतरैस्तुंगसंश्रयैः पंचभिर्ग्रहैः ।"

असें वाक्य आहे. यांतील वर्णन कविकल्पनेस अनुसरून अतिशयोक्तीचें असावें असा माझा प्रथम समज झाला होता. परंतु शिवाजीच्या जन्मकालीन ग्रहांचें जसजसें सूक्ष्म निरीक्षण करूं लागलों तसतसें हें वर्णन वस्तुस्थितिनिदर्शक आहे व त्यांत कवीच्या पदरचें असें कांहींच नाहीं असें आढळून आलें. या वर्णनांत 'पांच ग्रह तुंगसंश्रयामुळें विशेष अनुकूल झाले होते' असें म्हटलें आहे. संश्रय म्हणजे आश्रयस्थान. उच्च आश्रयस्थान मिळाल्यामुळें पांच ग्रह नेहमींपेक्षां अधिक लाभदायक झाले असें सांगण्याचा कवीचा उद्देश उघड आहे. पांच ग्रह उच्चीचे नव्हते; पण ते अशा आश्रयस्थानांत बसले होते कीं, त्यामुळें ते विशेष प्रबल झाले होते असें कवी म्हणतो. अर्थातच शिवाजीच्या कुंडलींतील ग्रहांचीं आश्रयस्थानें पाहिल्यास कवीच्या वर्णनाचें प्रत्यंतर येतें.

आश्रयस्थान दोन प्रकारचें. ग्रह ज्या नवमांशांत असेल तो नवमांश हें एक आश्रयस्थान आणि राशि कुंडलींत अगर लग्नकुंडलींत ग्रह ज्या भावांत असेल तें दुसरें आश्रयस्थान. अशा दोन्ही दृष्टींनीं पांच ग्रह बलवान कसे येतात तें पहा. नवांशांचा विचार केल्यास रवि मंगळ व बुध हे तीन स्वोच्च नवांशांत आहेत; गुरु व शुक्र स्वनवांशांत आहेत आणि चंद्र मित्रक्षेत्रीं वर्गोत्तमीं आहे. शनि व राहु हे स्वतः स्वोच्चस्थ आहेत. अशा रीतीनें पांच ग्रह उच्चीचे असून तीन ग्रह स्वगृहींचे अथवा मित्रगृहीचे आहेत. आतां आश्रयस्थानाचा दुसरा प्रकार पाहूं. केंद्र, कोन व उपचय हीं स्थानें ग्रहांचें बल वाढवितात व त्या योगानें अनुकूल ग्रहास अनुकूलतर करितात. शिवाजीच्या धनु लग्नाच्या कुंडलींत शुक्र, चंद्र व शनि हे तीन ग्रह केंद्रीं आहेत; गुरु धन स्थानांत म्हणजे अत्यंत शुभस्थानीं आहे. आणि रवि, मंगळ, राहु व बुध हे उपचय स्थानांत आहेत. अशा रीतीनें आठ ग्रह अनुकूलतर असे दिसून येतात. यांतला राहू हा सप्तग्रहाच्या बाहेरचा म्हणून सोडून दिला आणि बुध हा पापग्रह नसल्यानें तो उपचय स्थानीं प्रबलतर होऊं शकत नाहीं म्हणून तोहि गाळला तरी बाकीचे पांच ग्रह केंद्रीं व उपचय स्थानीं असल्यानें 'अनुकूलतर' झालेले दिसून येतात. त्यांत शुक्र हा दिग्बली आहे. अर्थातच शिवभारतकारानें केलेलें वर्णन अतिशयोक्तीचें नसून अल्पोक्तीचेंच ठरतें. कारण शिवाजीच्या कुंडलींत सर्वच ग्रह असे कांहीं घड्याळाच्या यंत्रासारखे बसले आहेत कीं ते सर्व अनुकूल होऊन नुसता राज्याधिकारच नव्हे तर हरएक प्रकारचा सुखोपभोग देण्याला समर्थ झाले आहेत.

आपल्या ज्योतिषांत ग्रहांच्या सापेक्ष दृष्टींचा विचार विशेष केलेला आढळत नाहीं. आणि त्यामुळेंच एकाद्याच्या कुंडलींत उच्चीचे, केंद्रांत आणि उदितार्धांत विशेष ग्रह दिसले नाहींत कीं ती कुंडली त्याज्य मानली जाते !

परंतु ग्रहांच्या उच्चत्वापेक्षां त्यांच्या परस्परानुकूल दृष्टिला विशेष महत्व आहे. शिवाजीच्या लग्न कुंडलींत दशमस्थानांतून गुरु, मंगळ व शनि यांचा त्रिकोण योग फारच बलवान असा साधला आहे. यांत विशेष हा कीं हे ग्रह अनुक्रमें लग्नेश, पंचमेश व धनेश आहेत. त्रिकोणयोग करणारे ग्रह शत्रु असले तरी तात्कालिक मित्र होऊन शुभ फल देतात. राशि कुंडलींतहि हाच त्रिकोन योग साधला असून त्यांत रवि व नेपच्यून या दोन ग्रहांची आणखी भर पडली आहे.

" वित्तपे केंद्रे स्वोच्चे शुभदृष्टे सिंहासनाप्तिः " या वचनाप्रमाणें धन-स्थानचा अधिपति शनि हा उच्च असून राजभुवनांत आहे, आणि तो, चंद्र या शुभग्रहानें युत असून शुक्र शुभग्रहानें पूर्णदृष्ट आहे. हा राजयोग अत्यंत बलवान असा आहे. आणि धनस्थानांत असलेला लग्नाधिपति गुरु जेव्हां दशमस्थानांत-ल्या शनिच्या जागीं येतो त्यावेळीं शिवाजी महाराज सिंहासनारूढ होतात ही या कुंडलीच्या बिनचूकपणाची साक्ष होय.

' राजानौ रविशीतगौ ' असें शास्त्रवचन आहे. या दोन राजकारक ग्रहां-तला रवि हा उच्चनवमांशांत पराक्रम स्थानांत आणि पूर्णबली असा चंद्र मित्र-गृहीं वर्गोत्तमांत आहे. अर्थातच रवि व चंद्र हे दोनहि राजयोगकारक ग्रह बलिष्ठ आहेत. राशिकुंडलींत मंगळ हा राजभुवनांत आहे, आणि रवि त्या राजभु-वनांत आला असतां ज्येष्ठ मासांत राज्याभिषेक झाला, यावरून जन्मराशि कन्या हीच बरोबर ठरते. धनु लग्नाला बुध हा ग्रहहि राजयोगकारक आहे व तो नवमांश कुंडलींत उच्चीचा लग्नकुंडलींत असून भाग्याधिपतीबरोबर उपचय-स्थानीं असल्यानें वलवत्तर झाला आहे. शुक्र हा अश्विनी नक्षत्रांत असल्यास राजयोग करितो. गुरु व शुक्र हे परस्पर शत्रु असले तरी त्रिरेकादश योगामुळें ते येथें परस्परांचे मित्र झाले आहेत.

राशिकुंडलींत अधियोगहि उत्तम साधतो, गुरु, बुध व शुक्र हे तीनहि शुभग्रह चंद्रापासून अनुक्रमें ६।७ व ८ या स्थानीं आले आहेत. आणि हा अधियोग राज्यप्राप्तिदायक आहे. अधियोगांतले ग्रह रविपासून दूर असावेत याचा अर्थ ते अस्तंगत नसावेत एवढाच आहे. नाहींतर बुध व शुक्र हे ग्रह रवी पासून अत्यंत दूर कसे जाणार !

वृषभराशींतला उच्चीचा राहू षष्ठस्थानीं असल्यास तो राजसन्मान देतो. हा योग धनुलग्नांतच साधतो, मकर लग्नांत साधत नाहीं.

धनुलग्नाचा अधिपति उच्चीचा नाहीं व तो केंद्रीं अगर कोणी नाहीं, सबब हें लग्न बलहीन आहे असा या लग्नावर मकर लग्नवाल्यांचा आक्षेप आहे, पण तोहि चुकीचा आहे. लग्नाधिप गुरु हा शुभ ग्रह स्वनवांशांत बलवान असून धन स्थानीं असल्यानें या लग्नीं जन्मणारा इसम हजारों लोकांचा पालक होतो.

कुंभराशींतला गुरु कर्कराशींतल्याप्रमाणें बलवान असतो असें वराहमिहिराचें वचन आहे. धनुराशि रात्रीं बलवान असून ती लग्नांत विशेष बलवान असते. पण याशिवाय या लग्नाला षड्वर्गबल फारच उत्तम साधलें आहे. कर्केचा होरा असून कर्केचा अधिपति राजभुवनांत वर्गोत्तमीं आहे. द्रेष्काण स्वामी मंगळ उच्च नवांशांत असून तो शत्रुस्थानात असल्यानें शत्रूंचा नाश करितो. लग्नाचा नवमांश स्वामी रवी उच्चनवमांशांत पराक्रमस्थानांत आहे. 'सिंह नवांशे जातो राजा' असें सूक्ष्मजातकांत वचन आहे. द्वादशांश स्वामी बुध असून तोहि उच्च व पराक्रमस्थानांतच आहे. बुध हा गुप्त हेरांचा स्वामी असून तो उच्चनवांशी असल्यानें शिवाजीचा पराक्रम व भाग्योदय यांना गुप्तहेरांचें फारच उत्तम सहाय्य झालें हें इतिहासज्ञांस विदितच आहे.

या कुंडलींत दशमस्थानांत चंद्र व शनि राजयोगकारक असल्यानें जन्मस्थानापासून पश्चिमेस जलस्थानासमीप किल्ल्यावर राज्याभिषेक झाला. याशिवाय इतर शुभयोग अनेक आहेत. विस्तारभयास्तव आतां त्या सर्वांचा नुसता उल्लेख करून हा लेख आटोपता घेऊं.

द्वितीय स्थानांतला गुरु सर्वत्रविजय व भरभराट दर्शवितो. तृतीयस्थानचा रवि धाडसाच्या कामांत यश व राजसन्मान देतो. चतुर्थ स्थानचा शुक्र शेती, वाहनें, अधिकार, विजयकीर्ति दर्शवितो. षष्ठस्थानचे राहु व मंगळ शत्रूंचा नाश दाखवितात. नवमांत स्थिर व अग्निराशींत असलेला हर्शल धाडसीपणा, अलौकिक कर्तृत्व, वीरवृत्ति व राज्याधिकार यांचा द्योतक आहे. शनि व चंद्र यांचा विचार पूर्वीं केलाच आहे. लाभस्थानांतला नेपच्यून शनीप्रमाणें लाभदायक होतो.

या शिवाय ' लग्नेशे शुभेऽर्थे निध्याप्तिः ', ' शार्कयोगे क्रियापटुः ', ' षष्ठेशे दृष्टे धनेशे शत्रुतो धनप्राप्तिः ', ' शुक्रे शुभयुतदृष्टे मातुर्दीर्घायुः ', ' रन्ध्रारीशाः केंद्रगौ प्रनार्पा ', ' धनायपौ केंद्रगौ धनलाभः ', ' धर्मकर्मपयोगे महायात्रा ', ' शुभर्क्षे भ्रातृकारके शौर्यधैर्यान्वितः ', 'सुनफायां राजा,' ' सहजपे केंद्रकोणे विक्रमी ' इत्यादि अनेक योग या कुंडलींत दिसून येत आहेत.

शिवाजी महाराजांची जी जुनी कुंडली कै० जीवनराव चिटणीस यांनीं दिली आहे ती सायन आहे. तींत त्या वेळचे अयनांश १८—५० वजा करून ती कुंडली निरयन करून मांडल्यास ती पुढें दिल्याप्रमाणें होते.

## जुनी चुकीची कुंडली




या कुंडलींत चंद्र भरणी या क्रूर व अनिष्ट द्योतक नक्षत्रांत आहे. भाग्याचा कारक ग्रह, मारकेश व दशमाधिपति असा गुरु शत्रुस्थानांत आहे. रवीच्या गृहांत गेल्यानें शनि निर्बल झाला आहे. केंद्रांत एकहि ग्रह नाहीं. केतु हा क्रूर ग्रह अष्टमांत आहे. भाग्यस्थानांत व्ययाधिपति व शत्रुस्थानाधिपति यांची युति असून त्यांच्यावर शनीची क्रूर राशींतून दृष्टि आहे! जायास्थानचा अधिपति अरिस्थानांत व तो कारकग्रहाचा शत्रु आहे. राज्याभिषेक ज्या लग्नावर झाला तें लग्न व्ययस्थानीं, आणि राज्याभिषेकाच्या दिवशीं जन्मराशीपासून अष्टम चंद्र, सप्तम गुरु शनी साडेसातीच्या प्रारंभात, लग्नाधिपति व्ययांत आणि अष्टमाधिपति शनि रवीवर चालून येणारा! आणि ही असली कुंडली शिवाजी महाराजांची म्हणून अद्यापि आग्रहानें सांगण्यांत येत आहे! आणि ज्यांना हे दोष उघड दिसूं लागले ते आतां मिथुन लग्न बदलून कर्क लग्न पुढें करूं लागले आहेत. लग्न बदललें तरी लग्नेशाचा शत्रु राहु लग्नीं येतो व तो सद्योमृत्यु दर्शवितो आणि म्हणूनच ही कुंडली शिवाजीच्या अल्पायु भावाची असावी असें आम्ही म्हणतों. शिवाजीच्या आयुष्यांतील इतरहि कोणत्याच प्रसंगाशीं ही कुंडली जुळत नाहीं.

उपरिनिर्दिष्ट दोषांमुळें जुनी कुंडली अर्थातच त्याज्य ठरते. नव्या कुंडलींत शिवाजी महाराजांच्या चरित्रांतील अनेक घडामोडींचा काल विचारांत घेऊन तो निरनिराळ्या लग्नाशीं ताडून पाहिल्यास तो धनु लग्नाशीं उत्तम मिळतो व तसा तो इतर लग्नांशीं जुळत नाहीं, हें अ. मा. वाघोलीकर, ह. सि. राजंदेकर, गंगाधर कृष्ण देव, के. डी. पोटफोडे, योगेश्वर विनायक जोशी, प्रो. आपटे, यांनीं विस्तृत रीतीनें दर्शविलें आहे. परंतु तो विषय सर्व सामान्य वाचकांना कळण्याजोगा नाहीं व तज्ज्ञांना नुसता दिग्दर्शित केल्याने ध्यानांत येण्याजोगा असल्यानें त्याचा ऊहापोह येथें केलेला नाहीं.

असो. ज्या ज्योतिर्विदांनीं शिवाजी महाराजांच्या जन्मलग्नाचा विचार करून धनुलग्नच प्रशस्त असल्याबद्दल आणि त्या लग्नाचा शिवाजी महाराजांच्या

आयुर्दायांतिल विविध प्रसंगांशीं मेळ बसत असल्याबद्दल पंडित रघुनाथशास्त्री यांच्याकडे लेखी कळविलें आहे त्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेत.

१ अमृत माधव वाघोलीकर, कोल्हापूर; २ हरिहर सिताराम राजंदेकर, राजंदा ( वऱ्हाड ); ३ सदाशिव रामजी देशमूख, मु. तऱ्हाळा ( अकोला ); ४ गंगाधर रामकृष्ण देव, नागपूर; ५भगवंत रामजी परदिशे,मु.कुरूम(अकोला); ६ कृष्ण शास्त्री उपाध्ये, अकोला (वऱ्हाड); ७ के. डी. पोटफोडे, वेणीकोठा ( धामणगांव ); ८ योगेश्वर विनायक जोशी, नागपूर; ९ यशवंत महादेव पावडे, वायगांव निपाणी ( वर्धा ); १० नारायणशास्त्री अष्टेकर, कोल्हापुर; ११ अनंत भरमण्णा पंडित–माणगांव कोल्हापूर; १२ अनंत शास्त्रीज्योतिषी, शहापूर ( बेळगांव ); १३ जनार्दन विश्वनाथ साने, सांगली; १४ गोविंद रामचंद्र जोशी, मुंबई; १५ रामचंद्र बळवंत मैराळ, अंमळनेर; १६ प्रो. गो. स. आपटे, उज्जनी; १७ ना. अ. पाटणकर सांगेगोवा.

याशिवाय नाशिकचे निफाडकर ज्योतिषी आणि पुण्यांतील पं. रघुनाथ शास्त्री, शेवडे इत्यादि अनेक ज्योतिषी यांच्याशीं समक्ष वाटाघाट केल्यावर त्यांनींहि धनुराशीच प्रशस्त मानली आहे. या कुंडलींत दिलेल्या स्पष्टग्रहांत कांहीं थोड्या अंशाचा, कला–विकलांचा फरक आल्यास तो भिन्न भिन्न गणितपद्धतीचा परिणाम होय. परंतु भिन्न गणिताने तसा थोडाबहुत फेरबदल झाला तरी मूळ कुंडलींत म्हणजे धनुलग्नांत, रविनवमांशांत आणि भावचलित कुंडलींत फेरबदल करण्याचें कारण नाहीं. यास्तव यापुढें श्री शिवाजी महाराजांचा जन्मकाल शके १५५१ शुक्लनाम संवत्सरे फाल्गुन कृष्ण ३ शुक्रवार रात्रीं धनुलग्नीं सिंह नवमांशांत झाला हें निश्चित समजावें.

॥ शुभं भवतु ॥

---

# मिर्जा राजा जयसिंग याचें आज्ञापत्र.

( सं. श्री. सरदार गं. ना. मुजुमदार)

الله اکبر




متصدیان مهمات حال و استقبال و دیسمکهان و دیسپاندیان پرگنه پونه بدانند چون اراضی و مبلغ یک تنکه شاهی از بعضے دیهات پرگنه مذکور سالیانه بموجب اسناد احکام سابق در وجه مدد معاش دهاو بهت ولد راج بهت اکن هوتري ساکن قصبه پونه مقرر است لهذا نوشته میشود که سالیانه مذکور وغیره برطبق اسناد سابق بدستور قدیم از محل قدیم میرسانیده باشد که قابض و متصرف بوده بدعاگوي دوام دولت ابدمدت اشتغال داشته باشند زیاده ازین چه نوشته شود بتاریخ چهارم شهر جمادی الاول سنه ۸ جلوس ❁

چیکهلی طرف حویلی تهل سامن پهل گانون طرف ساندس بزرگ

تنکه کاس ده روفه تهل کاس نیم چاور زمین

شاهر پهر گانون زمین زراعت کاس

بعضے یک تنکه موافق شد امد چاور نیم

کیر گانون طرف پاتس زراعت

# मागील फारशी पत्राचें मराठी लिप्यंतर

## अल्ला हू अकबर




मुतसद्दियान् मुहिम्माते हाल् व इस्तकबाल् व देसमुखान् व देस्पांडियान् परगणे पूना बिदानंद् चूं अराजी व मुबलघ यक टका शाही अज् बाजे देहाते परगणे मजकूर सालियाना बमूजिबे असनादे अहकामे साबिक् दरवझे मद्दद् माष भाऊभट वलद् राजभट अग्नहोत्री साकीन कसबे पूना मुकर्रर अस्त लिहजा नवीश्ता मीशवद् के सालियाना मजकूर बर तयक्के असनादे साबिक् बदस्तूरे कदीम अज् महल् कदीम मीरसानीदा बाशंद् के काबीज व मुतसर्रिफ् बूदा बदुआगोई दवाम दौलत् आबद्द मुद्दत इष्नघाल् दाश्ता बाशंद् ज्यादा अज् ईं चे नवीश्ता शवद् चतारीख चहारुम शहरे जमादिलअव्वल सन ७ जलूस

( पाठिमागील बाजूस )

फुलगांव तर्फ सांडस-
बुजर्ग थळ कास नीम
चावर जमीन
फरगांव जमीन जिराअत
कास चावर नीम

चिखली तर्फ हवेली थळ
सामन टके कास दह्
रुके १०
बाजे येक टका शाहर
मवाफिक शुदामदा
केडगांव तर्फ पाटस
जिराअत कास येक चावर

## अल्लाहो अकबर




दशाधिकारी व लेखक, वर्तमान व भावी व देशमुख व देशपांडे, परगणे पुणें यांनीं जाणावें कीं, परगणे मजकूरपैकीं कांहीं गांवांत जमीन एक टका शाही दरसाल पूर्वीच्या सनदेच्या हुकमाप्रमाणें योगक्षेमाकारितां भाऊभट वलद राजभट अग्निहोत्री राहणार कसबे पुणें यांस कायम दिलेली आहे. सबब लिहिण्यांत येतें कीं, सदरहू वार्षिक ( उत्पन्न ) जुन्या सनदेप्रमाणें पूर्वीच्या वहिवाटीस अनुसरून व सदर पूर्वींच्या गांवामधून त्यांस मिळत जावें. त्यांनीं मात्र सदरहू जमिनीचा उपभोग करून या शाश्वत चिरंतन राज्याचें अभीष्टचिंतन करून असावें, यापेक्षां जास्त काय लिहावें! तारीख ४ माहे जमादिलावल सन ७ जलूस.

### ( पाठिमागील बाजूस ).

फुलगांव तर्फ सांडस बुजुर्ग
थळ कास नीम चावर जमीन
थेरगांव जमीन
जिरायत चावर नीम

चिखली तर्फ हवेली थळ
सामन टके कास दहा रुके
तपसील
बाजे येक टका पूर्वीपासून चालत
आल्याप्रमाणें केडगांव तर्फ पाटस
जिरायत कास एक चावर.

येथें दिलेलें पत्र श्री. रा. रा. हणमंतराव सदाशिवराव ढेरे, इनामदार पुणें, यांच्या संग्रहांतील आहे. नारायणराव पेशव्यांच्या वधप्रसंगीं याच ढेरे घराण्यांतील इच्छारामपंतांनीं स्वामिनिष्ठेनें आत्मार्पण केल्याचें इतिहासांत नमूद आहे; त्याचप्रमाणें या घराण्यांतील कागदपत्रांवरून शिवाजीमहाराजांच्या अमदानीपूर्वी कित्येक पिढ्यांपासून ढेऱ्यांची वस्ती पुण्यास असल्याचें सिद्ध होतें, व त्यांच्या कागदपत्रांवरून पुण्यांत झालेल्या अनेक राज्यक्रांत्यांचाहि छडा लावतां येतो. प्रस्तुतचें पत्र शके १५८६ मार्गशीर्ष शु. ५ ( = १६६४ नोवेंबर १३ ) मितीचें असून त्यांत मिर्जा राजा जयसिंग यानें, पुणें परगण्याच्या अधिकाऱ्यांना भाऊभट अग्निहोत्री याच्या इनाम जमीनी जुन्या सनदेप्रमाणें चालू ठेवाव्या असा, हुकूम सोडला आहे. त्यावरून पुढें दिलेल्या गोष्टी निश्चित होतात.

( १ ) यावेळीं पुणें परगण्यावर मोंगलांचा अंमल चालत होता.

( २ ) शके १५८२ मध्यें शास्ताखानानें पुणें काबीज केल्यापासून तेथील मराठ्यांचा अंमल उठला; पुढें १५८५ च्या चैत्रांत महाराजांनीं शास्ताखानाच्या गोटावर रात्रीं छापा घालून त्याचीं बोटें तोडलीं तरी पुण्यास मराठ्यांचा अंमल बसला नाहीं.

( ३ ) शास्ताखानानंतर दक्षिणेच्या सुभ्यावर जसवंतसिंगाची नेमणूक झाली व त्याला काढून १५८६ च्या आश्विनांत मिर्जा राजा जयसिंग यास त्या जागीं नेमलें. त्यानंतर दोन महिन्यांनीं ही सनद जयसिंगानें दक्षिणेंत येण्यापूर्वीच दिली आहे. यावरून १५८६ च्या फाल्गुनापर्यंत जसवंतसिंग पुण्यास असला तरी तो आपल्या नांवें सनदा देत नसून सर्व व्यवहार जयसिंगाच्या नांवें चालत असे. जयसिंगामार्फत पुरंदरचा तह ठरल्यानंतर पुणें परगणा १५८७ च्या माघापूर्वी ( सं. १८ ले. ११ ) परत मराठ्यांच्या ताब्यांत आला होता. यावरून शके १५८२ ते १५८७ पर्यंत ५।६ वर्षें पुणे परगण्यावर मोंगलाचा अमल चालत होता असें दिसतें.

# २७ बखरींतील कालदर्शित प्रसंग.

( ले.—शं. ना. जोशी, वांई. )

छत्रपती शिवाजीमहाराजांच्या चरित्रासंबंधानें असलेल्या साधनग्रंथांत मुख्यतः दोन प्रकार आहेत. एक स्वयंप्रमाण साधनग्रंथ व दुसरे परतःप्रमाण साधनग्रंथ. ( १ ) अस्सल म्हणजे सहीशिक्याच्या सनदा व पत्रें हें पहिल्या प्रकारचें म्हणजे स्वयंप्रमाण साधन असून बाकीचीं सर्व साधनें दुसऱ्या प्रकारांत मोडतात. ह्या दुसऱ्या प्रकारच्या साधनांत ( २ ) नवीन प्रसिद्ध होत असलेल्या शकावल्या, ( ३ ) जुन्या प्रसिद्ध आठ बखरी हे ग्रंथ प्रामुख्यानें येत असून इतरहि ( ४ ) निरनिराळया कैफियती, यादी, करिने, वंशावली, वगैरे लेख गणले गेले आहेत. ह्याशिवाय ( ५ ) काव्यग्रंथ हेंहि एक शिवचरित्र-साधन असून तेंहि अर्थात् दुसऱ्या प्रकारांतच मोडतें. म्हणजे पहिल्या व दुसऱ्या प्रकारांत मिळून एकंदर पांच प्रकारचीं साधनें होतात. पहिलें साधन सर्वथैव विश्वासपात्र व अप्रमानाचें खरें; पण तेंहि नीट बारीक चौकसीनें पारखून घेतलें पाहिजे. दुसऱ्या प्रकारांतलि चारहि ग्रंथ ज्या निरनिराळया कसोट्यांवरून पारखून उपयोगांत घ्यावयाचे, त्या कसोट्यांपैकीं म्हणजे ग्रंथ-प्रामाण्य-लक्षणांपैकीं एक प्रमुख व आद्य लक्षण म्हणजे ग्रंथांतील एकंदर प्रसंगांपैकीं ज्या प्रसंगांचा काल दिला आहे, असे प्रसंग कोण-कोणते व किती आहेत आणि ते कितपत विश्वसनीय आहेत हें पाहणें. ही विश्वसनीयता ठरवितांना अंतर्बाह्य दृष्टया म्हणजे, अशा कालनिर्देशपूर्वक दिलेल्या प्रसंगांसबंधानें निरनिराळया साधनग्रंथांत तफावत अथवा एक-वाक्यता किती आहे, हें सामान्यतः पहावयाचें; आणि विशेषतः अन्य मत्यंतर पुराव्यानें तो प्रसंग बरोबर जमतो कीं नाहीं हें तपासावयाचें, हें उघड आहे.

पैकीं येथें फक्त बखरी वगैरे ग्रंथांमधील कालासह दिलेल्या सर्व प्रसंगांची नोंद दिली आहे. म्हणजे अंतर्दृष्टया शिवप्रसंगांचें निरीक्षण केलें आहे. ही प्रसंगांची नोंदहि तक्तारूपानें दिली असल्यामुळें कोणत्या ग्रंथांत कोणकोणते व किती शिवप्रसंग आले आहेत आणि त्यांचा काल काय, हें संकलित रीतीनें कळून येईल; आणि त्याबरोबरच त्या परस्परांत तफावत अथवा एक-वाक्यता किती आहे हेंहि सहज ध्यानांत येईल.

हे कालासह दिलेले प्रसंग त्या त्या ग्रंथांतील एकंदर किती प्रसंगांपैकीं आहेत, हेंहि लक्ष्यांत येणें अवश्य आहे. आणि त्याकरतां प्रत्येक बखरी वगैरे-

मधील शिवप्रसंगांची एकूण बेरीजहि खालीं दिली आहे. पांच सहा बखरींतील प्रसंगांची यादी खं. ४ मध्यें गु. राजवाडे ह्यांनीं दिली असल्यामुळें तेवढ्यापुरती तीच जमेस धरून प्रसंगमोजणी केली आहे.

| ग्रंथ | एकंदर प्रसंग | कालयुक्त प्रसंग |
|---|---|---|
| १ सभासदी बखर | ७१ | २ |
| २ चित्रगुप्ती ,, | ६८ | १ |
| ३ ९१ कलमी ,, | ३४ | ७ |
| ४ मल्हारराव ,, | ७५ | १६ |
| ५ म. सा. छोटी ,, | ९९ | २ |
| ६ शिवदिग्विजय ,, | ७३ | १७ |
| ७ शिवप्रताप ,, | २१ | ४ |
| ८ शेडगांवकर ,, | १६९ | २८ |
| ९ खं. ४ मधील ,, | ४ | २ |
| १० प्रभावल्लींतील नोंद | ३ | ३ |
| ११ धडफळे यादी | ७ | ५ |
| १२ नागपूरकर भोसले बखर | १० | ३ |
| १३ छ. वं. यादी | १२ | ५ |
| १४ रामदास शकावली | ५ | ५ |
| १५ विजयदुर्गची हकीगत | २ | २ |
| १६ प्रतिनिधी बखर | ३८ | ४ |
| १७ पंडितराव ,, | ५ | ४ |

ह्यावरून वर लिहिल्याप्रमाणें शिवचरित्रविषयक सुटे व कालयुक्त प्रसंग कोणच्या ग्रंथांत किती आहेत हें कळून येऊन, पुढील तक्त्यांवरून ह्या कालदर्शित प्रसंगांच्या कालांत एकी किंवा बेकी किती आहे तेंहि ध्यानांत येईल. येथेंच हेंहि लिहावयास पाहिजे कीं, वरील यादींतील क्र. ९ ते १६ ह्यासारख्या लेखांस शिवचरित्र–साधन–ग्रंथांच्या यादींत आणण्याचें श्रेय नव्या शिवजन्मतिथीच्या प्रसिद्ध आक्षेपकांकडे आहे. आपणांस बखरींपुरतेंच पाहणें इष्ट आहे. बखरींतल्या एकंदर प्रसंगांशीं कालासह दिलेल्या प्रसंगांच्या प्रमाणापेक्षां, दिलेल्या प्रसंगकालांत गणितदृष्ट्या पडत असलेला मेळ किती, तें लक्ष्यांत घेतां, सभानीतींत (भा. व.) एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें, बखरलेखकांस 'लेखनबळ अथवा गोष्टीबळ बहुत पण गणितबळ कमी' हें प्रत्ययास येतें.

आतां प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें ज्या शकावली नवीन उपलब्ध व ह्या पुस्तकांत पृ. १६-३९; ५०--६९ वर प्रकाशित झाल्या आहेत, त्यांमधील सुटे व कालयुक्त प्रसंग किती तें देणें ह्या ठिकाणीं अत्यंत आवश्यक आहे. येथें एकं-

दर चार शकावली प्रसिद्ध झाल्या आहेत. जेधे शकावली व नवीन तीन शकावली. त्यांपैकीं तिसरी शकावली शाहुकालीन असून पहिली व दुसरी ह्या, शिवकालीन आहेत. पहिली शिवाजीच्या मृत्यूपर्यंत (श. १६०२) व दुसरी (श. १५९६)म्हणजे राज्याभिषेकापर्यंत आहे. म्हणून त्यांस अनुक्रमें निधनशकावली व राज्याभिषेक शकावली असें म्हटलें आहे. म्हणजे

१ जेधे शकावली, २ निधन श. व ३ राज्याभिषेक श. ह्या तिन्ही श०तील एकंदर प्रसंग २४३ १०२ १६९ असे आहेत आणि त्यांतील एकंदर मिती १६४ ९८ १२४ अशा आहेत. पैकीं केवल शिवाजी विषयकच प्रसंग आणि तेहि पहिली पेक्षां पुढलींत जेवढे अधिक अथवा वेगळे तेवढेच द्यावयाचे तर अनुक्रमें १४४, ३४ व २ मिळून १८० होतात. आणि ह्या १८० प्रसंगांपैकीं १७६ प्रसंगांचे स्पष्ट काल दिले आहेत. बखरींतील प्रसंग आणि शकावलींतील प्रसंग ह्यासंबंधानें हें एक येथें अवश्य सांगितलें पाहिजे कीं, बखरींतल्यापेक्षां शकावलींतील प्रसंग त्या प्रसंगाच्या केवळ मितीमुळेंच गणले गेले आहेत; त्या मितीस दिलेल्या हालचालीच्या विशेषामुळें नव्हे. असें करणें इतिहासाच्या साधनग्रंथाचे बाबतींत इष्टच आहे. दुसरेंहि एक असें सांगावयाचें कीं, बखरींतील प्रसंगांचे काल तपासतांना, शकावलींतील प्रसंग व त्यांचे काल ह्यांकडे ज्या सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां चालेल ती दृष्टि ठेवलेली नाहीं.कारण येथें तशी अपेक्षाच धरणें गैर. म्हणून सामान्यतः शकसंवत्सरापुरती ढोबळ दृष्टिच ठेविली आहे. हे प्रसंग व त्यांचे काल बाह्य प्रत्यंतर पुराव्यानें तपासणें हें येथें अभिप्रेत नाहीं; त्याचप्रमाणें तिन्ही शकावलींचें विवेचनहि येथें संकलित नाहीं. तेव्हां, बखरी वगैरेमध्यें ज्या प्रसंगांचे जे काल दिले आहेत त्यांचा, त्या त्या ग्रंथापुरता स्वतःशीं, त्या परस्परांत आणि शकावलींशीं, पडत असलेला मेळ कितपत आहे तें स्पष्ट केलें म्हणजे हें अंतर्निरीक्षण पुरें होईल.

पुढें दिलेल्या १७ ग्रंथांत मिळून वेगवेगळे आलेले शिवाजीविषयक कालनिर्देशाचे प्रसंग एकंदर ४५ आहेत. त्यांपैकीं शिव--जन्म,--राज्याभिषेक,--मृत्यु हे तीनच प्रसंग बहुतेक सर्वांनीं म्हणजे १७ पैकीं अनुक्रमें १४,१५ व १३ लेखकांनीं दिले आहेत. आणि कार्यप्रारंभ, अफजलवध, शास्ताखानावर हल्ला, जिजाईमृत्यु हे ४ प्रसंग चौघांनीं दिले असून; सईबाईलग्न, मोरेवध, संभाजी-राजारामजन्म हे ४ प्रसंग ३ जण देतात. तर दादो कोंडदेव मृत्यु, बाळाजीस चिटणीसी, आग्र्याहून परतणें, गागाभट येणे व राजारामलग्न ह्या ५ प्रसंगांचा कालनिर्देश २ ग्रंथांत आहे. आणि बाकीच्या २९ प्रसंगांना एकेक ग्रंथकारच नमूद करतो. त्यांतहि ३० ते ४५ हे १६ प्रसंग एकट्या शेडगांवकर बखरींतच येतात. जेधे श. त ह्या ४५ प्रसंगांपैकीं २२ प्रसंग व त्यांचे काल दिले आहेत.

येणेप्रमाणें असलेल्या ह्या ४५ प्रसंगांपैकीं १६ च प्रसंग असे आहेत कीं, ज्यांच्या कालासंबंधानें-ते एकाहून अधिकांनीं दिले असल्यामुळें त्या-परस्परांतील एकवाक्यता अथवा भिन्नता पाहातां येते आणि एकेका ग्रंथांतूनच आलेल्या बाकीच्या २९ प्रसंगांसंबंधानें त्या त्या व इतर ग्रंथांतील मजकूरदृष्ट्या पूर्वापरसंगती, कार्यकारणसंबंध इत्यादींवरूनच कालपरीक्षण केलें पाहिजे. आणि असें पाहिलें असतां ४५ प्रसंगांतील १६ प्रसंगांपैकीं ९ प्रसंगांच्या कालांत सामान्यतः एकवाक्यता असून त्यांपैकीं ७ बरोबर आहेत. सामान्यतः असें म्हणण्याचें कारण हें कीं, ह्यांतहि त्या त्या प्रसंगाच्या ३।४ उल्लेखांपैकीं दोहोंत अथवा तिहींत एकवाक्यता, तर एक उल्लेख त्याहून भिन्न, असा प्रकार आहेच. बाकीच्या सात प्रसंगांच्या तीन अथवा चार कालनिर्देशांत परस्पर मेळ नाहीं व त्यांपैकीं कोणचाहि एक बरोबर नाहीं. ह्या १६ खेरीज उरलेल्या २९ प्रसंगांत ५ बरोबर आहेत. एकंदरींत बखरी इत्यादींतील शें सवाशें सुटया प्रसंगांपैकीं कालदार्शित ४५ प्रसंगांत १२ बरोबर, ७ अनिर्णित व २६ चूक असा इत्यर्थ निघतो. ह्या इत्यर्थाचा खुलासा थोडक्यांत खालीं प्रसंगवार देतों.

१ शिवजन्म—ह्याचा १४ ग्रंथांत उल्लेख आहे. पैकीं ९ ग्रंथांत मिळून ११ प्रकारची भिन्नता आहे. बाकीच्या ५ त एकवाक्यता असली तरी ती गणितानें जमत नाहीं. तात्पर्य, कोणतीहि बखर वगैरे स्वतःशीं सुद्धां शक–संवत्सर–तीथीवार इ. गणितदृष्ट्या बरोबर नाहीं, इतर बखरीं वगैरेंशींहि जमत नाहीं; आणि जेधे इत्यादि तिन्हीं शकावलींशीं तर नाहींच नाहीं.

२ वेंकोजीजन्म—शिवदिग्विजयावांचून कोठेंहि ह्याचा काल दिलेला नाहीं. दिग्विजयांतहि दिलेल्या १५५३ शकाला कालयुक्ताक्षी हा संवत्सर दिला आहे; तो चूक आहे. प्रजापती संवत्सर पाहिजे. ह्या दोन संवत्सरांत फारच म्हणजे ४७ वर्षांचें अंतर आहे. तेव्हां संवत्सरनामावरूनहि शक काढण्यांत हंशील नाहीं.

३ शिवाजी विजापुराहून येतो—श. १५५९. फक्त मल्हाररामरावाचे बखरींत हा उल्लेख आहे. आणि तेथें शिवाजीच्या पहिल्या लग्नाचा संबंधहि जोडला आहे. तेव्हां त्या लग्नप्रसंगाच्या पुढें केलेल्या विचारानुसार ह्याचाहि विचार केला असतां हा शक प्रमाण आहे असें वाटत नाहीं.

४ दादाजी कोंडदेव मृत्यु—ह्याचे १५६२ व १५५६ असे दोन शक दिग्विजय व पंतप्रतिनिधीबखर ह्यांमध्यें दिले आहेत. शेडगांवकरबखरींत, दादाजी श. १५७० मध्यें बेंगरुळास शहाजीकडे गेल्याचें लिहिलें आहे आणि पुढेंच, तेथून परत

आल्यानंतर 'त्याउपरी पुढें कांहीं दिवसांनीं दादो कोंडदेव यास देवआज्ञा जाहली' ( पृ. १८ ) असें सांगितलें आहे. म्हणजे सामान्यतः श. १५७० हा दादाजीचा मृत्युशक ह्या बखरीप्रमाणें धरण्यास हरकत नाहीं. पण हे तिन्ही शक पुढील प्रमाणावरून चूक आहेत. खं. १६ ले. २० हें दादाजीचें पत्र श. १५६७ मधील आहे. म्ह. १५६७ शकांत दादाजी हयात होता आणि म्हणून १५५६ अथवा १५६२ हा त्याचा मृत्युशक असणें शक्य नाहीं. खं. २० पृ. १० व ३४९ आणि सनदापत्रें पृ. १११ वरील लेखांकांवरून १५६९ हा दादाजीच्या मृत्यूचा शक येतो. १५६२, १५७० वगैरे नव्हत.

५ शिवाजी लग्न—१५५९, १५६२ व १५७५ असे तीन शक ह्या लग्नाचे दिले असून हें लग्न सईबाईशीं होय असें तिघेहि—मल्हार-रामराव, दिग्विजयकार व शेडगांवकर—सांगतात. पण सई-बाई ही कोणाची मुलगी व लग्न कोठें झालें ह्याविषयीं तिघांचीं तीन मतें आहेत. सईबाई ही शिर्के व मोहिते घरा-ण्यांतील असून तिचें शिवाजीशीं लग्न अनुक्रमें विजापूर, पुणें व रायगड येथें झालें असें प्रत्येक जण वेगवेगळें सांगतो. रायगड तर ह्या वेळीं शिवाजीच्या ताब्यांतच नव्हता. म्हणजे सईबाईचें माहेर व लग्नस्थल आणि लग्नकाल ह्यांपैकीं एका-संबंधानेंहि एकवाक्यता नाहीं. आणि यामुळें हें लग्न होऊन शिवाजी विजापुराहून आल्याचें जें वर सांगितलें आहे तेंहि प्रमाण नाहीं. सईबाई ही निंबाळकर घराण्यांतील मुलगी असें सभासदी व चित्रगुप्ती बखरींत आहे. तेंच बरोबर आहे. निंबाळकर हे पवार होत. खं. २० ले. २७५; मराठा कुळाचा व धार सं. चा इतिहास.

६ कार्यप्रारंभ—१५६२,-६३,-६५,-६६ असे चार शक चार ठिकाणीं आढळतात. वस्तुतः कार्यप्रारंभ असा कांहीं स्वतंत्र प्रसंग असणें शक्य नाहीं. तर दुसरें कोणचें तरी—किल्ला घेणें, सरदार पाडाव करणें, किंवा एकादें कार्य करण्याची आण-भाक होणें—असलें कार्य घडलें असलें पाहिजे व तद्द्वारां मुख्य कार्यप्रारंभ केल्याचा हा शक असला पाहिजे. पण ह्या सालीं अमुक एक कार्य केल्याचें त्या त्या ग्रंथांतून दिलेले नाहीं. आणि तसेंच पाहावयाचें झाल्यास उलट ह्याहि शकाचे

पूर्वींच म्हणजे श. १५६०–६१ सालींच शिवकार्यारंभ दिसून येतो. खं. १५ ले. ४३७. मात्र हा प्रारंभ शिवाजीकरतां होता, शिवाजीचा नव्हता. शिवाजीकडून स्वतः पहिली गोष्ट म्हणून जी केल्याचें आज आढळते, ती म्हणजे 'बापूजी मुद्गल नऱ्हेकर देशपांडे ता। खेडेबारें याच्या हातें राजकारण करून दग्यानें किल्ला कोंडाणा घेतला' ही होय. आणि ह्या कृत्याचा शक म्हणजे दादोजी कोंडदेवाच्या मृत्यूचा शक १५६९ हा आहे.

**७ मोरे वध**—श. १५७४,–७५,–७७ अशीं तीन वर्षें तीघेजण देतात. जेधे शकावलींत १५७७ (पौष व.) १४ स जावली घेतली असें असून त्यावेळीं, चंद्रराव पळून रायरी किल्यावर गेले; तेथून श. १५७८ त रायरी किल्ला शिवाजीनें घेतला तेव्हां चंद्रराव किल्याखालीं उतरले, असें आहे. ह्याचप्रमाणें निधन शकावलींत व जेधे–करिन्यांतहि आहे. चंद्ररावाच्या हातून शिवाजीनें जावली घेतल्यानंतर चंद्ररावानें शिवाजी विरुद्ध अदिलशहाशीं मसलत आरंभिली वगैरे हकीकतहि अन्यत्र आढळते. ते कांहीं असलें तरी वरील पैकीं एकहि शक चंद्ररावाच्या मृत्यूचा नाहीं. मानावयाचेंच झाल्यास शक १५७८ चे अखेरीस तो मानतां येईल.

**८ रायगड घेतो**—श. १५६८–मल्हाररामराव बखर. ह्या बखरीखेरीज दुसऱ्या कोणत्याही बखरींत ह्या प्रसंगाचा शक दिलेला नाहीं. सुरत मारून कारंजें घेतल्यानंतर रायरी घेतली आणि राज्याभिषेकाचे वेळीं रायरीचा रायगड केला, असें सभासद व चित्रगुप्त लिहितात. शिवप्रतापांत रायगड अथवा रायरी घेतल्याचा उल्लेखच नाहीं; ९१ कलमींत मोरे प्रकरणापूर्वींच रायगड घेतल्याचें सांगितलें आहे; व तसेंच म. सा. छोट्या बखरींतहि आहे. शेडगांवकर बखरींत ह्याचा दोन ठिकाणीं उल्लेख असून पहिल्याचा दुसऱ्याशीं मेळ नाहीं. पृ. ३५ वर म्हटलें आहे कीं, मुसल (मुरुम?) देव डोंगरावर बांधकाम करून अफजलवधानंतर आणि पहिल्यांदा कोंढाणा घेण्यापूर्वीं रायगड बनविला. म्हणजे श. १५८१ च्या नंतर व १५६९ च्या पूर्वीं! बरें, पुढें पृ. ७४ व ८१ वर सभासदी बखरीप्रमाणें, सुरत लुटून कारंजें घेतल्यानंतर रायरी घेतली आणि राज्याभिषेकाचे वेळीं 'रायरी सोन्याची

पायरी' हें नांव मोडून रायगड नांव ठेविलें, असें लिहिल आहे. ह्याहून विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं पृ. १९ वर 'मुसलदेव म्हणून डोंगर होता, त्यास वसविला, राजगड नांव ठेविलें (श. १५७०–७४)' असें आलें आहे. एकंदरींत हें सगळें बिनमेळाचें लिहिणें आहे. श. १५७८ त रायरी घेतली (व तिचाच पुढें रायगड केला.) हें जेधे वगैरे श० तील म्हणणें इतर बाबींशीं जुळतें व बरोबरहि आहे.

९ **बाळाजी आवजीस चिटणीसी**—श. १५७० त मिळाल्याचें फक्त मल्हाररामराव व शिवप्रतापकार देतात. जेधे वगैरे श. त ह्या उल्लेख नाहीं.

१० **राजापूर घेतो**—एकटे शिवदिग्विजयकार ह्याचा १५७० हा शक देतात. जेधे श० त १५८२ हा शक असून तोच राज्या० श. तहि आहे.

११ **अफजलखानवध**—ह्याच्या कालाचा उल्लेख चौघांनीं केला असून ९१ कलमीखेरीज तीन ग्रंथांमध्यें १५८१ हा बरोबर शक दिला आहे. ९१ कलमींत १५७४ हा अगदींच विपरीत शक आला आहे. आणि ह्या शकास दिलेला विकृति संवत्सर प्रमाण धरला तर श. १५७२ च येतो. म्हणजे १५७४ च्याहि शकाचा संवत्सर जमत नाहीं. वार वगैरे जमत नाहींत हे निराळें सांगण्याचें मग कारणच नाहीं.

१२ **शास्ताखान**—ह्याच्यावरील स्वारीचा काल १५७६, १५७८, १५७९, असा तिघांनीं दिला असून, तो उघडच एकास एकाचा न मिळणारा असा आहे; आणि त्यातील कोणचाहि एक खरा नाहीं. शाहिस्तेखान पुण्याकडील प्रांताचा सुभेदार होऊन आल्याचा जरी काळ घेतला तरी त्याहि कालाशीं हे शक जमत नाहींत.

१३ **अनाजी रंगनाथ मलकरे यास मजमू (१५७९)**—ह्या व्यक्तीचा उल्लेख ९१ कलमी इतका अन्य कोणी करीत नाहीं. म. सा. छोटी, मल्हाररामराव पंतप्रतिनिधी ह्या बखरींत नुसता नामनिर्देश आला आहे. प्रतिनिधी बखरींतील पहिल्या ८ पानापर्यंतची हकीकत— आणि तेवढीच मराठी राज्यासंबंधींची अशी त्यांत आहे. ती— म्हणजे ह्या ९१ कलमींतील १ ते ३५ कलमांतील त्रोटक पण मुख्य मजकूर आहे. बाकी बहुतेक विशाळगडकर प्रतिनिधीबद्दल- चीच हकीकत आहे. ह्या ९१ कलमी बखरींत ह्या मलकऱ्यांचा

७।८ वेळां उल्लेख करून, हे धुरंदरगडंचे सबनीस, सेनापतीकडील मुजुमदार, असें त्यांचें महत्वहि दर्शविलें आहे. ह्या बखरींत हें मलकर गांव, त्या गांवीं झालेलें संभाजी कावजीशीं युद्ध (प्र. १५ पहा.) आणि आनाजी रंगनाथाची कामगिरी ह्या गोष्टी विशेष आहेत. मराठी साम्राज्य बखरींत अगर इतर कोणच्या हि बखरींत त्या नाहींत.

१४ **संभाजीजन्म**—तीन ठिकाणीं ह्याचा काल दिला असून तो ज्येष्ठ शु० १० ऐवजी १२, मंगळवाराचे जागीं गुरुवार, एवढ्या फरकानंतर बरोबर आहे.

१५ **संभाजी कावजीशीं युद्ध**—ह्या संभाजीचें नांव व कार्य सभासद, चित्रगुप्त, मल्हाररामराव, शेडगांवकर हे आपल्या बखरींत देतात. पण त्यांत ह्या युद्धाचा संबंध मुळींच नाहीं. फक्त मोरेप्रकरणीं हणमंतराव मोऱ्यांस मारणारा व अफजलप्रकरणीं शिवाजी बरोबर असणारा एवढाच काय तो उल्लेख, ते ह्या संभाजीविषयीं देतात. दिग्विजयांत हणमंतराव मोऱ्यास रघुनाथपंतानेंच मारिल्याचें लिहिलें आहे, ह्या संभाजीनें नाहीं. त्याचप्रमाणें ९१ कलमी व म. सा. छो. बखरींत सुद्धां हा संभाजी हणमंतराव मोऱ्यास मारीत नाहीं. फक्त अफजल प्रकरणांत ह्याचा उल्लेख आहे म्हणजे मोरे प्रकरणापुरतें पाहिलें असतां वर म्हटलेल्या सभासद वगैरे ४ बखरींशीं ही ९१ कलमी व म. सा. छो. बखर जमत नाहीं, अफजल प्रकरणीं जमते; आणि ह्या युद्धप्रसंगाचे बाबतींत मात्र ही ९१ कलमी बखर इतर सर्व बखरींपेक्षां वेगळी व नवीन हकीकत देते. हें युद्ध श. १५७९ मन्मथसंवत्सरीं झाल्याचें ह्या बखरींत दिलें आहे. पण सदर शकास मन्मथसंवत्सर येत नसून मन्मथापासून तिसरा म्हणजे हेमलंबी हा संवत्सर येतो. आणि हाच धरला तर दिलेला तीथवारहि बरोबर जमतो. हा संभाजी कावजी बांदा प्रथम वर म्हटल्याप्रमाणें शिवाजीकडे होता. पण कांहीं कारणानें शिवाजीचें व त्याचें बिनसल्यामुळें हा त्याजकडून निघाला. इतक्यांत शास्ताखान पुणें प्रांताचा सुभेदार होऊन इकडे येत होता. त्यास हा संभाजी बऱ्हाणपुरानजीक जाऊन भेटला. ह्याच्या अंगीं घोडें सहज उचलावें अशी शक्ति असे. खानानें त्यास खुषीनें ठेऊन घेतलें.

५००स्वार तैनातीस दिले आणि हा संभाजी मौजे मलकर ह्या गांवीं खानामार्फत ठाणें करून बसला. अशा स्थितींत ह्यावर शिवाजीनें प्रतापराव गुजर यास पाठवून युद्धांत त्यास ठार केलें. अशी ह्या युद्धप्रसंगाची थोडक्यांत हकीकत आहे. हा प्रसंग षाहिस्तेखानावरील हल्याच्या पूर्वीचा आहे. पण त्या वेळीं प्रतापराव गुजर हा 'प्रतापराव' व 'सरनौबत' नव्हता. ९१ कलमी बखरीचा मूळ नकलकार खंडो अनाजी मलकरे हा, ह्या 'मलकर' गांवचा असल्यामुळें तेथील हें युद्ध व आपल्या पूर्वजांबद्दलची हकीकत त्यानें ह्या बखरींत दिली आहे.

१६ राजारामजन्म-ह्या जन्माचे काल बखरींत श. १५८० व १५८३ हे दोन स्पष्ट व शिवाजीनें बसनूर घेतल्यानंतर ( श. १५८७ )असा एक अप्रत्यक्ष, असे तीन प्रकारचे आले आहेत. श. १५८३ तला कालनिर्देश तीथिवारांसह आहे; पण त्यांत मेळ नाहीं. तात्पर्य, हे तिन्ही विसंगत व अप्रमाण आहेत. जेधे श. निधन श. व राज्याभिषेक श. त शके १५९१ फाल्गून शु. १५ हा राजाराम-जन्मकाल दिला आहे. तोच इतरहि दृष्टींनीं बरोबर आहे. ह्याबद्दल स्वतंत्र विवेचन रा. बेंद्रे यानीं इतिहास मंडळाच्या एका मासिकांत(वर्ष २रें) करून हा काल निर्णीत केला आहे.

१७ मोरोपंत पिंगळे पेशवे होतात—ह्याचा शिवदिग्विजयांत दिलेला, शके १५८४ चैत्र व.१० हा काल जेधे शकावलींत दिलेल्या कालाशीं बरोबर असून, जेधे श. त ह्या तिथीचा वार गुरुवार तोहि दिलेला आहे आणि तो गणितानेंहि बरोबर ठरतो. ह्या मोरोपंताकडे प्रथम श. १५८२ पासून मुजुमदारी होती; नंतर त्याची कर्तबगारी पाहतां पुढें दोन वर्षांनीं त्यास ही पेशवाई दिली; हा जो इतिहासदृष्टीस आवश्यक असा बखरींत नसलेला मोरोपंताच्या चरित्रांतील पूर्व भागा तोहि जेधे श. त आला आहे.

१८ शिवाजी आग्र्याहून परत--मल्हाररामराव व शेडगांवकर बखरींत ह्या प्रसंगाचा शक दिला आहे, तो जेधे इत्यादि. श. शीं बरोबर आहे. मल्हाररामरावानें सदर १५८८ शकास दिलेली मिती मार्गशीर्ष व० १० ही निधन श० शीं जमते; जेधे श. त शु. ५ आहे. म्हणजे येथें निधन श. व जेधे श. ह्यांत फरक पडतो.

१९ श्रीभवानीचें पुढील भविष्य—हा प्रसंग इतिहासास तसा मान्य नाहीं. हें एक, आणि शिवाजी वेंकोजीस श. १५९९ त भेटल्या-

नंतरचा हा प्रसंग असल्यामुळें दिलेला १५९५ हा शक चार वर्षांनीं मागचा व चुकीचा आहे हें दुसरें; आणि त्यांतहि दिलेल्या मितीस दिलेला वार जमत नाहीं हें तिसरें. मल्हाररावाखेरीज इतर कोणी बखरकार हा काल देत नाहीं.

२० शिवाजी चंदी घेतो—ह्याचेंहि श. १५९५ प्रमाथी हें साल दिलें आहे तें चूक आहे. संवत्सराच्या नांवांतहि 'दी' च्या जागीं 'थी' पडल्यामुळें ३४ वर्षांची चूक झाली आहे. सनदापत्रें पृ. १३३–१३४ वर पुरुषोत्तमभट बुरडी व नरसिंहभट कुंभकोणकर यांस मिळालेल्या शिवाजीच्या दोन अस्सल सनदा दिल्या आहेत. त्यांवरून शिवाजी कर्नाटक प्रांतीं गेल्याचें साल श. १५९९ हे स्पष्ट ठरत आहे व तेंच जेधे इत्यादि शकावलींतहि आहे.

२१ शिवाजीचें वेंकोजीस पत्र—ह्याचाहि श १५९५ माघ शु. १२ हा काल वरील दोन्ही प्रसंगांप्रमाणेंच चूक आहे. शिवाय हा काल ज्या शिवदिग्विजय बखरींत दिला आहे. त्यांतच दुसरीकडे 'तेरा वर्षें तुम्ही ( वेंकोजीनें ) राज्य खादलें' असें शिवाजीच्या पत्रांतलें वाक्य असलेला मजकूर आला आहे. म्हणजे शहाजी मेल्यानंतरचें तेरावें वर्ष, तें ह्या पत्राचें साल श. १५९९ हें होय, १५९५ श. नव्हे, हें त्याच बखरीवरून ठरतें. शहाजी मेल्यानंतर १० वर्षांनीं पाठविलेलें हें पत्र धरावें तर पत्रांतील मजकुराशीं हें साल जमत नाहीं. शेडगांवकर बखरींत श. १६०१ मध्यें शिवाजीनें वेंकोजीस पत्र पाठविल्याचें दिलें आहे. (पृ. १०२).

२२ गागाभट्ट साताऱ्यास येतो ( १५९५ )—ह्या प्रसंगाचा काल ठरविण्यास अन्यसाधन नाहीं. शिवदिग्विजयाखेरीज शेडगांवकर बखरींतहि हा प्रसंग व काल दिला आहे. पण तेथें १५८६ हा शक दिला आहे.

२३ राज्याभिषेक—हा प्रसंगराज १७ पैकीं १५ ग्रंथकारांनीं दिला आहे त्यांतहि शकाचा आंकडा, महिना, तिथी व वार ह्यांची भिन्नता ६।७ प्रकारची आहेच; पण ह्यांतील कांहीं हस्तदोष मानले तरी एकवाक्यता म्हणून ज्या कालांत आहे तो कालहि जेधे शकावलीं इतका सूक्ष्म व म्हणून बरोबर नाहीं असें म्हणणें भाग आहे.

२४ जिजाई मृत्यु—एकंदर तीन ठिकाणीं ह्याचा काल दिला आहे. पैकीं एके ठिकाणीं १५९६ हा नुसता शकाचा आंकडाच दिला आहे मल्हाररामराव बखरींत ज्येष्ठ व. ९ अशी मिती दिली आहे ते बरोबर आहे. पण शेडगांवकर बखरींत कार्तिक व० ११ ह

अगदीं भलतीच मिती दिली आहे. जेधे व राज्याभिषेक श० त ह्या प्रसंगाच्या कालांत ज्येष्ठाच्या ऐवजीं चैत्र चुकून पडला आहे. निधन श. त १५९६ ज्येष्ठ व. ९ ही बरोबर मिती आहे.

२५ **संभाजी करवीराकडे रवाना**—शिवाजीनें कोल्हापूरप्रांताकडील चौकशीची कामगिरी सांगून संभाजीस श. १५९९मध्यें रवाना केलें असें दिग्विजयकार लिहितात. इतर ज्या बखरकारांनीं ही कामगिरी दर्शविली आहे त्यांच्या त्या लिहिण्यावरून, श. १५९९ च्या आश्वीनकार्तिकानंतर म्हणजे शिवाजी--व्यंकोजीचा तह झाल्यानंतर संभाजीस ही कामगिरी सांगितली, असें कदाचित् म्हणतां येईल. पण संभाजी रुसून दिलेरखानाकडे गेला व तिकडून परत पन्हाळ्यास आला, तेथेंच शिवाजीची त्याची गांठभेट झाली आणि तेव्हां ही कामगिरी संभाजीकडे आली; असें मानिलें—आणि तसें बखरकारांच्या लिहिण्यावरून मानण्यास हरकतहि नाहीं (मल्हारराम. पृ. ३४९)—तर ह्या कामगिरीचा शक १६०१ हा येतो.

२६ **राजारामलग्न**—हें लग्न, मल्हाररामराव म्हणतात, श. १६०१ मध्यें झालें व शेडगांवकर म्हणतात श. १६०० मध्यें झालें. श. १६०१ हाच काल बरोबर आहे. जेधे श. तहि वर्ष हेंच देऊन लग्नमितीहि दिली आहे. शिवाय लग्नापूर्वी राजारामाची मुंज झाल्याचीहि मिति जेधे श० त दिली आहे.

२७ **शिवाजी मृत्यु**—१७ ग्रंथांपैकीं १३ ग्रंथांत हा मृत्युकाल दिलेला आहे. पैकीं ३ ठिकाणीं वार दिला असून त्यांत दोनदां रविवार व एकदां शनिवार आला आहे. बाकी बहुतेक सर्वत्र श० १६०२ रौद्र चैत्र शु॥ १५ दोन प्रहर, ही वेळ दिली आहे. जेधे श. त ही वेळ असून वार शनवार दिला आहे.

ह्यापुढील म्हणजे २८–४५ प्रसंगांसंबंधानें, ते प्रसंग एकेकच ग्रंथांत आलेले असल्यामुळें आणि विशेषतः ज्या ग्रंथांत ते आले आहेत तेहि ग्रंथ पेशवाईनंतरचे म्ह० श. १७४४ (स. १८२२) च्याहि पुढील काळांतील असल्यामुळें, शिवाय त्यांतील १।२ खेरीज बाकीचे ग्रंथ शिवचरित्रविषयकहि नाहींत, आणि जे शिवचरित्रविषयक आहेत ते अगदींच सामान्य असे असल्यामुळें त्यांतील प्रसंगांचें वेगळें व विशेष स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं. तथापि त्यांतील २।३ प्रसंगांसंबंधानें थोडासा खुलासा करणें प्राप्त आहे.

श्री शिवाजीनें स्वराज्यप्राप्त्यर्थ केलेल्या सर्व कामगिऱ्यांमध्यें पहिली अशी ठळक कामगिरी अमूक केली, हें जसें नेमकें ह्या बखरींवरून ध्यान्यांत येत नाहीं, त्याचप्रमाणें शिवाजीराजावर त्याच्या ह्या कृत्यांमुळें शत्रुपक्षांपैकीं विजा-

घुरकराकडून प्रथम कोणीं व कोठें स्वारी केली हेंहि लक्ष्यांत येत नाहीं. शेड-गांवकरबखरींत पृ. १९ वर असें म्हटलें आहे कीं, रणदुल्लाखान रहिमतपूरकर व बाजी घोरपडे दतवाडकर असे दोघे सरदार शिवाजीवर श. १५७४ मध्यें आले; ह्या मुसलमान सरदाराचा मुक्काम वाईस झाला. तेथेंच एकीकडून वर्धनगडाहून आलेल्या नेताजी पालकरानें व दुसरीकडून राजगडाहून आलेल्या शिवरायानें त्यांवर हल्ला चढविला व त्यांस लढाईत पराभूत करून लुटून पिटून लाविलें. अशी ही वाई येथील, विजापुरकराशीं शिवाजीची पहिली लढाई ह्या बखरींत वर्णिली आहे. शिवप्रतापबखरींतहि शिवाजीचें पहिलें युद्ध विजापुर-कराशीं व वाई प्रांतांतील होय असेंच म्हटलें आहे. पण तेथें ह्या युद्धाचा काल दिला नाहीं आणि विजापुरकर सरदारांचीं नांवेंहि रणदुलाखान व अब-दुलाखान अशीं वेगळीं दिलीं आहेत (पृ.७८.) शिवप्रतापकारांनीं पुढें पृ. ९० वर शास्ताखानाबरोबरहि रणदुल्लाखान होता असें म्हटलें आहे. विशेष हें कीं, हा शास्ताखान विजापुराकडील सरदार व पुणेप्रांतीचा सुभेदार होता, असें भलतेंच लिहिलें आहे ! ह्या प्रतापी बखरींत आणखीहि बरेच चमत्कार आहेत. शिवा-जीची पहिली बायको सईबाई व तिसरीहि बायको सईबाईच पृ. १०१; शहाजीशिवाजी युद्ध पृ. ११४–१२०; नंतर पृ. १२१ उभयतांची भेट; शिवाजी जंजिऱ्याचे प्राप्त्यर्थ समुद्रकांठीं उपोषणें करतो पृ. १२४; वगैरे वगैरे. एकंदरींत संभाजीराजांचा प्रधान कबजी ह्यानें जसें होमहवन करून शत्रुपारि-पत्याचे प्रयत्न चालविल्याचें संभाजी बखरींत वर्णिलें आहे त्याप्रमाणें ह्या शिव-प्रतापांत शिवाजीबरोबर त्याचे शत्रु मुसलमान ह्या दोघांच्याहि हालचाली ईश्वरी साक्षात्कार, शुभाशुभ ग्रह, दृष्टांत इत्यादिकांनीं प्रेरित व चलित असल्याचें ठिकठिकाणीं लिहिलें आहे. असो; तर शिवप्रतापकार शिवाजीची पहिली लढाई वाईप्रांतीं व वरील दोन सरदारांशीं झाली असें जें लिहितात तें त्यांचें लिहिणें त्यांनींच पुढें लिहिलेल्या मजकुरावरून अप्रमाण ठरत आहे. शेडगांवकर बखरींतीलहि ह्या लढाईचें वर्णन चूक आहे. कारण, सदर बखरींत ह्या लढा-ईतला मुख्य सरदार जो रणदुलाखान तो रहिमतपूरचा असें स्पष्ट सांगितलें आहे; आणि तो तर शके १५६५ मध्येंच मेला असल्याचें त्याच्या रहिमतपूर येथील घुमटावर असलेल्या शिलालेखांत नमूद आहे. (द्वितीय सं. वृ. पृ. २६५ ). इतर सर्व बखरींतून श. १५८१ मध्यें शिवाजीचें अफजलवध प्रसंगीं जें युद्ध झालें तें पहिलें असें म्हटलें आहे, तेंहि तितकें बरोबर नाहीं. कारण मागें पृ. ४१ वर जेधे करिन्यांत आणि खं. १५ ले. ३६४ मध्यें, खळद-

बेलसर येथें म्हणजे पुणेप्रांतीं विजापुरकराकडून आलेल्या फतेखान ह्या सरदाराशीं शिवाजीची लढाई झाली, नंतर जावली प्रकरण व त्यानंतर अफजलवध, असें दिलें आहे तेंच बरोबर दिसतें.

दुसरा प्रसंग ३३ वा म्हणजे शिवाजीची वांई जवळील गोळेवाडीवरील स्वारी. हा प्रसंग व इतर बखरींतील कल्याणप्रांतांतावरील आबाजी सोनदेव ह्याच्या हल्याचा प्रसंग हे सारखेच वाटतात. ह्या हल्ल्यांतील लुटींत सांपडलेली कल्याणच्या किल्लेदाराची सून जशी 'नीतिवंत व धर्मरक्षी' ऐशा शिवाजीराजानें माता म्हणून सन्मानानें परत पाठविली; तशीच ह्या गोळेवाडीच्या बंडखोर गोळ्यांची सून स्वारीसमयीं हस्तगत झाली असतां 'बाईस लुगडें व चोळी नेसऊन मोहरांनीं ओटी भरवून बरोबर जासुद देऊन घरीं पोंचती करविली. आणि तिला अटकाव करून पकडणाऱ्या ब्राह्मण सुभेदारास काशीस हद्दपार करून घालवून दिलें. ह्या गोळेवाडीवरील स्वारीचा शक १५७५ विजयसंवत्सर हा आहे. शेडगांवबखर पृ. २२.

शेडगांवकरबखरींतील नवीन तिसरा कालयुक्त प्रसंग म्हणजे, शिवाजीनें आपले चुलते जे शरफजी राजे भोसले त्यांचे वंशजापैकीं, बाबाजी राजे भोंसले यांस सैन्य घेऊन येण्याबद्दल पाठविलेलें गुप्त पत्र हा होय. ह्या पत्राची मिती शके १५७९ भाद्रपद शुा १५ शनिवार ही आहे. अफजलखान मोठ्या फौजेनिशी आपल्यावर चाल करून येत आहे, असें शिवाजीस कळल्यानंतर शिवाजीनेंहि आपले सैन्य जमविण्यास सुरुवात केली. आणि तेव्हां हें पत्र व खर्चाकरतां दोन हजार रुपये देऊन, भीमातीरीं जिंतीस सदर बाबाजी राजे यांकडे जासूद रवाना केला. पत्राप्रमाणें पांच हजार स्वारांसह बाबाजी राजे आले. शिवाजीची त्यांची भेट सातारा मुक्कामीं होऊन बाबाजींस, तूर्त वर्धनगडीं राहावें व ऐन वेळीं महाबळेश्वरचे बाजूस घाटमाथा धरून असावें, असे सांगून शिवाजी रायगडास गेला. अशी हकीकत सदर बखरीच्या पृ. २५ वर आहे. इतर कोणत्याही बखरींत ती नाहीं. शिवाय, अफजलवधप्रसंग घडला शके १५८१ मध्यें आणि त्याकरतां सैन्याची जमवाजमव ह्या पत्रावरून १५७९ शकात म्हणजे दोन वर्षे पूर्वींच शिवाजीनें केली असें मानावें लागतें. पण तें तितकें संभवनीय वाटत नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, प्रत्यक्ष अफजलवधानंतर त्याच्या समुद्राएवढ्या सैन्याची शिवाजीकडील सैन्यानें जी लूटमार केली, त्यांत ह्या भोसलेघरच्या व मुद्दाम बोलावून आणलेल्या बाबाजी राजांच्या कामगिरीचा नुसता उल्लेखहि कोठें नाहीं. अफजलखानाहि विजापुराहून दोन वर्षे आधीं निघाल्याचें दिसत नाहीं. मावळच्या देशमुखांस अफजलखानांस सामील होण्याबद्दल अदिलशहाकडून जीं फर्मानें रवाना झालीं तीं शके १५८१ च्या

वैशाखांतील आहेत. एकंदरींत ह्या प्रसंगाच्या ह्या पत्राबद्दलचा सदर ( स. १८५३ मधील ) बखरींतलाच तेवढा उल्लेख पूर्ण विश्वासाचा मानतां येत नाहीं.

ह्या बखरींतील आणखी एक नवा प्रसंग, शिवाजीनें सातारा घेतल्याचा पृ. ३६ वर आला आहे. शके १५८० विकारी भाद्रपद शु० १५ शनवारीं शिवाजीनें सातारा घेतला व तेव्हांपासून ह्या महत्वाच्या प्रसंगाच्या स्मरणार्थ दर शनवारीं चौघडा झडण्याचाहि प्रघात सुरू झाला, असें सदर बखरींत म्हटलें आहे. १५८० शकास विकारी संवत्सर येत नसून विलंबी संवत्सर येतो. एवढा बदल मान्य केला म्हणजे तीथिवार वगैरे जमतें. ९१ कलमी बखरकाराच्या मतें अबदुलाखान मारला त्याउपर, तेच समईं येऊन सातारा, व चंदनवंदन वगैरे कुल गड शिवाजीनें घेतले ( कलम ३६ ) म्हणजे १५८१ शकानंतर सातारा घेतला असें ठरतें. म. सा. छोट्या बखरीवरून रायबागिणीशी उमरखेडचें युद्ध ( श. १५८२ ) झाल्यानंतर व मिरा डोंगर धरून घाट बंद ( श. १५८४ ) केल्यानंतर ( पृ. २६ ) सातारा व चंदन वगैरे गड शिवाजीनें घेतले, असें ठरतें. शिवप्रतापांत सातारा घेतल्याचा उल्लेखच नाहीं. सभासद व चित्रगुप्तकृत बखरींत पन्हाळा घेतल्यानंतर ( म्ह० श. १५९४ नंतर ) सातारा घेतला ( पृ. ७७ व ९३ ) असें आहे. ह्या निरनिराळ्या बखरींतील सातारा घेतल्याच्या उल्लेखांवरून, शिवकालाशीं जी बखर जितकी जवळ तितकी ती कशी कमी चूकीची असते, हें सहज ध्यानांत येतें. जेधे शकावलींत प्रथम सातारा घेतल्याचा उल्लेख श. १५९५ श्रावण व. ९ रविवार असा आहे. सातारा घेतल्याचा हाच शक डफचे इतिहासांतहि आहे. तात्पर्य, श. १५८० त सातारा घेतला हें शेडगांवकर बखरींतील म्हणणें बरोबर नाहीं. आणि त्याबरोबरच चौघड्याचा प्रघातहि तेव्हांचा असणें शक्य नाहीं. हा प्रघात शाहुकालीनच असावा. पण तेंहि अद्याप अनिश्चितच आहे. कारण, शाहूचा राज्याभिषेक श. १६२९ माघ शुक्लपक्षीं शनिवारीं; पण कोणच्या मितीस झाला हें ठरलें नाहीं, जी मिती दिली आहे त्या मितीस शनवार येत नाहीं. ह्या चौघड्यासंबंधीं भा. इ. सं. मंडळाच्या श. १८३८ च्या इतिवृत्तांत कै. सं. पटवर्धनांनीं लिहिलेला लेखहि ह्या शेडगांवकर बखरीवरच अवलंबून लिहिला असल्यामुळें चुकला आहे.

बखरी वगैरेंतील प्रसंगांसंबंधानें येथवर केलेल्या विवेचनावरून सामान्यतः एवढें कबूल करणें प्राप्त आहे कीं, हे बखरग्रंथ एकेकटे अथवा सर्व मिळूनहि कालाचे बाबतींत पूर्णपणें निर्णायक मत देण्यास निरुपयोगी आहेत. ऐतिहासिक प्रसंग म्हणजे विशिष्ट स्थल, विशिष्ट काल व विशिष्ट व्यक्तीचें विशिष्ट आचरण. ह्या चतुष्टयापैकीं काल दृष्ट्या बखरींचें हें असें स्वरूप असल्यामुळें

व्यक्ति व स्थल ह्यादि बाबतींत बखरींचे उल्लेख एकवाक्यतेचे नाहींत. आणि ह्याचा परिणाम, इतिहासाचा मुख्य उपयोग जो अमुक कार्य कां घडलें हें सांगण्याचा, तो ह्या बखरींपासून फार दुर्मिळ झाला आहे. येथेंच असा एक प्रश्न सहज सुचतो कीं, बखरींतून कालदर्शित प्रसंग थोडे व चुकीचे कां आणि कालाशिवाय सुटे प्रसंग तरी इतके पुष्कळ कां व कसे ? ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यास सुट्या प्रसंगांचेंहि बखरवार वर्गीकरण व एकीकरण होऊन विवेचन होणें अवश्य आहे. प्रस्तुत कालदर्शित प्रसंगांपुरतेंच पहावयाचें असल्यामुळें त्या प्रसंगांचें वरीलप्रमाणें विवेचन केलें आहे. प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें ह्या प्रसंगाच्या कालाचें तूलनात्मक निरीक्षण स्पष्टपणें करतां यावें म्हणून पुढील तक्ते देऊन आणि 'प्रगतीस अडथळ्याची आवश्यकता' ह्या न्यायानें नव्या व खऱ्या शिवजन्मतिथीवरील आक्षेपकांनीं सत्यनिर्णयार्थ घेत-लेले आक्षेप, हें ह्या निबंधाचें कारण असल्यामुळें प्रांजलपणें त्यांचे आभार मानून हा निबंध संपवितों.

---

# मालोजी व शहाजीबद्दलचे कालासह दिलेले बखरींतील प्रसंग

| प्रसंग | मल्हाररामराव बखर | शिवदिग्विजय बखर | शेडगांवकर बखर |
|---|---|---|---|
| मालोजी जन्म | १४७२ साधारण | | १४७४ परिधावी |
| विठोजी जन्म | १४७५ | | |
| मालोजीस सरदारी | १४९९ | १५२१ विलंबी | |
| मालोजी व विठोजी निजामाकडून वेरुळास गेले | | | १५१६ जय |
| मालोजीस द्रव्यलाभ | | | १५१६जय आश्वीन शु. ८ मंगळवार |
| —स श्रीशंभुस्मरण | | | १५२१ विकारी |
| शिंगणापूरचें तळें बांधिलें | | | १५२१ ,, |
| तळ्यास ताल बांधिली. | | | १५२२ शार्वरी |
| मालोजीस देवी प्रसन्न | १५२५ विजय माघ शु. १५ भानु० | १५१५ विजय माघ १५ भानु० | |
| मालोजीस मनसबदार होतो | १५२५ शुभकृत चैत्र व. ५ | १५२५ चैत्र व. ५ | |
| मालोजी मृत्यु | | | १५४२ रौद्र |
| विठोजी मृत्यु | | | १५४५ रुधिरोद्गार |
| शहाजी जन्म | १५१६ जय | १५१६ चैत्र शु. ५ इंदुवार | १५१६ |
| जिजाई जन्म | १५१८ | | |
| रंगपंचमी समारंभ | १५२१ विकारी | | १५२५ |
| मालोजीस देवी प्रसन्न | | | |
| शहाजीजिजाई लग्न | १५२६ | | १५२७ विश्वावसु, मार्ग. शु० ५ |
| —विजापुरीं गमन | १५४८ | १५४८ | १५४८ क्षय |
| — ,, येतो | | | १५५२ प्रमोद |
| — ,, ,, | | | १५९० कीलक |
| — ,, वजिरी | १५४१ | | १५४९ प्रभव |

| | | | |
|---|---|---|---|
| शहाजीचें २ रें लग्न | १५५० | १५४९ आनंद वैशाख विजापुरीं | १५६० बहुधान्य चंदावर येथें |
| –सविजापूरचें हुकूम पत्र | | १५८६ | १५६९ |
| व्यंकोजी जन्म | | १५५३ कालयुक्ताक्षी | |
| शहाजी पुण्यास येतो | | | १५८९ |
| शहाजी मृत्यु× | १५८३ प्लव माघ शु. ५ | | |
| शरीफजी जन्म | | १५१९ | १५१७ मन्मथ |
| शरीफजी लग्न | | | १५२८ पराभव |
| संभाजी जन्म | | १५४५ | |
| संभाजी मृत्यु | | | १५३६ आंनद |

शिवाजीप्रताप बखरींत मालोजीशहाजीबद्दल १--६० पृष्ठें मजकूर आहे. पण त्यांत शक सन वगैरे कोठेंच नाहीं. नुसते, ( मालोजी ) दिपवाळी झाल्यावरी परतून आपले चाकरीवरी गेले; दुसरे सालीं चैत्र शुक्ल प्रतिपदेस घरीं जावयास सणाकरितां निरोप मागितला; दिडा वर्षांनीं एक महिन्याची रजा घेतली; पौर्णिमा कुलधर्माचा दिवस; शहाजीजिजाईलग्न ज्येष्ठ शु० १०स जालें; शहाजीस २५ वर्षांचें वयांत संभाजीराजे जाले; असे उल्लेख आले आहेत. अर्थात् ते शकावांचून असल्यामुळें नसल्यासारखेच झाले आहेत. फार तर, अन्य ग्रंथांतील उल्लेखांचा पडताळा पाहण्यास कदाचित् उपयोगी पडतील.

मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरींतही मालोजीशहाजीबद्दल १४-१५ पानें हकीकत दिली आहे. ह्या बखरींत शिवाजीप्रतापाप्रमाणें तितके कालाचे उल्लेख नसले तरी, आहेत जे दोनतीन, तेहि शकाविरहितच आहेत. उ.–माघ शु. १५ दिवशीं देवी प्रसन्न झाली (पृ. ५) वगैरे. बहुतेक सर्व बखरीं वगैरेंतून तुळापूरचें सूर्यग्रहण आलेलें आहे. तसें ह्याहि बखरींत तें आहे; पण त्याचा १५६५ हा शक हस्तदोषानें पडला आहे. इतरत्र १५५५ हा येतो व तोच बरोबर आहे.

× पंडितरावबखरींत शहाजी मृत्युशक १५७५ हा सांगितला आहे (पृ. २). छ. वं. बद्धयादींत १५८२ हा शहाजीमृत्यु शक दिला आहे. आणि शहाजी जन्म श. १५१५त झाला असें म्हटलें आहे.

---

## शिवाजीसंबंधीं कालनिर्देशासह असलेले बखरी वगैरेंतील

| प्रसंग | १ सभासद श. १६१९<br>२ चित्रगुप्त* १६८१ | ३ ९१ कलमी+ श. १७०२<br>८ म. सा. बखर श. १७३९ |
|---|---|---|
| १ शिवाजी जन्म | ... ... | १५४९ क्षय, वैशाख शु. ५ चंद्रवार |
| २ वेंकोजी जन्म | ... ... | ... ... |
| ३ शिवाजी विजापुराहून येतो | ... ... | ... ... |
| ४ दादोजी कोंडदेव मृत्यु | ... ... | ... ... |
| ५ शिवाजी लग्न | ... ... | ... ... |
| ६ —कार्यप्रारंभ | ... ... | ... ... |
| ७ —मोरेवध करतो | ... ... | ... ... |
| ८ —रायगड घेतो | ... ... | ... ... |
| ९ बाळाजी आवजीस चिटणीसी | ... ... | ... ... |
| १० शिवा० राजापूर वगैरे घेतो | ... ... | [ -१३ रवि.+ |
| ११ —अफजलवध करतो | ... ... | १५७४ विकृति, मार्ग. शु.- |
| १२ —शास्ताखान | ... ... | १५७९ मन्मथ भाद्रपद + आश्विन शु० १० + |
| १३ अनाजी मलकरेयास मजमू | ... ... | |
| १४ संभाजी जन्म | ... ... | ... ... |
| १५ संभाजी काउजीशी युद्ध | ... ... | १५७९ मन्मथ वैशाख व. १० सोम.+ |
| १६ राजाराम जन्म | ... ... | ... ... |
| १७ मोरो० पिंगळ्यास-पेशवाई | ... ... | ... ... |
| १८ शिवाजी आग्र्याहून परत | ... ... | ... ... |
| १९ देवीचें पुढील भविष्य | ... ... | ... ... |
| २० शिवाजी चंदी घेतो | ... ... | ... ... |
| २१ —चें वेंकोजीस पत्र | ... ... | ... ... |
| २२ गागाभट्ट साताऱ्यास येतो | ... ... | |
| २३ शिवराज्याभिषेक | १५९६ जेष्ठ शु॥ १३,<br>*आनंद ज्येष्ठ शु १३ मंद० | १५९६ आनंद चैत्र शु॥ १ शुक्र०+ |
| २४ जिजाबाई मृत्यु | ... ... | ... ... |
| २५ संभाजी करवीरी रवाना | ... ... | ... ... |
| २६ राजाराम लग्न | [रवि. दोन प्रहरा. चित्रगुप्त? | +[ म. सा. बखर ? |
| २७ शिवाजी मृत्यु | १६०२ रौद्र, चैत्र शु॥ १५- | १६०२ रौद्र चैत्र १५ दोप्रहरा+ |

# प्रसंग-तक्ता १. श. १६१९ ते १७४० (स. १६९७–१८१८).

| ४ खं. ४ श. १७०४<br>५ प्रभानवली† १७२०<br>६ धडफळे+ १७२९ | ७ मल्हाररामराव कृत सप्त० चरित्र. श. १७३२ | ९ शिवादिग्विजय श. १७४ |
|---|---|---|
| खं.?, १५४९ विभव–† | १५४९ प्रभव, वैशाख शु. २ | १५४९ प्रभव, वैशा |
| प्रभव वैशाख शु. + | गुरुवार. | शु० १ गुरु श्लोव |
| ... ... | ... ... | १५५३ कालयुक्ताक्षी |
| ... ... | १५५९ | ... ... |
| १५६५ + | ... ... | १५६२ विक्रम |
| ... ... | १५५९ | १५६२ विक्रम, वै. शु० ५ |
| १५६५ सुभानु + | १५६३ | ... ... |
| ... ... | १५७७ जावली फत्ते. | १५६४ |
| ... ... | १५६८ | ... ... |
| ... ... | १५७० | ... ... |
| ... ... | ... ... | १५७० सर्वधारी |
| ... ... | १५८१ विकारी मार्ग. शु. ७ | १५८१ |
| १५७६ + ( जयसिंग तह ) | ... ... | १५७८ (१५८४?) |
| ... ... | ... ... | [मंगळ. स्वाती नक्षत्र. श्लो |
| ... ... | १५७९ हेमलंबी ज्ये. शु. १२ | १५७९ हेम. ज्ये. शु. १ |
| ... ... | ... ... | [आश्लेषा नक्षत्र, मध्या |
| ... ... | १५८३ प्लव चैत्र शु. ९ | १५८३ प्लव, चैत्र. शु. ९ रा |
| ... ... | ... ... | १५८४ चैत्र व. १० |
| ... ... | १५८८ पराभव मार्ग. व. १० | ... ... |
| ... ... | १५९५ प्रमादी चै बहुल १३ | ... ... |
| ... ... | ( भौमवार) | १५९५ प्रमाथी |
| ... ... | ... ... | १५९५ (?) माघ शु. १२ |
| ... ... | ... ... | १५९५ |
| १५९५ आनंद ज्येष्ठ शु॥ १३ | १५९६ आनंद ज्ये. शु. १३ | १५९६ ज्येष्ठ शु० ०५ |
| १५९६ ज्येष्ठ शु॥ १३† | मंदावसर | |
| १५९६ आनंद + | | |
| ... ... | १५९६ ज्येष्ठ व. ९ | ... ... |
| ... ... | ... ... | १५९९ |
| ... ... | १६०१ | |
| [दोनप्रहरीं | [दोनप्रहरीं उत्तरायण | [श्लोक. |
| १६०२ रौद्र चैत्र शु. १५ | १६०२ रौद्र चैत्र शु. १५ | १६०२ चैत्र शु० १५ शन |

## शिवप्रसंग–तक्ता २

| प्रसंग. | १० नागपूरकर भोंसले, श. १७४४ | ११ छ. वं. बद्ध यादी श. १७४४ | १२ शिवप्रताप श. १७५१ |
|---|---|---|---|
| शिवजन्म[१] | १५४९ प्रभव वैशाख शु. २ गुरु. | १५४९ वैशाख शु. ५ | १५४९ रक्ताक्षी |
| दादोजी कोंडदेव मृत्यु | | | |
| शिव कार्यारंभ | | | |
| बाळाजी आवजीस चिटणीसी | | | १५७० माघ |
| २८ विजयदुर्ग बांधला | | | |
| शहाजी मृत्यु | | १५८२ | |
| अफजलवध[२] | | | १५८१ |
| शिवराज्याभिषेक | १५९६ आनंद ज्ये. शु. १३ | १५९६ ज्येष्ठ शु. १३ | १५९६ आनंद ज्ये. शु. १३ गुरु. |
| ,, | | | |
| जिजाई मृत्यु | | १५९६ | |
| २९ श्री रामदासांस इनाम | | | |
| शिवाजी मृत्यु | १६०२ रौद्र चैत्र शु. १५ रवि. | १६०२ | |

१ ' रायरीच्या बखरींत शिवजन्म श. १५४८ क्षय वैशाख शु. ५ चंद्रवार, असा आहे. राजवाडे खं. ४ पृ. ४१. प्रस्तावना.

२ रायरी बखरींत हा अफजलवध श. १५७२ त झाल्याचें दिलें आहे. खं. ४ पृ. ६७. प्रस्तावना.

## शके १७४४ ते १७७० ( स. १८२२—१८४८ ).

| १३ रामदास शकावली श. १७५३ | १४ विजयदुर्ग श. १७५७ | १५ पंतप्रतिनिधिबखर श. १७६६ | १६ पंडितराव बखर श. १७७० |
| --- | --- | --- | --- |
| १५४९ प्रभव | १५४९ प्रभव बहुल २ | १५४९ प्रभव वैशाख शु. १५ इंदुवासेर. | १५४९ प्रभव |
| | | १५५६ | |
| १५६२ | | | |
| | १५७५ | | |
| | | | १५७५ |
| १५९६ आनंद | | १५९६ आनंद, ज्ये० शु. १३ सं. श्लो. | १५९६ आनंद ज्ये. शु० ६ |
| | | | १५८३ |
| १६०० कालयुक्त | | | |
| १६०२ | | १६०२ चैत्र शु. १५ | १६०२ चैत्र शु. १५ तिसरा प्रहरी. |

# शिवप्रसंग-तक्ता ३

| प्रसंग | १७ शेडगांवकर बखर श. १७७६ ( स. १८५४ ) |
|---|---|
| शिवाजी जन्म | १५४९ प्रभव वैशाख शु. ३, शनवार, रोहिणी नक्षत्र, कर्क लग्न. |
| शिवकार्यारंभ | १५६६ तारण |
| ३० दादोजी कोंडदेव बेंगरुळास जातो | १५७० सर्वधारी |
| ३१ शिवाजीस समर्थानुग्रह | १५७१ विरोध, वैशाख शु. ९ |
| ३२—वर विजापुराहून स्वारी | १५७४ नंदन |
| —ची जावलीवर मोहीम | १५७५ विजय |
| —सईबाई लग्न | ,, |
| ३३—ची गोळेवाडी ( प्रांत वांई ) वर स्वारी | ,, |
| ३४ रायगडीं देवीची स्थापना | ,, |
| ३५ विजापुर--दरबारांत अफजल शिवाजीस पकडण्याचा विडा उचलतो. | १५७९ हेमलंबी |
| ३६ शिवाजी सातारा मुकाम | ,, |
| ३७—चें बाबाजी राजे भोसले यांस गुप्त पत्र | १५७९ भाद्रपद शु. १५ शनवार |
| संभाजी जन्म | १५७९ ज्येष्ठ शु. १० |
| राजाराम जन्म | १५८० विलंबी |
| ३८ शिवाजी सातारा घेतो | १५८० श्रावण शु. ५ शनि० |
| शास्ताखान येतो | १५८४ शुभकृत |
| ३९ पुण्यास टंकसाळ | १५८६ |
| ४० जयसिंग येतो | १५८७ |
| शिवाजीचें आग्र्यास जाणें व येणें | १५८८ |
| ४१ संभाजी लग्न | १५९१ सौम्य |
| ४२ येसूबाई व शिवाजी भेट | १५९५ |

| | |
|---|---|
| ४३ हंसाजी मोहिते हंबिरराव व सर- नौबत होतो. | १५९५ विजय |
| गागाभट्ट येतो, राज्याभिषेक | १५९६ आनंद; ज्येष्ठ शु. १३ |
| जिजाबाई मृत्यु | १५९६ कार्तीक व. ११ |
| ४४ शिवाजी भागानगरास जातो | १५९७ राक्षस |
| ४५ पन्हाळ्यावर स्वारी | १५९९ पिंगल |
| —राजाराम लग्न | १६०० कालयुक्त |
| शिवाजीचें व्यकोजीस पत्र | १६०१ |
| शिवाजी मृत्यु | १६०२ चैत्र शु. १५ |

---

# २८ शिवशाहींतील पंचांगशुद्धि

( द. वि. आपटे. )

शिवशाहींत भाषाशुद्धीसाठीं 'राजव्यवहारकोश' तयार करण्यांत आला. त्याचप्रमाणें पंचांगशुद्धीसाठीं 'करणकौस्तुभ' नावाचा ग्रंथ मुद्दाम कृष्णज्योतिष्यानें रचला; ही गोष्ट कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं भारतीयज्योतिःशास्त्र या ग्रंथांत (पृ. २९०।२९१) प्रथम मराठी वाचकांपुढे मांडली. तेव्हांपासून गेल्या तीस वर्षांत हा ग्रंथ मिळवून प्रकाशित करण्याची व्यवस्था झाली नाहीं; याचें कारण, सदर करणग्रंथ 'तंत्ररत्न' नांवाच्या ह्याच ग्रंथकाराच्या मोठ्या पुस्तकाचा संक्षेप आहे; व या मोठ्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत कै० दीक्षितांच्या किंवा इतर कोणाच्याहि पाहण्यांत अद्याप आलेली नाहीं. यामुळें करणकौस्तुभांतील शंकांचें निरसन करून घेण्याचें उत्तम साधन अज्ञात स्थितींत आहे. हें मराठी वाचकांपुढे मांडून त्यांना 'तंत्ररत्ना'ची प्रत मिळविण्याची विनंति करण्यासाठीं मी येथें 'करणकौस्तुभा' संबंधीं कांहीं माहिती नमूद करून ठेवतों.

या ग्रंथांत चौदा भाग ऊर्फ अधिकार आहेत. त्यांचीं नांवें अशीं:—

| | |
|---|---|
| १ मध्यमग्रहसाधन. | २ सूर्यचंद्रस्पष्टीकरण. |
| ३ पंचतारास्पष्टीकरण. | ४ त्रिप्रश्न. |
| ५ चंद्रग्रहण. | ६ सूर्यग्रहण. |
| ७ तिथिपत्रावरून ग्रहणसाधन. | |
| ८ उदयास्त. | ९ ग्रहच्छाया. |

१० चंद्रशृंगोन्नति. ११ ग्रहयुति.
१२ नक्षत्रछाया. १३ पात.
१४ पातसंभवासंभवलक्षण.

यावरून याची मांडणी ठोकळ मानानें ग्रहलाघवी पद्धतीची आहे हें दिसून येईल. प्रारंभीं

'वन्दे केशवदैवज्ञसार्वभौमपदांबुजम् ।'

असें नमन केलें आहे. यावरून कृष्ण ज्योतिषी ग्रहलाघवकाराच्या पित्याच्या म्हणजे केशवाच्या ग्रंथाविषयीं आदरभाव बाळगणारा दिसतो. परंतु ग्रहलाघव ग्रंथ शके १४४२ मध्यें रचला गेल्यानंतर, शें सवाशें वर्षांत त्याचा दृक्प्रत्यय येत नाहीं, अशी तक्रार सुरू झाली. पण ही तक्रार दूर होण्यासाठीं नवीन ग्रंथरचना करणारा नामांकित ज्योतिषी स्वयंस्फूर्तीनें पुढें आल्याचें दिसत नाहीं. तथापि शिवाजी महाराजांच्या दरबारांत विद्यावृद्धीकडे लक्ष देणारे लोक असल्यामुळें त्यांनीं असा ग्रंथ रचण्याचें काम कृष्णज्योतिष्यास सांगितल्यावरून त्यानें हा ग्रंथ रचला असें

प्रकुरु तत्करणं ग्रहसिद्धये । सुगमदृग्गणितैक्यविधायि यत् ।
इति नृपेंद्र शिवाभिधनोदितः ॥ प्रकुरुते कृतिकृष्ण विधिज्ञराट् ॥ $\frac{1}{3}$

या श्लोकावरून दिसतें.

यांत गणिताचें प्रारंभीचे वर्ष १५७५ धरलें असून क्षेपक त्या सालच्या मेषसंक्रमणाच्या वेळचे दिले आहेत. पण इतरत्र न दिसणारी गोष्ट अशी कीं, यांत सप्तर्षींचे क्षेपक ६ रा. ११ अं. ३० क. दिले असून त्यांची वार्षिक गति ८ कला म्हणजे १०० वर्षांत एक नक्षत्र अशी सांगितली आहे. सप्तर्षि-कालाची गणना काश्मीराखेरीज इतर प्रदेशांत असल्याचें दिसत नाहीं. असें असून महाराष्ट्रांतील या ज्योतिष्यानें ही कालगणना कां सांगितली तें समजत नाहीं.

ग्रहलाघवकारांनीं ज्याचापावांचून गणित करण्याचा पाया घालून आमच्या ज्योतिष्यांना शास्त्राच्या उपपत्तीकडे दुर्लक्ष करण्याची सोय करून ठेवली, असा जो आरोप गणेश दैवज्ञावर केरोपंतांनीं आणला होता तो या ग्रंथाच्या बाबतींत लागू पडत नाहीं. कारण यांत ज्याचापाचें सहाय गणितास घेतलें आहे, आणि ज्यापिंड १० अंशाचा मानून त्याचा उपयोग बऱ्याच ठिकाणीं केला आहे.

ग्रहलाघवकारानें ११ वर्षांचें चक्र मानून अहर्गण ४०१६ पेक्षां वाढूं न देण्याची व्यवस्था केली आहे; करणकौस्तुभकारानें १ वर्षाचेंच चक्र योजल्या-

मुळें अहर्गण ३६५ पेक्षां वाढणार नाहींत व अहर्गणाचें गणित करण्यास श्रम कमी पडेल हे खरें. पण वर्षगति काढण्यास अधिक खटाटोप पडेल असें वाटतें.

यांत वर्षमान सांप्रतच्या सूर्यसिद्धांतानुसार म्हणजे ३६५ दि. १५ घ. ३१ प. ३१ वि. २४ प्र. वि. आहे. शून्यायनांशाचें वर्ष शके ४५० धरलें असून वर्षगति ६० विकला धरली आहे. नक्षत्रभोग ग्रहलाघवाप्रमाणें आहेत; मात्र भरणी ( २० अं. ) व आश्लेषा (१०८ अं.) यांच्या भोगांत १ अंशाचा व मघाच्या ( १२७ अं. ) भोगांत २ अंशाचा फरक आहे.

कृष्णदैवज्ञानें ग्रंथाच्या शेवटीं स्वतःची माहिती सांगतांना प्रारंभीं कश्यप ऋषिचें महत्व वर्णन करून अशी हकीकत दिली आहेः—

तदन्वये पावन एव तत्र वंशावतंसोऽभवदुन्नतांसः ।
श्रीमन्महाज्योतिषि विद्वदग्रयो नाम्ना महादेव इति प्रसिद्धः ॥
तज्जाया किमु जान्हवी विजयते बर्वाई नाम्नी सदा ।
तस्यां तज्जनितः सुपुण्यनिचयः श्रीरंगनाथानुजः ॥
कृष्णः कौंकणसत्तटाकनगरे देशस्थवर्यो वसन्
तेनायं करणेषु कौस्तुभ इति ग्रंथः कृतो धीमता ॥

यावरून कृष्ण दैवज्ञाच्या बापाचें नांव महादेव, आईचें बर्वाई, वडिल भावाचें रंगनाथ, असें असून हा देशस्थ ब्राह्मण ' सह्याद्रिसंनिध मावळांत राहणारा ' होता असा कै. दीक्षितांचा अभिप्राय आहे. पण ' कौंकणसत्तटाकनगरे ' याचा अर्थ अद्याप मनाजोगा लागला नाहीं असें मला वाटतें.

---

# २९ शिवाजीचा जन्म

( कै. रा. वासुदेवशास्त्री खरे, मिरज )

'इकडे बंडखोर लोदी गोंडवणांत लपला होता तिकडे त्याचा निभाव लागेना; सबब तो बागलाणांत शिरून निजामशाहीच्या सरहद्दीवर सह्याद्रीच्या डोंगराळ मुलखांत आश्रय धरून राहिला. मोंगलांस जरबेंत आणण्याकरितां निजामशाही सरकारास असलें खेंकटें बगलेंत मारावयास पाहिजेच होतें. त्या सरकारनें त्यास अभय देऊन त्याच्या बचावाची तजवीज केली. मोंगल फौजांनीं लोदीपर्यंत हात पोंचावा म्हणून जहांजहांत केली. परंतु तो स्वतः मोठा शूर होता व

त्याच्या बचावाकरितां निजामशाहीचा सरलष्कर शहाजी हा लढाई घेण्यास मागें पाय घेत नव्हता. त्यामुळें मोंगलांचा कांहींच इलाज चालेना. ही वार्ता ऐकून शहाजहान बादशहा खवळून गेला आणि ' कुठचा लोदी ! कुठचा शहाजी ! आणि कुठची निजामशाही ! एकदम सर्वांचा विध्वंस करितों ! ' अशा आवेशानें प्रचंड सेना घेऊन स्वतः दक्षिणेंत आला. तेव्हां निजामशाही राज्यावर मोठा प्रळय गुदरला. खुद्द बादशहाचीच मोहिमेवर देखरेख असल्यामुळें मोंगल फौजांत नवीन चैतन्य उत्पन्न झाल्यासारखें होऊन त्यानीं लोदींचें बंड मोडण्यासाठीं पराकाष्ठेची लगट केली. तेव्हां लोदी सह्याद्रीचीं डोंगराळ जंगलें सोडून विजापुराकडे पळाला. लोदीबरोबर त्याचा सोबती शहाजी ह्याचाही पिच्छा पुरविण्याचा मोंगल फौजेस प्रसंग आला; आणि आम्हांला वाटतें, याच प्रसंगांत शिवाजी महाराजांचा शिवनेरी येथें जन्म झाला.

जाधवराव बरोबर मोंगल फौज घेऊन शहाजीचा पाठलाग करूं लागला. शहाजीबरोबर जिजाऊ होती तिला शहाजीच्या स्वारीबरोबर धांवणे निभेना, सबब तिला शिवनेरीस जाऊन राहणे प्राप्त झालें. तेथेंच ती प्रसूत होऊन पुत्र झाला तो शिवाजी होय. याप्रमाणे प्रत्येक बखरींत मजकूर लिहिलेला असतो तो ठीकच आहे. तथापि शिवजन्माचा शक रायगड बखरींत १५४८ व इतर बखरींत १५४९ दिला आहे तो चुकला असून जेध्यांच्या शकावलींतला शक १५५१ हाच खरा असणें अधिक संभवतें असें वाटतें. शक १५४९ च्या वैशाख शु. २ ला सन १६२७ चा एप्रिल येतो व जेधे शकावलींतल्या शक १५५१ च्या फाल्गुन व॥ ३ सन १६३० चा मार्च येतो. दोहोंमध्यें साडे चौतीस महिन्यांचें अंतर पडतें. या दोन शकांत इतिहासाच्या ओघावरून कोणचा शक खरा असणें शक्य आहे? स. १६२७ त लढाई बालेघाटाकडे चालली होती; पश्चिमघाटाकडे तिचा संबंध नव्हता. स.१६३० त लढाईची धुमश्चक्री सह्याद्रीच्या लागत्यास सुरू होती, हें वर सांगितलेंच आहे. स. १६२७ त मोंगलांनीं शहाजीचा निकरानें पाठलाग करण्यास विशेष निमित्त नव्हतें. स. १६३० त लोदीच्या बंडाचा बींमोड करण्यासाठीं शहाजीचा झपाट्यानें पाठलाग करण्याचें काम मोंगल सरदारांस खुद्द बादशहाच्या हुकमानेंच करावयाचें होतें. त्यावरून शिवजन्माचा शक १५५१ हाच असणें अधिक संभवनीय दिसतें आणि या निबंधांत शिवाजीच्या वयाची गणना आम्हीं जागोजाग केली आहे ती १५५१ हाच शक खरा धरून केली आहे. '

( मालोजी शहाजी पृ. ११—१२ )

---

# ३० श्री शिवाजी महाराजांचें विद्यावृद्धीस उत्तेजन.

## गागाभट्टविरचितः शिवार्कोदयः

धरित्रीपुत्रीदृग्विहरणपवित्रीकरणकृत्
कटाक्षाणां पात्री मुनिमखविघात्री सपदि सा ।
भवित्री मच्चेतोभवनमलहंत्री दिविषदा—
मभीतेदात्रीयं दशवदनहंत्री प्रतिकृतिः ॥ १ ॥

श्रीमद्भोसलवंशभूषणमणि क्षोणीश शाहात्मज—
च्छत्राधीश शिवक्षितीशयशसः स्तंभो निखातोपरः
गागाभट्टमनीषिणाभिधरणिग्रंथः शिवार्कोदयो
येनाबद्धयशोध्वजेन सकलैवाश्वेति लोकत्रयी ॥ २ ॥

पूर्वोक्तयुक्त्या च निषेधतोपि सत्रा तथान्यार्थनिदर्शनाच्च ।
आर्त्विज्यमिष्टं खलु विप्रनिष्ठं भवेन्न वर्णत्रयगं कदाचित् ॥

श्रीभट्टनारायणवंशजंबुद्वीपोत्थ गागाभिधभट्टमेरोः ।
स्फुटे शिवार्कोदय नामभाज्यभूद्द्वादशाध्याय चतुर्थपादः ॥

प्रारम्भयत्न इह यः खलु कारिकाभि—
रद्धाप्रतिभ......विदूषणाय [ रद्धाप्रतिप्रतिभधामविदूषणाय ]।
दुःखं सतां तदसमाप्तिकृतं शिवेन
छत्राधिपेन सुविचिंत्य समापितः सः ॥

यत्तर्कपादे बऋ [ पादैर्बहु ] नाग्रहेण श्लोकैः कृतं वार्तिकमार्यवर्यैः ।
गागाभिधेनायमपूरि शेषः तस्याग्रथ [ श ] या छत्रपतेः शिवस्य ॥

तस्यानुरोधादिह वादिवर्णाधिक्ये चतुर्थाभ्र [ श्रम ] भंगदोषः।
गुणोस्तु विद्वत्कविकंठमास्तो दुष्टोपि पुण्योभ्रि [ ब्धि ] गत [प्र] वाहः ॥

इति श्री मन्नारायणभट्टसूरिसूनु श्री मद्रामकृष्णात्मज-
भट्ट दिनकरसुत गागाभट्टकृतः शिवार्कोदयः समाप्तः

श्रीशिवाजी महाराजांचे राज्यारोहणप्रसंगीं अभिषेकसंस्काराचे कार्यांत प्रामुख्यानें पुढाकार घेतलेले सकलवेदशास्त्रपारंगत काशीस्थ पंडित विश्वेश्वरभट्ट अथवा गागाभट्ट ह्यांनीं ' शिवार्कोदय ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. ह्या ग्रंथा-संबंधीं माहिती देणारे श्लोक ह्याच 'शिवार्कोदय' ग्रंथांतून घेतलेले असून ते वर

निर्दिष्ट केले आहेत. प्रस्तुत ग्रंथाची प्रत अलवार संस्थानच्या महाराजांचे हस्तलिखित–ग्रंथसंग्रहालयांत आहे.

आपल्या मीमांसा–शास्त्राचे दोन भाग आहेत; पूर्व मीमांसा व उत्तर मीमांसा. पूर्व मीमांसा जैमिनीनिर्मित असून ती यज्ञयागादि कर्ममार्ग-प्रतिपादनात्मक आहे. उत्तर मीमांसा व्यासप्रणीत असून वेदांतपर आहे. ह्या जैमिनीकृत पूर्वमीमांसासूत्रावर शबर स्वामींचें गद्यात्मक भाष्य असून त्या भाष्यावर श्रीकुमारिल भट्टांच्या टीका आहेत. पहिल्या अध्यायाचे पहिले पादावर केलेली पद्यात्मक टीका 'श्लोकवार्तिक' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. दुसरी टीका, 'वार्तिक' म्हणून पहिले एक ते तीन अध्यायांवर आहे. ह्याशिवाय त्यांचीच एक तिसरी 'टुप्टीका' म्हणून आहे. श्लोकवार्तिकटीका पुरी करण्यापूर्वीच श्री कुमारिलभट्ट दिवंगत झाले; ही गोष्ट विद्वानांच्या मोठ्या दुर्भाग्याचीच होय, असें गागाभट्ट वरील श्लोकांत म्हणतात. ह्या श्लोकवार्तिक टीकेचें, भोंसलवंशभूषण, शहाजी महाराज यांचे आत्मज, श्री छत्राधीश शिवाजीमहाराज यांनीं अतीशय आग्रहानें केलेल्या विनंतीस, आश्रमभंगदोषाचें पातकहि पत्करून, मान देऊन शिवार्कोदय नामक श्लोकबद्ध टीका करून पूरीकरण केलें; असें गागांनीं दिलेल्या वरील श्लोकांतील माहितीवरून स्पष्ट होत आहे. श्रीहर्षादि मोठमोठ्या राजांनीं व सार्वभौमांनीं ग्रंथकारांस राजाश्रय देऊन ग्रंथनिर्मिती केल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. परंतु ह्या राजांनीं आश्रय देऊन ग्रंथ करविले व शिवछत्रपतींनीं उत्तेजन देऊन ग्रंथरचना करविली, ह्यांमध्यें एक मोठा विशेष आहे. हर्षादि राजांनीं आपल्या आवडत्या विषयावर नाट्यकादंबऱ्यादि ग्रंथ निर्माण करविले व वाङ्मयांत भर घातली. छत्रपतींची तशी गोष्ट नाहीं. त्यांस हिंदवी स्वराज्य स्थापून 'हैंदवधर्म' म्हणजे महाराष्ट्रधर्म याचें रक्षण करावयाचें होतें व हेंच त्यांचें ध्येय होतें; ह्या ध्येयास अनुसरून त्यांनीं राजव्यवहारकोश, करणकौस्तुभ, शिवभारत व हा शिवार्कोदय हे ग्रंथ तयार करविले. स्वराज्याचे मुख्य जविन जी स्वभाषा तिचें शुद्धीकरण पंडित रघुनाथ हणमंते यांजकरवीं 'राजव्यवहारकोश' बनवून केलें. आचारधर्मपालनाचें मुख्य अंग जें पंचांग त्याच्या शुद्धीसाठीं कृष्ण ज्योतिषी यांजकडून 'करणग्रंथ' करविला; व सर्व लोक आचारधर्मकर्मक्षम व्हावे म्हणून हा 'शिवार्कोदय' ग्रंथ गागाभट्टांचेकडून करविला. ह्यावरून शिवाजीमहाराजांनीं केवल वाङ्मय सजविण्यासाठीं ग्रंथास उत्तेजन न देतां राज्याच्या बळकटीचें हें एक मोठें अंग आहे, ह्या विशिष्ट धोरणानें ग्रंथ

---

(१) पहा Catalogue of The Sanskrit Manuscripts in the Library of His Highness The Maharaja of Ulwar by Peter Peterson M. A. D. Sc. Bombay 1892 PP. ३७–३८.

करविले, हें ह्या चार ग्रंथांतील अंतर्गत पुराव्यावरून स्पष्ट होत आहे.

छत्रपतींनीं हे जे ग्रंथ तयार करविले ते सर्व संस्कृत गीर्वाण भाषेंतच आहेत. ह्यावरून छत्रपतींचा संस्कृत भाषेवरील आदर व प्रेम चांगलें व्यक्त होतें. त्यांनीं आपले स्वतःचें चरित्र परमानंद कवीकडून करवून त्यास 'शिवभारत' हे नाव देऊन तो ग्रंथहि संस्कृतांतच करविला, ही गोष्टहि वरील विधानासच पुष्टि देत आहे.

प्रारंभीं दिलेल्या श्लोकांत ' छत्राधीश शिव ' ' शिवेन छत्राधिपेन ' ' छत्रपतेः शिवस्य ' अशी शब्दरचना आहे. यावरून हा शिवार्कोदय ग्रंथ राज्यारोहणानंतर लिहिला गेला हे उघड आहे.

येथेंच संशोधकांच्या करतां एक नवीन गोष्ट नजरेस आलेली नमूद करणें जरूर आहे. गागाभट्टांनीं शके १६०३ मध्यें म्ह० स. १६८१ त ' समयनय ' नांवाचा नीतिपर ग्रंथ संभाजीकरतां तयार केला; असें जर्मन संस्कृतग्रंथसूचीकार आफ्रेट आपल्या सूचीच्या दुसऱ्या भागाच्या १३९ पृ. वर म्हणतो. ह्या ग्रंथाची प्रत इटालींतील फ्लारेन्स येथील हस्तलेखसंग्रहांत आहे. इतिहासप्रेमी संशोधकांनीं हा ग्रंथ मिळवण्याकरितां जरूर यत्न करावा. हा ग्रंथ छत्रपतींच्या निधनानंतर लवकरच लिहिला गेला असल्यामुळें व तो नीतिपर असून संभाजीराजांकरितां लिहिला असल्यामुळें उपलब्ध झाल्यास उभयतां पितापुत्रांच्या चारित्र्यावर बराच नवीन प्रकाश पडेल असें वाटतें.

स. म. दिवेकर.

---

(२) पहा. Catalogues Catalogorum by Theodor Aufrecht. Part II. Printed for The German Oriental Society Leipzig 1896, P. 139.

# ३१ शहाजी आदिलशाही

महजर ब तारीख २५ ××××× डी प्रांत पुणे बिहजूर [ हाजीर मजालसी ]

| | |
|---|---|
| साबाजी अनंत | ××××××× |
| गोंदजी विस्वनाथ ह-<br>वालदार पा मार | महमदजी सरनोबद ×××<br>खान मुकासाई मौजे<br>चामली पा मार |
| पदमाजी ने ...मजूमदार<br>पा मार | राघो पंडित नाजीर किले<br>पुरंधर |
| नीलकंठ राऊ नाइकवाडी<br>किले पुरंधर | नाइकवाडी ना कोट<br>को पुणे |
| मालोजी नरसिंगराऊ<br>व विठोजी सितोले देश-<br>मुख पा मार | बगोजी बाळाजी गणोजी<br>१ १ १<br>कृष्णाजी बांदल देसाई<br>पा हिरडसमावल |
| हैबतराऊ सालमकर देसाई<br>ता गुंजणमावल | सोमाजी पिनझाड ( ? ) सरदार<br>इकरार मोकदम मौजे निंबूत व<br>पांगारे पा मार |
| तिमाजी थोरात मौजे पिपल-<br>गाऊ पा मार नि नांगर | विठोजी सोनवणी मोकदम<br>मौजे राहु पा मार नि<br>नागर |
| लखमोजी मोकदम मौजे<br>लोणी कालभोर पा मार | |
| जाउजी मोकदम मौजे गराडे | |

सु सन सीत इसरेन अलफ कारणे महजर ऐसा जे राघोजी बिन पील पाटील सेंडकर मोकदम मौजे चांमली पा पुणे यामधे व हवजी बिन साउजी कामटे हरदो जणामधे मौजे मारचे मोकदमीचे बदल करकसा लागला इत्यादी

दुराईस मानीत नाही ऐसा जुलूम केला यावरी **शाहजी भोसले इदलशाई** यासी गोसमाल दिल्हा बराबर साहेब नामजाद घेऊन आले शहाजीस गोसमाल देऊन गणीमास सालपा घाटी कोंडिला हे खबर आपण ऐकोन हुजूर आलों इत्यादि.

शेवटीं " शके १५४७ सन १०३५ चे सालची महजराची नकल " अशा दोन ओळी आहेत.

---

# ३२ शिवकालीन जन्मपत्रिका

×××× ळिवाहन शके १६०२ रौद्र संवत्सरे ×××× ॥ माहा मांगल्ये चैत्रे मासि ॥ कृष्ण ×××× घटि १० पळें २४ बुधवासरे ××× ×× क्षत्रोघटि १७ पळें २०॥ चतुर्थ चरणे ॥ ××× ॥ अश्विनी माहानक्षत्रे सूर्यन ××× चक्रे ॥ नक्षत्रं ॥ हृदयेपतितं फळे ×××× वृश्चिकस्थे चंद्रे ॥ मेषस्थे सूर्ये यांण भागे ॥ घटि ३५ पळे २३ विष्टि करणे ॥ एवं विधे पंचां(ग) शुद्धौ तद्दिने दिवा घटि ७ पळे ३० वृषभलग्नेवहमाने शुभांशे ॥ लग्नाधिपे भृगौ ॥ रास्याधिपे भौमे ॥ अस्यां शुभग्रहावलौकिककल्याणवेलायां ॥ श्रीमद्गणपतिचरण भजनावाप्त माहाभाग्योदय राजमान्य राजश्री श्रीधरभट्ट ठकार यांची स्त्री बुधाई नासधिपति उभयकुळानंददाइनी रमाणियं प्रथमपुत्ररत्नं प्रासुत ॥ अस्याभिधानं अवकहडचक्राभिप्रायेण ॥ नेपूर्वकं इति प्रतिष्ठितं असौ देवद्विजकुळदेव्याः प्रसा-द्दाद्दि ॥ अथास्य × कृतं जन्म लिख्यते ॥ अस्य जन्ममासा चैत्रा ॥ जन्मतिथि तृतिया ॥ जन्मवासरा बुधा ॥ जन्मभं १७॥ जन्यरासी वृश्चिका ॥ अथ यात्रादौ वर्ज्यानि ॥ घाततिथि दसमी ॥ घातवासराः ॥ भृगुः ॥ घातनक्षत्रं ॥ रेवति ॥ घात चंद्र ७॥

अथ जन्मये रव्यादयः स्तात्तकाळिकाः ग्राह्याः ॥ लिरव्यंते ॥ सलग्नाः ॥ श्रीरस्तु* ॥

---

१ ही महजराची नक्कल अगदी अलीकडे केलेली आहे. याची जुनी नक्कल किंवा मूळ महजर मिळण्याचा संभव आहे. याकरितां येथें सबंध महजर दिला नाहीं. अस्सल महजर मिळाला म्हणजे तो सबंध छापणें जरूर आहे. या मह-जरावरून १५४६ अखेर किंवा १५४७ च्या प्रारंभीं शहाजी विजापूरकरांच्या बाजूस गेला होता व तेथून निजामशाही मुलखांत येऊन दंगेधोपे करीत असे असें म्हणतां येतें. हा कागद रा. कृष्णाजी वासुदेव पुरंदरे यांनीं मिळविला.

* ही जन्मपत्रिका पुणे येथील कसब्याच्या गणपतीचे पुजारी पिलोबा ठकार यांच्या संग्रहांतील आहे.

| र | चं | मं | बु | गु | शु | श | रा | के | लं |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ७ | ११ | ० | १ | ११ | २ | ५ | ११ | |
| ९ | १४ | २६ | २४ | ० | २ | १७ | १९ | १९ | १ |
| ३० | ३० | ५० | ३० | १० | २५ | ५५ | १० | १० | ४ |
| ५८ | ७४० | ४५ | ७५ | ११ | ७२ | ४ | ३ | ३ | |
| २४ | ३० | ५७ | २७ | ३० | ३४ | ३६ | ११ | ११ | |

---

# ३२ शहाजी व शहाजहान

(द. वि. आपटे)

शहाजी व शहाजहान या व्यक्ति समकालीन होत्या इतकेंच नव्हे, तर त्यांच्य आयुष्यांतील प्रारंभीचीं कर्तबगारीचीं वर्षें एका क्षेत्रांत गेलीं. यामुळें शहाजीच चरित्र समजून घेण्यास शहाजहानाच्या हालचाली लक्षांत घेणें अवश्य आहे जहांगिराच्या कारकीर्दीचा उत्तरार्ध व शहाजहानाच्या अमदानीचा पूर्वार्ध महा राष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें तपासण्याचें बरेंचसें काम रा. राजवाडे, कै. खरे प्रो. सरकार यांनीं केलें आहे. परंतु त्यांत कांहीं फिरवाफिरव पाहिजे असे मल वाटत असल्यामुळें मी या विषयाची मांडणी येथें संक्षिप्तरीतीनें करतो.

जहांगिराच्या कारकीर्दीत नूरजहानचा बाप जिवंत असेंपर्यंत मोगल राज्याचा कारभार बराच समतोलपणानें चालला होता. दक्षिणेंत मलिकंबर उत्तरेस अफगाण यांचे दंगेधोपे सुरू असले तरी त्याची व्यवस्था तातडीनें लाव ण्यांत येई. पण नूरजहानचा बाप शके १५४३ मध्यें मरण पावल्यापासून जहां गिराच्या दरबारांत नूरजहानचा व शहाजहानाचा असे दोन पक्ष उघडपण वावरूं लागले. जहांगिराच्या शेवटल्या सात वर्षांत या दोघांचे एकमेकांविरुद्ध डाव चालले होते. नूरजहानच्या मनांतून जहांगिरामागून शाहरीयर यांस गादी मिळवून द्यावी असें असल्यामुळें ती शहाजहानाचें वजन कमी करण्यासाठ झटत असे. त्यांतून जहांगिर या सुमारास एका दुखण्याने पछाडला जाऊन जे थकला तो मरेपर्यंत चांगलासा सुधारला नाहीं. यामुळें नूरजहान करील ते पूर्वदिशा असा प्रकार मोगली राज्यांत सुरू झाला.

नंतर दक्षिणेंत मलिकंबर व विजापुरकर यांनीं उभारलेल्या सैन्याचा पराभव करून शहाजहानानें निजामशाहाची राजधानी खडकी ही हस्तगत केली व ते धुळीस मिळविली. यामुळें मलिकंबर, विजापुरकर व गोवळकोंडेकर यांनीं त्यास खंडणी देऊन तह केला. तेव्हांपासून शहाजहानाचें पारडें जड झालें ही गो

नूरजहानच्या लक्षांत येऊन ती, काय करावें या विचारांतच होती. इतक्यांत अफगाणिस्थानांत मोठें बंड झाल्यामुळें तें मोडण्याकरतां चांगला सेनापती पाठविणें जरूर पडलें व त्या कामावर शहाजहानाची नेमणूक झाली.

परंतु दक्षिणेंत आपलें बसलेलें बस्तान बिघडविण्यासाठीं नूरजहाननें हा घाट घातला आहे ही गोष्ट शहाजहानाच्या लक्षांत आली; व त्यानें अफगाणिस्थानाकडे जाण्याचें साफ नाकारलें. शके १५४४ च्या चैत्रांत तो बऱ्हाणपुराहून मांडू येथें गेला आणि तेथून त्यानें बापाकडे समेटासाठीं वकील पाठविला. त्याचा कांहीं एक उपयोग न होतां उलट त्याची जहागीर काढून घेण्यांत आली. यामुळें बंडाचें निशाण उभारण्यावांचून शहाजहानास गत्यतर राहिलें नाहीं.

या सुमारास अफगाणिस्थानांतील बंड मोडून मोगली सैन्य विजयी झालें व जहांगिरास मुलाच्या बंदोबस्ताकडे लक्ष देण्यास चांगली फुरसत मिळाली. शहाजहानालाहि मोठमोठ्या सेनापतींचा या वेळीं चागला पाठिंबा होता. खानखानान, त्याचा मुलगा दाराबखान, सरबुलंदखान, शर्जाखान, जाधवराव, उदाराम, दर्याखान ताकी वगैरे दक्षिणेंतील, गुजराथेंतील व माळव्यांतील नामांकित सरदार शहाजहानाचा पक्ष उचलण्यास पुढें आले. आणि खुद्द जहांगिराजवळच्या सरदारांपैकीं असफखान वगैरे सरदार देखील मनांतून शहाजहानाची बाजू यशस्वी व्हावी अशा मताचे होते. याखेरीज कुंवरभीम व विक्र--मजित हे रजपूत राजे शहाजहानाची बाजू उचलून धरण्यास मोठ्या ईर्षेनें पुढे आले होते.

या तयारीच्या जोरावर शहाजहान मांडूहून निघाला तो फत्तेपूर-शिक्री येथें पोंचला. नूरजहाननें महाबतखानाच्या हाताखालीं मोठें सैन्य शहाजहानाच्या शासनार्थ शके १५४५ च्या प्रारंभीं रवाना केलें. दोनही सैन्याची गांठ यमुनेच्या काठीं बिलोचपूर नजीक १५४५च्या चैत्रात पडली. असफखान, खाजा अबूलहसन व अबदुलाखान हे आयत्या वेळीं बादशाही सैन्यातून फुटून शहाजहानास मिळणार होते. पण ही गोष्ट शहाजहानाच्या बाजूकडील लोकांना माहीत नसल्यामुळें त्यांनीं अबदुलाखानाच्या लोकांनाच मारले व त्यामुळें जो घोटाळा उडाला तो सुधारण्यासाठीं विक्रमाजित पुढे झाला, तोहि त्या गर्दीत ठार झाला! एकूण शहाजहानास शेवटीं मोठ्या मिनतवारीनें सैन्य संभाळून मागें हटतां आलें इतकेंच.

यानंतर शके १५४५च्या वैशाखामध्यें महाबतखान मोठ्या सैन्यानिशीं शहाजहानाच्या पाठीस लागला; आणि स्वतः जहांगीर अजमीरपर्यंत तयारीनिशीं येऊन राहिला. तेव्हां शहाजहानानें जाधवराव व उदाराम यांच्या हाताखालीं असलेलें मराठी सैन्य महाबतखानावर गनीमी काव्यानें लढण्यास पाठविलें. त्याचा म्हण-

ण्यासारखा उपयोग तर झाला नाहींच; उलट महाबतखानानें मात्र शहाजहानाच्या सैन्यांत पैसा पेरून फाटाफूट केली. खुद्द खानखानानच फितूर झाल्याबद्दल लेखी पुरावा सापडल्यामुळें शहाजहानास मागें पाय घेणें भाग पडलें. तो असेरीच्या किल्यांत जाऊन कबिल्यासह सावधगिरीनें राहिला. त्यानंतर गुजराथेंत शहाजहानाच्या पक्षाचा ठिकठिकाणीं पराभव झाला; बऱ्याच लोकांनीं त्याची बाजू सोडली व शहाजहानास नर्मदेच्या दक्षिणेस जावें लागलें.

थोड्याच वर्षांपूर्वी शहाजहानानें मलिकंबर व अदिलशहा यांच्या सैन्याचा पूर्ण पराभव करून त्यांच्यापासून जबर खंडणी घेतली होती. पण आतां त्याच शहाजहानाला मलिकबर व अदिलशहा यांजकडे आश्रयार्थ विनवणी करण्याची पाळी आली. पण याला आश्रय देणें म्हणजे आपल्या अंगावर दिल्लीच्या बादशहाचें सर्व सैन्य ओढून घेण्यासारखें अनर्थावह असल्यामुळें ही विनंति निजामशाही व अदिलशाही अशा दोनही दरबारीं मान्य झाली नाहीं.

ही निराशेची परिस्थिती पाहून शहाजहानानें आपला पाठलाग करणाऱ्या बादशाही सेनापतीची म्हणजे महाबतखानाची तडजोड घडवून आणण्यासाठीं विनवणी चालविली. त्यापासूनहि कांहीं निष्पन्न झालें नाहीं. तेव्हां त्यानें गोवळकोंड्याच्या आश्रयास जाऊन तेथून ओरिसा व बंगाल प्रांतापर्यंत सफर मारण्याचें ठरविलें. अर्थात्या धावपळींत त्याच्याबरोबर आजपर्यंत सामील असणारे उत्तरेकडील सरदार यापुढें सहकार्य करण्यास तयार नव्हते. जाधवराव, उदाराम वगैरे मराठे सरदार तापीच्या दक्षिणेपर्यंत त्याच्या सैन्याबरोबर आले. याचें कारण त्यांची जहागीर दक्षिणेत होती. तेथें येतांच त्यांनींहि मुक्काम केला. यामुळें वऱ्हाडांतील माहूरच्या मुक्कामापासून शहाजहानाला आपली बायको मुमताजमहल, दारा, सुजा, औरंगजेब हे मुलगे आणि राजा भीम एवढ्याच सरंजामानिशीं गोवळकोंड्यास जाणें भाग पडलें. तेथून तो वर्षभर ओरिसा व बंगाल या प्रांतांत भटकत राहिला.

वर सांगितल्याप्रमाणें शहाजहानाचें बंड तात्पुरतें विझलेलें पाहून जहांगिर अजमिराहून परत काश्मीरास हवा पालट करण्यासाठीं निघून गेला. बादशाही सैन्याचा अधिपती महाबतखान हा मात्र जय्यत तयारीनिशीं नर्मदातीरीं राहिला होता व त्याला कांहीं तरी कामगिरी पाहिजे होती. ती कामगिरी, निजामशहा व आदिलशहा यांच्या चुरशीमुळें, त्याला सहज मिळण्याजोगी होती. मलिकंबर व अदिलशहा या दोघांनींहि आपसातल्या भांडणांत महबतखानाची आपल्या बाजूस मदत मिळावी अशी खटपट चालविली. निजामशहाची बाजू मोंगलांनीं उचलल्यास आपला वडील मुलगा मोगलांच्या सैन्यांत नोकरीस ठेवण्याची तयारी असल्याबद्दल मलिकंबरानें महाबतखानाकडे कळाविलें. उलटपक्षीं अदिल-

शहानें पांच हजार स्वारांसह मुल्ला महमद लारी या सरदारास मोंगलांच्या तैनातीस पाठविण्याची इच्छा दर्शविली. महबतखानानें शहाजहान दक्षिणेंतून निघून जाईपर्यंत कोणतीहि बाजू पतकरल्याचें निश्चितपणें दिसू न देतां, नुसतें बोलणें चालू ठेवलें आणि शेवटीं विजापूरकरांची बाजू उचलली. त्याप्रमाणें मुल्ला महमद लारी हा विजापुराहून पांच हजार सैन्यासह मोंगलांना येऊन मिळाला.

हा बनाव घडून येत असतां मलिकंबरानें निराळाच घाट घातला होता. तो सैन्यासह गोवळकोंड्याच्या बाजूकडे कुतुबशहाशीं तहाचें बोलणें लावण्यासाठीं गेला. इकडे विजापूरचें सैन्य स्वस्थपणें बऱ्हाणपुरास मोंगलांना मिळण्यासाठीं गेलें. व तेथें विजापूरचें सैन्य पोंचल्यानंतर त्याचें स्वागत करून शहाजहानास बंगालकडे कसा शह द्यावा याचा विचार मोंगलांचा सेनापति करूं लागला. दक्षिणेंत सध्यां कांहीं गडबड होणार नाहीं या अंदाजावर त्यानें आपले पुढील बेत उभारले. सरबुलंदराय यांजकडे दक्षिणेंकडील बंदोबस्ताचें काम सोंपवून, व (शहाजहानाची बाजू सोडून बादशाही सैन्यांत सामील झालेल्या) जाधवराव व उदाराम यांना त्यांच्या तैनातीस देऊन त्यास बालाघाटच्या संरक्षणासाठीं ठेवलें व विजापूरच्या पांचहजार स्वारांसह मुल्ला महमद लारी यास त्यांना मदत करण्यास सांगितलें. अशा रीतीनें दक्षिणेची व्यवस्था करून महाबतखान उत्तरेकडील कामासाठीं निघाला.

पण मलिकंबराचा डाव महाबतखानाच्या लक्षांत आला नव्हता. मलिकंबरानें गोवळकोंड्याकडे जाऊन खंडणी वसूल केली, कुतुबशहाशीं तह केला आणि अचानकपणें बेदरवर स्वारी केली. तें हस्तगत करून तो थेट विजापुरापर्यंत येऊन पोंचला. तेव्हां अदिलशहाला किल्ल्यांत जाऊन रहाण्यावांचून गत्यंतर नव्हतें. मलिकंबरानें विजापूरच्या किल्ल्याभोंवती वेढा दिला. त्यावेळीं आंतील लोकांना मोठें संकट पडलें व मोगलाकडे पाठविलेल्या मुल्ला महंमदाला बऱ्हाणपुराहून तातडीनें विजापुराकडे येण्याचा आदिलशहाने हुकूम पाठविला. पण मुल्ला महमद कसा येणार ! तो आतां मोंगलांच्या नोकरींत होता. त्याला बऱ्हाणपुराहून मोंगली सेनापतीच्या परवानगीवांचून निघतां येईना. आपल्या मालकाच्या मदतीस तातडीनें जाण्याची त्याची इच्छा असून त्याला तसें करतां येईना. त्यानें प्रसंग ओळखून १२ लाख रुपये मोगली सेनापतीला चारले; तेव्हां त्याला दक्षिणेकडे जाण्याची परवानगी मिळाली आणि त्याच्याबरोबर कांहीं मोगली सैन्य लष्करखानाच्या हाताखालीं देण्यांत आलें.

मुल्ला व लष्करखान यांचीं सैन्यें मलिकंबरावर चालून आलीं तेव्हां मलिकंबरानें प्रथम मोंगलाकडे बोलणें लावलें कीं, “ अदिलशहा व निजामशहा यांच्या भांडणांत मोंगलांनीं पडूं नये. ” पण मुल्ला व लष्करखान यावेळीं जो-

रांत होते. त्यांनीं मलिकंबराच्या विनवणीकडे लक्ष दिलें नाहीं. उलट विजापूराकडे मोठ्या सैन्यानिशीं ते चालून आले. मलिकंबराचा त्यांच्यापुढें निभाव लागण्याजोगा नव्हता. त्यानें विजापूरचा वेढा उठविला आणि तो सैन्यानिशीं आपल्या प्रांतांत गेला. तेव्हां मुल्ला महंमद व लष्करखान यांना अधिकच चेव आला. त्यांनीं मलिकंबराच्या सैन्याचा पाठलाग करण्याचें ठरविलें. तेव्हां मात्र मलिकंबराला शत्रूशीं सामना करण्यावांचून गत्यंतर राहिलें नाहीं. त्यानें अहमदनगरापासून पांच कोसांवर असलेल्या भातवडी गांवाजवळ विजापूरकर व मोंगल यांचीं संयुक्त सैन्यें अगदीं धुळीस मिळविलीं. या युद्धाच्या सुरवातीसच विजापूरचा सेनापती मुल्ला महमद लारी कामास आला; आणि सेनापतीच मरण पावल्यावर त्याचें सैन्य दशादिशेस उधळलें हे निराळें सांगावयास नकोच. मोंगलांच्या बाजूचे जाधवराव व उदाराम हे या युद्धांत हत्यार न लावतांच पळून गेले. बाकीच्या मोंगली सैन्यानेंहि हाच मार्ग पत्करला. इखलासखान वगैरे अदिलशहाचे २५ अधिकारी मलिकंबराच्या हातीं कैदी म्हणून सांपडले. लष्करखान वगैरे मोंगली सेनापतिहि कैद झाले. पण खंजरखान कांहीं लोकांनिशीं पळाला तो अहमदनगरास पोंचला. जान सिपारखान बीड येथें आपल्या जहागिरींत गेला; आणि इतर ‘ पळे ’ बऱ्हाणपुरास सरबुलंदरायाच्या आश्रयास गेले.

हें भातवडीचें युद्ध मराठ्यांच्या इतिहासांत फार महत्त्वाचें आहे. शहाजीनें निजामशाही दरबारांत असतां मोठा पराक्रम दाखविला तो याच युद्धांत. शहाजी व जाधवराव एकमेकांविरुद्ध लढले ते याच युद्धांत. या युद्धाच्या कालाविषयीं सर्वत्र एकवाक्यता आहे. मोगली इतिहास इकबलनामा ( इ. डॉ. पृ. ४१५ व्हा. ६ ); विजापूरचा इतिहास बुसातिने सलातीन व जेधे शकावली या सर्वांच्या मतें हें युद्ध शके १५४६ च्या कार्तिकांत झालें. मराठींतील एकाहि बखरकाराला या भातवडीच्या लढाईचा मागमूस माहीत नाहीं. तथापि जाधवराव मोंगलाचे सैन्य घेऊन शहाजीवर चालून आला होता ही जी गोष्ट १५४९ मधली म्हणून बखरकारांनीं वर्णन केली आहे ती, शके १५४६ ला कांहीं अंशीं लागू पडण्याजोगी आहे.

भातवडीच्या युद्धानंतर मलिकंबरानें शत्रुपक्षाचे कैदी दौलताबादेस पोहोंचवून अहमदनगरास आश्रय धरून बसलेल्या खंजरखान नांवाच्या मोगली सेनापतीसभोंवतीं वेढा दिला. पण तो लवकर ताब्यांत येण्याचें लक्षण दिसेना. तरी हिंमत न सोडतां त्यानें दक्षिणेस व उत्तरेस दोनहीकडे सैन्यें पाठविलीं. दक्षिणेकडील सैन्यानें अदिलशाही राज्यांत धुमाकूळ माजवून खुद्द विजापुरास वेढा दिला; आणि उत्तरेकडील याकुबखानाच्या हाताखालच्या निजामशाही सैन्यानें बऱ्हाणपुरापर्यंत दौड मारून मोगली सेनापती सरबुलंदराय यास शह दिला. स्वतः

मलिकंबरानें यावेळीं सोलापुरास वेढा घालून तो किल्ला विजापुरकरापासून घेतला. शके १५४६–४७ मध्यें सोलापूर घेतल्याचें इकबलनामा व जेधे हे तर नमूद करतातच. पण खुद्द मलिकंबराची सनद उपलब्ध असल्यामुळे [ सनदा. पृ. १६ ले. ११ ] त्या विषयीं शंका रहात नाहीं.

विजापूर, बऱ्हाणपूर व सोलापूर या तीनही ठिकाणीं म्हणजे निजामशाही राज्याच्या तीन दिशेस एकाच वेळीं जबर शत्रूशीं युद्ध करण्याचें काम मलिकंबराने उचलल्यामुळें त्याची ओढाताण झाली. अशा वेळीं ओरिसा, तेलंगण, गोवळकोंडा वगैरे प्रांतांत भटकून कटाळलेला शहाजहान निजामशहाच्या आश्रयास गेला; व त्याचें मलिकंबरानें या वेळीं मोठ्या उत्सुकतेनें स्वागत करून उत्तरेकडील मोहिमेची कामगिरी त्याजकडे सोंपविली.

उत्तरेकडे मोंगलांचें सैन्य बऱ्हाणपुरास होतें; त्यांस वेढण्याचें काम मलिकंबराचा हस्तक याकुबखान यानें चालविलेंच होतें. त्यांतच शहाजहानानें याकुबखानास मदत देण्याचें काम मनापासून चालविल्यामुळें बऱ्हाणपूर हस्तगत होण्याच्या बेतांत आलें होतें. मोगली किल्लेकरी टेकीस येत चालला. इतक्यांत महबतखान मोठ्या सैन्यानिशीं बऱ्हाणपूर येथील मोगली सैन्याच्या मदतीस धाऊन आल्यामुळें परिस्थिती एकदम बदलली. महबतखानापुढें शहाजहानाचा टिकाव लागण्याजोगा नव्हता. तो बऱ्हाणपुरचा वेढा उठवून बालाघाटांत रोहनगडाकडे परत गेला. त्याचा विश्वासू सरदार अबदुल्लाखान फकीर बनून इंदुरास राहिला व तेथून बादशहाकडून माफी मिळविण्याची खटपट करूं लागला. स्वतः शहाजहान आजारी पडला. त्याला डोकें वर निघण्याची आशा दिसेना. विजापूर, गोवळकोंडे, ओरिसा, बंगाल वगैरे कोठेंहि आश्रयास आपणास जागा राहिली नाहीं; आपल्या बाजूचा सरदार विक्रमजित तर मागेंच मरण पावला; खानखाना, जाधवराव वगैरे सरदारांनीं आपली बाजू सोडून बादशाही सैन्यांत सरदारी मिळविली; अशा रीतीने चोहींकडून नाउमेदीची परिस्थिती निर्माण झाल्यामुळे त्याचें मन फिरलें आणि त्यानें बापाकडे पत्र पाठवून माफी मागितली. ती मिळतांच रानावनांतून वणवट भटकण्याची यातना बंद पडेल अशी त्यास आशा वाटूं लागली.

नूरजहानला शहाजहानचा कायमचा बंदोबस्त करावयाचा होता हें जरी खरें तरी तिला अलीकडे महबतखानाचें वजन वाढत चाललेलें पाहून मोठी धास्ती उत्पन्न झाली होती. त्यांतून त्याच्याबरोबर पारविज हा राजपुत्र असल्यामुळें महाबत व पारवीज या दुकलीविषयीं नूरजहान फारच साशंक बनली होती. शहाशहानाचा पाडाव करण्याच्या नादीं लागून हें नवें संकट अंगावर ओढून घेण्यांत अर्थ नाहीं असें तिनें ठरविलें आणि शहाजहानाच्या पत्रास अनुकूल उत्तर

लिहविलें (१५४८ वैशाख). "रोहटस व असीर हे किल्ले बादशाही सैन्याच्या हवाली करून आपले मुलगे दारा व औरंगजेब यांना जहांगिराकडे पाठवावे म्हणजे माफी मिळून बालाघाट प्रांत शहाजहानाकडे सोपविण्यांत येईल" अशा अर्थाचा मजकूर त्या पत्रांत होता. त्याप्रमाणें शहाजहानानें किल्लेदारांना हुकूम पाठविले मुलांना लाहोरकडे आजोबाच्या भेटीस रवाना केलें आणि स्वतः बायको घेऊन नाशिकास आला. शहाजहानाची ही धावपळ सुरू असतां शहाजीलाहि निराळ्या कारणामुळें भटकत फिरण्याचा प्रसंग आला होता. भातवडीच्या लढाईत त्यानें तरवार गाजविल्यामुळें त्याच्याविषयीं चुलतभावांच्या मनांत व मलिकंबराच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला असल्यामुळें त्याचा दरबारांत मान होण्याऐवजीं अपमान होऊं लागला.तेव्हां तो निजामशाही सोडून विजापुरकरांच्या आश्रयास गेला.

'शके १५४७च्या पावसाळ्यानंतर शहाजी अदिलशहाला स्वसैन्यासह जाऊन मिळाला' असें सुप्रसिद्ध इ. सं. राजवाडे म्हणतात (रा. मा. चं पृ. ५४ ). (खं. १५ पृ. ४२८) व त्यानें ही विजापुरकरांची नोकरी १५४९ अखेरीपर्यंत केली असें ( खं. २० पृ. ३४५ १५४७ च्या श्रावणापासून १५४९ अखेरपर्यंतच्या अडीच वर्षांत त्यानें एक कर्नाटकची स्वारी करून अदिलशहाकडून चांगली मनसब मिळविली.

मलिकंबराचें वैमनस्य व विजापूरच्या इब्राहिम अदिलशहाचें स्वागत या दोन कारणांनीं शहाजी विजापूरदरबारास चिकटून राहिला होता. पण हीं दोन्ही कारणें दोन वर्षांत नाहींशीं झालीं. हिंदु सरदारांची विजापूर दरबारांत चहा राहणार नाहीं असें स्पष्टपणें दिसूं लागलें. तेव्हां विजापूर दरबार सोडून पुन निजामशाहीच्या आश्रयास जावें असें शहाजीच्या मनांत आलें.

ही कल्पना शहाजीच्या मनांत येण्याजोगी फारच विलक्षण उलथापालथ निजामशाही व दिल्ली दरबारांतहि झाली होती. शहाजहान व मलिकंबर यांनी केलेली उचल हाणून पाडण्याचें सामर्थ्य मोंगली सेनापतीच्या म्हणजे महाबत खानाच्या आंगीं असल्यामुळें महाबतखान बऱ्हाणपुरास येतांच शहाजहान त मागें हटलाच पण मलिकंबरहि पड घेऊन तहास तयार झाला. महाबतखानाच्या मनांत तह न करतां शहाजहान व मलिकंबर यांचा पुरा मोड करण्या होतें. पण नूरजहाननें शहाजहानास माफी देऊन, महाबतखानास दक्षिणेंतू परत बोलावून व खान जहान लोदी यास त्याच्या जागीं नेमून सर्व कल्पन

जागच्या जागीं थंड पाडल्या. दक्षिणेंतील मोगली सैन्याचें आधिपत्य खान जहान लोदी यास दिलें गेल्यामुळें मोंगलांचें दुहेरी नुकसान झालें. लोदी नाकर्ता असल्यामुळें मलिकंबराला त्याचें भय वाटण्याजोगें नव्हतें व त्यानें लोदीची फटफजीती केली असती. पण १५४८च्या वैशाखांत मलिकंबर मरण पावल्यामुळें लोदीचें नाकर्तेपण तितकें उघडकीस आलें नाहीं. तथापि मलिकंबराच्या मागून निजामशाही दरबारांत फत्तेखान व हमीदखान अधिकारारूढ झाले. आणि नालायक होते तरी निजामशाही बुडविण्याचा मोगली बेत कांहीं काळ मागें पडला. इतकेंच नव्हे, तर महाबतखानानें चिडून खुद्द बादशहास म्हणजे जहांगिरासच कैद केलें ! त्यांतून जहांगिराची सुटका नूरजहाननें मोठ्या युक्तीनें करविली व शेवटीं महाबतखानास बंडखोर बनून दक्षिणेचा रस्ता धरावा लागला !

उत्तरेकडील या भानगडीमुळें लोदी व शहाजहान यांना हातपाय पसरण्यास चांगलाच वाव मिळाला. शहाजहान तर ‘ बापास सोडविण्यासाठीं मला उत्तरेस गेलें पाहिजे ’ असें सांगून अहमदनगर प्रांतांतून १५४८च्या ज्येष्ठांत निघाला तो नाशिक त्रिंबकवरून सैन्य जमवीत राजपुतान्यांत पोचला. पण त्याचा पक्ष उचलण्यास कोणताहि नामांकित संस्थानिक पुढें आला नाहीं. यामुळें तो निराश होऊन इराणास जाण्याच्या विचारांत होता. मात्र त्याप्रमाणें प्रत्यक्ष घडलें नाहीं; याचें कारण तो आजारी पडला. इकडे महबतखानाचें ‘आठ महिन्याचें राज्य ’ संपून तोहि बंडखोर बनला; व समानसंकटामुळें तो आपला पक्ष उचलील अशी शहाजानास आशा उत्पन्न झाली. त्या आशेच्या जोरावर आजारी स्थितींत तो पालखींतून गुजराथेपर्यंत आला; आणि तेथें १५४८च्या कार्तिकांत राजपुत्र पार्वेझ मरण पावल्याची बातमी त्यानें ऐकली. यामुळें राज्याचा वारस व आपला प्रतिस्पर्धी असा हा एक कांटा नाहींसा झाला याबद्दल आनंद मानीत तो बागलणांतून नाशकास आला आणि तेथें सामानसुमान ठेऊन तो पुढें जुन्नरास येऊन राहिला.

शहाजहानाची या भागांत येण्याची ही तिसरी खेप होती. पहिल्या खेपेस त्याला मलिकंबरानें आश्रय दिला नाहीं; दुसऱ्या खेपेस त्यानें आश्रय दिला; पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. आणि तिसऱ्या खेपेस मलिकंबर मेला असला तरी आपला पूर्वीचा प्रतिस्पर्धी महाबतखान हाच आपल्या आश्रयास येईल या आशेनें शहाजहानास धीर वाटत होता. त्याप्रमाणें महाबतखानहि नेमका शहाजहानाच्या आश्रयास आला. मागल्या वितुष्टाबद्दल खेद प्रदर्शित करून माफी मिळावी अशी विनंति महाबतखानानें शहाजहानाकडे पत्रद्वारें केली; आणि माफी देण्यास शहाजहान एका पायावर तयार असल्यामुळें महाबतखान जुन्नरास दोन हजार स्वारांसह शहाजहानाच्या सेवेस हजर झाला.

अशा रीतीनें शहाजहान व महाबतखान ही जोडी एका ठिकाणीं जुळल्याचें नूरजहानला कळलें तेव्हां तिनें खानजहान लोदीस त्यांच्यावर स्वारी करण्याचा हुकूम सोडला. पण त्या हुकमाची अंमलबजावणी करण्याचा प्रसंगच आला नाहीं. शहाजहानाचे वाईट दिवस संपून त्याच्या नशीबीं राज्यप्राप्तिचा योग आला होता. यामुळें जहांगीर '१५४९ च्या अश्वीन अखेरीस मरण पावला. त्या वेळीं नूरजहाननें शहारियर यास सिंहासनावर बसविण्याचा प्रयत्न केला;पण तिची सद्दी संपली होती. दरबारांतील असफखान वगैरे मुत्सद्दी मनांतून शहाजहानाच्या पक्षाचे असल्यामुळें त्यानीं नूरजहानचा बेत मुळींच साधूं दिला नाहीं; उलट तिलाच त्यानीं कैदेंत ठेवलें. त्यानीं बनारसीदास नांवाचा जासूद शहाजहानाकडे ताबडतोब रवाना करून त्याला जलदीनें येण्यास सांगितलें. आणि लोकांना दाखविण्यासाठीं 'दावरबक्ष' यास तक्तावर बसविलें. पण हा दावरबक्ष म्हणजे शहाजहान येऊन पोंचेपर्यंत तक्तावर उभें केलेलें 'कोंकरू' होतें. शहाजहान आग्र्यास येतांच हें कोंकरू छाटून टाकावयाचें हें ठरलेलेंच होतें; आणि त्याप्रमाणें पुढें घडूनहि आलें.

बनारसीदास जहांगिराच्या मृत्युची बातमी कळविण्यासाठीं पत्र घेऊन निघाला तो जुन्नर येथें वीसावे दिवशीं म्हणजे १५४९ कार्तिक व. ६ स पोंचला. त्यावेळीं महाबतखान व शहाजहान बंगाल्याकडे जाण्याचा विचार करीत होते. इतक्यांत बनारसीदासानें आणलेलें पत्र त्यांना मिळालें. त्याबरोबर आपण आतां बादशाहीपदासाठीं झटून काम करण्याची उत्तम संधि आली आहे, हें ओळखून शहाजहान चारच दिवसात सर्व तयारी करून जुन्नराहून निघाला तो अजमीरवरून, आग्र्यास पोंचला, आणि बादशहा बनला !

शहाजहान बादशहा बनला तेव्हां तो आपल्या मित्रांना विसरला नाहीं. थोड्याच दिवसांपूर्वीं बडखोर बनलेला महाबतखान एकदम अजमीरचा सुभेदार झाला ;आणि शिवाय त्याला खानखाना आणि सिपाहसालार हे किताब मिळाले. असफखानासहि वजीरी मिळून यामिनुद्दवला हा किताब व नऊ हजार स्वारांची मनसब लाभली.

अशा प्रकारें जहांगीर मरण पावल्यापासून शहाजहान गादीवर बसून स्थिरस्थावर होईपर्यंत दक्षिणेंतील मोगली सुभेदार लोदी ह्याला धिंगाणा घालण्यास उत्तम संधी सांपडली व त्यानें तेवढ्यांत चांगलाच गोंधळ माजविला. त्या वेळीं निजामशाहीचीं सूत्रें मलिकंबराचा मुलगा फत्तेखान याच्या हातीं असून सेनाधिपत्य याकुबखान नांवाच्या हबशी सरदाराकडे असे. पण घरचीं भांडणें मिटवून त्याच वेळीं मोंगलाशीं झगडण्याचें सामर्थ्य या दोघांच्याही अंगीं नव्हतें. यामुळें त्यांनीं सरबुलंदरायाच्या मार्फत तहाचें बोलणें लाविलें. अर्थात् प्रत्यक्ष युद्ध न करतां

जामशाहीतर्फे पड घेऊन हे तह करणार या आशेनें लोदीस आनंद झाला व त्यानें निजामशाही वकिलास मोठ्या सन्मानानें बऱ्हाणपुरास बोलाऊन घेतलें ( इ. डॉ. खं. ६ पृ. ४३२ )

पण या वकिलाशीं तह ठरविण्यांत येईल व त्या तहानें निजामशाही दरबार बांधलें जाईल, अशी जी लोदीची समजूत होती ती चुकीची ठरली. त्यावेळीं निजामशाही दरबारांत कशाचीच शाश्वती राहिली नव्हती. बादशहा मूर्ख व व्यसनी असल्यामुळें आज एक रंग तर उद्यां त्याच्या उलट दुसरा, असा प्रकार हमेषा घडत असे. फत्तेखान व याकुबखान निजामशाही कारभार आपल्या समजुतीप्रमाणें करीत असतां हमीदखान नावाचा एक हबशी सरदार बादशहाची मर्जी संपादन करून कारभारात ढवळाढवळ करूं लागला. त्याने बादशहा, फत्तेखान व याकुबखान या तिघांसहि शून्यवत् बनवून आपल्या हातीं सर्व सूत्रें घेतलीं आणि मोंगलाशीं युद्ध पुकारलें.X लोदीनें, बऱ्हाणपूर येथें लष्करखानास ठेऊन, स्वतः निजामशहाच्या राजधानीच्या रोखानें सैन्य चालू केलें. तेव्हां हमीदखानाने लोदीला लाच देऊं करून मऊ पाडला तेव्हा अंतस्थपणें बारा लाख रुपये घेऊन नगरपर्यंतचा बालाघाटातला ( मोंगलाच्या ताब्यातला सर्व ) मुलूख निजामशहास परत देण्याचे लोदीनें तहानें ठरवून दिलें. त्याप्रमाणे तिकडील सर्व किल्लेदारांना "तुमच्या ताब्यातलें किल्ले निजामशाही अधिकाऱ्यांच्या हवालीं करावे व तुम्हीं सर्वांनीं बऱ्हाणपुरास यावें" असे लोदीचे हुकूम सुटले. सर्व किल्लेदारांनीं या हुकुमाची अंमलबजावणी केली. परंतु अहमदनगरचा किल्लेदार सिपादारखान यानें मात्र किल्ला निजाम-

---

Xयावेळीं निजामशहा वयाने लहानपोर होता अशी बखरकारांची समजूत दिसतें. पण ती चुकीची आहे. या वेळच्या निजामशहाच्या लीला इकबालनाम्यांत ( इ. डॉ. पृ. ४३३ ), हमीदखानाच्या चरित्रप्रसंगीं, आल्या आहेत. त्यांत हीं वाक्यें आहेत.

The text gives an account of the " Strange History " of this Abyssinian slave ( Hamid Khan ). He married a poor woman, who served in the female apartments of Nizamwl Mulk. She made herself useful in supplying the King secretly with wine and as a Procuress in bringing " wivee and daughters " for his gratification. By these means he obtained such an ascendancy over him that she was mistress inside the palace and her husband became master outside; but it must be added that he was a man of ability.

शहाकडे देण्याचें नाकारलें. " मी मोगली बादशहाच्या हुकुमावांचून किल्ला तुम्हांस देणार नाहीं " असें त्यानें निजामशाही अधिकाऱ्यांना साफ बजावलें. यामुळें लोदी व निजामशाही अधिकारी या दोघांचाहि नगरच्या किल्लेदारावर रोष झाला. पण त्यानें त्यास दाद दिली नाहीं.

लोदीनें यावेळीं आपला जम बसवून स्वातंत्र्य धारण करण्याचा विचार केला होता. त्या वेळीं कांहीं मोगली सरदार त्याच्या कटांत सामील झाले. त्यांच्या जोरावर त्यानें मांडूपर्यंत जाऊन माळव्यांतील कांहीं भाग हस्तगतहि केला. इतक्यांत त्याला शहाजहान गादीवर बसल्याचें वृत्त समजलें; आणि राजा गजसिंग, जयसिंग वगैरे जे रजपूत राजे लोदीबरोबर मांडूपर्यंत गेले होते त्यांनींहि त्यास सोडलें. तेव्हां लोदीचे डोळे उघडून त्याला आपला निभाव लागणार नाहीं असें कळून आल्यावरून कृतकर्माबद्दल पश्चात्ताप व्यक्त करणारे एक पत्र त्यानें शहाजहानास पाठविलें. शहाजहानानें मागले अपराध माफ करून त्याजकडे दक्षिणेचा सुभा सोपविला व त्याला बऱ्हाणपुरास परत जाण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें बऱ्हाणपुरास जाऊन तो सुभेदारीच्या कामावर हजरहि झाला.

पण लोदीचा पश्चात्ताप मनापासूनचा होता कीं दिखाऊ होता याविषयीं संशय येण्यास कारणें उत्पन्न झालीं. त्यानें निजामशाही हमीदखानाशीं तह करून जे किल्ले त्याच्या स्वाधीन केले होते ते परत मिळविण्याची खटपट केली नाहीं. यामुळें त्याला सुभेदारीवरून काढून त्याच्या जागीं शहाजहानानें महाबतखानाची नेमणूक केली. हुकुमाप्रमाणें सुभा महाबतखानाच्या स्वाधीन करून लोदी बादशहाच्या भेटीस आग्र्यास गेला. तथापि लोदीचें मन शुद्ध नव्हतें. 'तो अद्याप बंडाळीच्या कल्पना डोक्यांत घोळवितो' अशी बातमी हेरांनीं शहाजहानास सांगितली. त्यानें सात आठ महिने त्या गोष्टीकडे कानाडोळा केला. पण मग त्याला कैद करण्याचा विचार दरबारांत होऊं लागला. याची कुणकुण लोदीला कळली व तो संशयग्रस्त होऊन दरबारांत येईनासा झाला. बादशहानें ' लोदी दरबारांत कां येत नाहीं ' अशी चौकशी केली; तेव्हां आपल्या पूर्वीच्या अपराधाबद्दल शिक्षा होईल कीं काय अशी त्याला भीति वाटत आहे असें शहाजाहनाच्या निदर्शनास आलें. यामुळें त्यानें पुन: लोदीस पत्र पाठवून " मागले सर्व अपराध माफ केले आहेत " असें कळविलें. पण एकदां संशयग्रस्त झालेलें लोदीचें मन कांहीं केल्या निर्धास्त होईना. त्यानें आग्र्याहून पळून जाण्याचा निश्चय केला व तो १५५१ च्या अश्विनांत तेथून निघाला. अर्थात् त्याच्या मागें बादशाही सैन्य लागलें. ( बादशहानामा इ. डॉ. खं. ७ पृ. ९ ). या बादशाही सैन्याचें आधिपत्य ख्वाजा अबुल हसन याजकडे होतें. पण हसनास झुकांड्या देत लोदी आपल्या अफगाण लोकांसुद्धां चंबळा

नदी उतरला व तेथून गोंडवणांतून व वऱ्हाडांतून बुऱ्हाण निजामशहाच्या आश्रयास आला. यामुळें निजामशहाशीं मोंगलांचें युद्ध सुरू झालें.

लोदी निजामशहाच्या आश्रयास शके १५५१ च्या अखेरीस गेला व नंतर रमजान महिन्यांत म्हणजे १५५२ च्या वैशाखांत खाजा अबुल हसन वगैरे सरदारांच्या हाताखालीं मोगली सैन्य आगोटीस निजामशाहीच्या सरहद्दीवर येऊन राहिलें व त्याने पावसाळ्यानंतर निजामशाही मुलखावर स्वारी करण्याची तयारी चालविली असें बादशाहानाम्यांतील हकीकतीवरून दिसते. [ इ. डॉ. खं. ७ पृ. १० ]

या वेळीं निजामशाही राज्यांतील अंतर्गत परिस्थिति काय होती तें लक्षांत घेतलें पाहिजे. मलिकंबराच्या मृत्यूनंतर निजामशाहीचीं सूत्रें त्याचा मुलगा फत्तेखान याच्या हातीं आलीं. पण मूर्तिजा निजामशहानें हमीदखानाच्या चिथावणीवरून त्याला कपटानें कैद केलें आणि जुन्नरच्या * किल्ल्यावर अटकेंत ठेवलें. तेथून तो मोठ्या चलाखीनें निसटला पण पुनः पकडला गेला. यानंतर त्याला दौलताबादेस अटकेंत ठेवण्यांत आलें.

यानंतर निजामशाहीचीं सूत्रें हमीदखानाच्या ताब्यांत आलीं. त्याने विजापूरकराशीं व मोगलाशीं एकाच वेळीं युद्ध पुकारल्यामुळें निजामशाहीवर मोठें संकट ओढवलें. त्याची हकीकत बुसातिनें सलातीन नावाच्या विजापूरच्या इतिहासांत व पादशहानामा नांवाच्या शहाजहानच्या कारकीर्दीच्या इतिहासांत बऱ्याच विस्तृत रीतीनें दिली आहे. पैकीं बु. स. मधील हकीकत येथें संक्षिप्त रीतीनें नमूद करतो.

इब्राहिम अदिलशाहा मरण पावला त्याच दिवशीं ( ११ मोहरम, हि. १०३७ = १५४९ भाद्र. शु. १३ ) सुलतान महमद यास गादीवर बसविण्यांत आलें. या कामीं मिरजा महंमद अमीन व दौलतखान यांनीं पुढाकार घेतला; व त्यांना अनुक्रमें 'मुस्तफाखान' व 'खवासखान' हे किताब देण्यांत आले. महमद तख्तावर बसला त्याच वर्षी निजामशहाचे मोठें सैन्य धारूर किल्ल्यावर चालून आलें. परंतु दोनही पक्ष समबल ठरले; कोणालाच जय मिळाला नाहीं.

नंतर हमीदखानाच्या चिथावणीवरून निजामशहानें पुनः सैन्य पाठविलें; तें विजापुरानजीक येऊन लुटालूट करूं लागले. कंदरीकजोरी नजीक दोन्ही सैन्यांची गांठ पडून हमीदखानाचा पराभव झाला.

---

*या ठिकाणीं Khyber असें बीलच्या ग्रंथांत आहे. परंतु ती वाचनाची चूक असून, तेथें 'जुंनर' असें पाहिजे. पारशींत 'खैबर' व 'जुंनर' हे शब्द लिहिण्यांत सारखे असतात.

अशा रीतीनें हमीदखान अपेशी ठरल्यामुळें व फत्तेखान कैद झाल्यामुळें निजामशाही दरबारातील सरदारांच्या मनाची चलबिचल झाली. शिवाय, यावेळीं मोगलांचें सैन्य निजामशाही राज्यावर हल्ला करण्यास ठीं सरहद्दीपर्यंत पोंचलें. तेव्हां जाधवराव मोगलांना मिळणार असा संशय दरबारांतील मुत्सद्यांना येऊन त्यांनीं त्याला कैद करण्याची खटपट केली; पण गडबड होऊन जाधवराव मारला गेला. तेव्हां त्याचे भाऊ वगैरे मोगलाच्या आश्रयाला गेले; व जावई शहाजी भोसला परांड्याचे आसपास रहात असे त्याला ही खबर समजतांच तो संगमनेराकडे पळून गेला. आणि तिकडून लुटालूट करीत पुण्यास आला. तेथें त्यानें मोठा दंगा आरंभून पुण्याच्या आसपास जो निजामशहाचा व आदिलशहाचा मुलूख होता तो बळकावला व त्यावर अंमल करूं लागला.

शहाजीच्या बंदोबस्तासाठीं खवासखानानें मुरारपंताबरोबर मोठें सैन्य देऊन पुण्याकडे पाठविलें. तेव्हां शहाजीनें जुन्नरच्या श्रीनिवासरावांचा आश्रय केला. मुरारीनें पुणें व इतर महाल घेतले व शहाजीचे पुण्यांतील वाडे जाळून फडशा केले. आणि पुण्यापासून सोळा कोसांवर डोंगरावर भुलेश्वरानजीक दौलतमंगल नांवाचा किल्ला बांधून रायारावास दोन हजार सैन्यासह तेथेंच ठेवलें; आणि चंद्ररावास तळकोंकणांत दाभोळकडे पाठवून आपण विजापुरास गेला.

इकडे शहाजीनें पेमगड किल्ल्याची डागडुजी करून त्याचें शाहगड असें नाव ठेवलें; त्यानें तेथें राहून युक्तिप्रयुक्तीनें पांचसहा हजार स्वारांची जमात जमविली आणि तो आसमंतांतील किल्ले व शहरें हस्तगत करूं लागला. त्यानें बालेघाटचा मुलूख आणि जुन्नर व संगमनेरपासून तहत अहमदनगर व दौलताबाद पर्यंतचा सर्व मुलूख हस्तगत केला.

मुरारीने तलकोंकण हस्तगत करण्यासाठीं बाजी दळवी वगैरेस पाठविलें होतें त्यांनीं चौल बंदरापर्यंतचा कोंकणातला मुलूख घेतला. तेव्हां बुऱ्हाण निजामशहानें सिद्दी साबा अंबरखानी यास सैन्य सह पाठवून बाजी दळवीस ठार केलें व चौल वगैरे मुलूख पुनः निजामशहाच्या ताब्यांत आला.

या सुमारास याकूतखान व उदाजीराव यांच्या सल्ल्यावरून बुऱ्हाणनिजामशहानें फत्तेखानास कैदेतून सोडून वजीरीचें पद दिलें. फत्तेखानानें अधिकार प्राप्त होतांच बुऱ्हाणास कैद केलें आणि मोंगलांना सर्व हकीकत कळविली व त्यांच्या सल्ल्यास अनुसरून बुऱ्हाणास विष देऊन मारलें.

इब्राहिम अदिलशहा निजामशाही राज्याच्या हितचिंतकांपैकीं एक होता व त्यानें मलिकंबरास पुष्कळ वेळां सहाय केलें होतें. परंतु पुढें मलिकंबरानें संधी साधून

आदिलशहास फार त्रास दिला. यामुळें निजामशाही घराण्याचा फडशा उडवावा असें इब्राहिमाच्या मनांत आलें होतें, पण तसें घडण्यापूर्वी इब्राहिम निवर्तला. पुढें महंमदशाहा व त्याचा वजीर मुस्तफाखान याच्याही मनांतून मोंगलांशीं सख्य करून निजामशाहीचा उच्छेद करावा असें आलें होते. इतक्यांत शेख मोइनुद्दीन नांवाचा वकील शहाजहानाकडून हि. १०३८ जमादिलावल (=१५५०पौष) मध्ये विजापुरास आला.ही संधी साधून मुस्तफाखानानें निजामशाही बुडविण्याचा सल्ला अदिलशहास दिला. याचें कारण मुस्तफा हा मलिकंबराचा जांवई होता, व अंबरास निजामानें मारविलें असा समज असल्यामुळें मुस्तफा व फत्तेखान यांनीं निजामशाही बुडविण्याचें योजिले होतें. त्यानें सुचविलें कीं, " आदिलशाही व मोगली सेनापतींनीं निजामशाही बुडवून तें राज्य दोघांनीं वाटून घ्यावें असें या वकिलाबरोबर शहाजहानास पत्र पाठवावें. " खवासखान, मुरारराव व रणदुल्लाखान याना ही मसलत आवडली नाहीं. निजामशाही राज्य बुडालें म्हणजे मोगली व अदिलशाही राज्याच्या सरहद्दी एकमेकांशीं भिडतील व त्यामुळें अदिलशाही राज्याचें अनहित होईल असा या मुत्सद्यांचा अभिप्राय होता. पण मुस्तफाखानाच्या आग्रहापुढें यांचे कांहीं चालले नाहीं. अंबरखान, अंकुशखान, घाटगे वगैरे सरदार बरोबर देऊन रणदुल्लाखानानें मोगलांच्या मदतीस जावें असें मुस्तफानें ठरविलें व या मजकुराचें पत्र देऊन दिल्लीच्या वकीलास रवाना केलें. पण थोड्याच दिवसांत अशी बातमी आली कीं, मोंगलांनीं सर्व करार मोडून त्यानीं आपला मोहरा सरहद्दीवरून फिरविला व ते धारूरच्या किल्यांत पोहचले आहेत! यामुळें मुस्तफाखानाचा सल्ला चुकीचा आहे अशी महंमदशहाची खात्री झाली; व त्याने मोंगलांचा वकील शेख मैनुद्दीन यास कैद करविलें.

यापूर्वी शहाजहान बादशहानें ख्याजा अबदुलहसन यास निजामशहाचा मुलूख हस्तगत करण्यासाठीं बऱ्हाणपुरावर नेमलें होतें. त्याने इरादतखानास परांड्याचा किल्ला स्वाधीन करून घेण्यास पाठविलें व नसरतखानाला कंधारावर नेमलें. इरादतखानानें पाहिलें कीं वेढा देऊन किल्ला लौकर स्वाधीन होणार नाहीं. तेव्हां तो तेथून निघून धारवाडचे किल्ल्यावर आला; आणि तो त्यानें हस्तगत केला. तिकडे नसरतखानानेंहि कंदाहारचा किल्ला घेतला.

इकडे असा प्रकार चालला असतां शेख मैनुद्दिनखान वकील यास कैद केल्याची बातमी शहाजहानास पोंचली. तेव्हां त्यानें नूरजहानचा भाऊ आसफखान याजबरोबर अनेक सरदार देऊन त्याना बऱ्हाणपुरास पाठविलें. तो बऱ्हाणपुरास येऊन पोचल्यावर अबदुलहसन व इरादतखान यांचें सैन्यहि त्यांच्या सैन्यांत मिसळून तें अहसनाबादेपर्यंत पोचले. तेथून असफखान थेट विजापूरा-

पर्यंत येऊन रंगाऱ्याच्या हौदावर उतरला. अदिलशाही व मोगली लष्करांची रोज मारामारी होऊं लागली. एका प्रसंगीं मोंगलाकडील शिकंदरअल्ली नांवाचा मोठा सरदार ठार झाला. त्या त्वेषानें मोगलांनीं वेढयाचें काम जारीनें सुरू केलें. परंतु अदिलशाही सैन्यानें शेवटीं मोंगलांना वेढा उठवून परत जाणें भाग पाडलें. या वेळीं मोगलांचा पाठलाग करण्याचें काम मुरारजगदेव याजकडे सोंपविण्यांत आलें; व मोगलांना विजापूरच्या हद्दाबाहेर घालवून तो परांड्यावर येऊन राहिला. अशा रीतीनें चार वर्षांत मुस्तफाखानाचे मोंगलासंबंधींचें धोरण उलटवून व मोंगलांशीं लढून खवासखान व त्याचा हस्तक मुरारपंत यानीं जय मिळवून दाखविला. ( मो. १६० ) असफखानाचा पराजय झाल्याचें वर्तमान शहाजहनास समजतांच त्यानें अदिलशहाचा सूड घेण्याचें काम मोहबतखानाकडे सोंपवून त्याला मोठ्या सैन्यानिशीं बऱ्हाणपुरास पाठविलें.

इकडे फत्तेखानानें बुऱ्हाणनिजामशहास मारल्यानंतर त्याच्या शहाहुसेन नांवाच्या सात वर्षांच्या मुलास निजामशाही पदावर बसविलें; व आपल्या विरुद्ध असलेले अनेक कारभारी व मुत्सद्दी काढून त्यानें दुसरे नेमले. तेव्हां जुन्या मुत्सद्यांना आपली अब्रू व जीव या राज्यांत सुरक्षीत नाहींत असें वाटून साबाजी आनंदराव वगैरे कांहीं पुढारी मोंगलाच्या आश्रयास गेले. शिवाय निजामशाही राज्यांत त्या वर्षीं पाऊस मुळींच न पडल्यामुळें दुष्काळानें लोकांची अन्नान्नदशा झाली. पण दौलताबादेंत मात्र फत्तेखानानें भरपूर अन्नसामुग्री साठवून ठेवली होती. अशा स्थितींत मोहबतखान चाळीस हजार सैन्यासह दौलताबादेस वेढा घालण्यासाठीं निघाला.

हें वर्तमान अदिलशहा यांनीं ऐकून फौजेसुद्धां मोहिमेस निघाले. मोहबतखान दौलताबादेस जाऊन तो शहरपन्हा घेऊन किल्ला घेण्याच्या तरतुदीत होता. आतून फत्तेखान यांनीं आदिलशहास पत्र लिहिलें कीं " आपल्याकडून कांहीं कुमक येऊन पोंहचली असतां परचक्राचा पराभव करून किल्ला पादशहाच्या ( आदिलशहाच्या ) हवालीं करतों. किल्ल्यांत सामान सरंजाम कांहीं नाहीं. " याजवरून पादशहा यानीं खवासखान यास ( फत्तेखानाकडे मदत पाठविण्याविषयीं ) सांगितलें. त्यांनीं आज्ञेप्रमाणें फौज व सामान मुरारपंतासमागमें देऊन रवाना केलें; आणि मुरारपंतास सांगितलें कीं " जातांच सामान पोंहचतें करून कुमक करावी; आणि कसेंहि करून दौलताबादेचा किल्ला मोहबतखा-

नाच्या हस्तगत होऊं देऊं नये. " मुरारपंत दौलताबादेजवळ जाऊन पाहचले.+ फत्तेखान यांनीं लढाई बंद केली; कारण फत्ते झाली असतां पादशाही (अदिलशाही ) पत्र मुरारपंताच्या नांवें येईल ! फत्तेखान यांनीं मुरारपंतास लिहिलें कीं किल्ल्यांत कांहीं जखीरा ( दाणावैरणीचा संग्रह ) व सामान नाहीं, तरी जलद पाठविणें. " मुरारपंतानीं लिहिले कीं " तुम्ही जखीरा मागण्याचें कारण काय ? तुम्हांस याविणे गरज नाहीं. किल्ला आमच्या स्वाधीन करून बाहेर जाणें; नाहींतरि तुम्हास कैद करून दौलताबादेच्या बुरजावरून खंदकात टाकवीन. " फत्तेखान यानीं मुरारपंत ऐकत नाहीं सबब मोहबतखान याजकडे मिळाले; आणि त्यास पत्र पाठविलें कीं " तुम्ही आमची कुमक केली असतां किल्ला तुमच्या स्वाधीन करतो. " त्याजवरून मोहबतखान यानीं विचार केला कीं "कांहीं प्रयत्न न करतां किल्ला हातास येतो" म्हणून पत्राचे उत्तर व क्रियाशफती देऊन " हरकामांत कुमक करितो " म्हणून सागून पाठविले. नंतर ( फत्तेखानानें ) किल्ला मोहबतखानाच्या स्वाधीन केला. तेथें आपल्या पुत्रास (इरादतखानास मो. १६३) ठेऊन आणि निजामशहा व फत्तेखान यास बरोबर घेऊन मोहबतखान बऱ्हाणपुरास निघाले. हे वर्तमान ऐकून अदिलशहानीं त्याच्या पाठीवर फौज दऊन सरदार रवाना केले. ते आल्यावर मोहबतखान यानीं द्रव्य देऊन आपली व लष्कराची मोकळीक करून घेतली आणि आपल्या सरहद्दींत पोहचले.

शहाजीमहाराज, मुरारपंत व रणदुल्लाखान मार्गे फिरून शहाजीमहाराज नाशिकाकडून भीमगडास गेले. रणदुल्लाखान व मुरारपंत त्र्यंबकाकडून, विजापुरास आले. निजामशाहीवर पादशहा नाहीं [ असें पाहून ] अदिलशहा व शहाजहान हे उभयतां तो मुलुख घेण्याची खटपट करू लागले. सिद्दी रेहान सोलापुरीं होते, शहाजीमहाराज भीमगडीं होते. श्रीनिवासराव जुनरास होते, सिद्दी साबा व युसफखान तळकोंकणात होते, सिद्दी अंबर जंजिरे–राजपुरींत होते आणि दुसरे किल्लेदार व जमिनदार आपापले ठिकाणीं प्रांत घेण्याच्या उद्योगांत होते. [ मो. ११७; हिं. ४७०; का. ४१०. ]

---

+ मुरारी फौजेसुद्धां दौलताबादेस पोचण्यापूर्वीं अदिलशहाकडील लोक पोचले होते, यामुळें त्यांना मुरारी येताच वाईट वाटलें. कारण मुरारीच्या व्यवस्थेस कोणीच अनुकूल नव्हतें. एवढ्याचकरितां त्या अमीर लोकांनीं ठरविलें कीं मुरारी येथे असेपर्यंत आपण युद्धच करूं नयें. कारण जय मिळाल्यास मुरारीनें यश संपादन केलें असें होऊन आमचें नांव मागें राहील. [ मो. १६३; हिं. ४६१ ]

शहाजीमहाराज भीमगडीं जातांच निजामशाही प्रांत (पुणें व चाकण पासून बालेघाटपर्यंत; जुन्नर, अहमदनगर, संगमनेर पासून नाशिक व त्र्यंबकपर्यंत) घेतला आणि सात आठ हजार स्वार ठेऊन प्रांत लुटूं लागले. [मोगलाकडील] इरादतखान ( महबतखानाचा मुलगा ) दौलताबादेस होते; त्यास मालोजी भोसले ( शहाजीचा चुलत भाऊ ) यांजकडून स्नेह केला आणि शहाजहान पादशहाच्या कृपेचें उपेदवार करून [ संभाजीच्या नांवे ] मनस ब बेवीस हजारी करार करून शहाजीमहाराजाच्या नांवें पादशही फर्मान व वस्त्रे आणून दिली आणि शहाजी महाराज ज्याप्रमाणे सांगतील त्याप्रमाणे दिल्लीहून आणवून देऊन,त्याना शहाजहानचे चाकर करून विजापूरकरांच्या ताब्यात गेलेला सर्व निजामशाही मुलूख मोंगलाकडे घ्यावा, असें इरादतखानाच्या चित्तात होते [का. ४११ हिं. ४७३; )

इतक्या श्रेष्ठत्वास शहाजी पावला तरी त्याची तृप्ति झाली नाहीं; तो मोठा मसलती, दूरवर विचार करणारा, हुषार व महत्त्वाकांक्षी असा त्या काळांतील अद्वितीय पुरुष होता त्याने मुरारीशीं गुप्त कारस्थान चालवून खवासखानाशीं बोलणें लाविलें कीं "निजामशाहींतील चौऱ्यांशीं किल्ल्यांपैकीं एक दौलताबादेचा किल्ला गेला म्हणून काय हरकत आहे ! जर जुन्नर सारखी तख्ताची जागा आपल्या स्वाधीन आहे तर तुम्ही मात्र मला सहाय व्हा, म्हणजे आपण होईल तितकी मेहनत घेऊन निजामशाही राज्याचा झेंडा फडकवूं " ही गोष्ट खवासखान व दुसरे अमीर लोक याच्या मनास आली. परंतु मुस्तफाखान या मसलतीस अनुकूल होईना. [ इकडे ] खवासखान दौलताबाद गेल्यामुळें खिन्न झाला होता; तशांत इरादतखानाशीं ( मोगलांशीं ) शहाजीचें सख्य झाल्याचें कळल्यावरून तो ( खवासखान ) संशयांत पडला होता. शेवटीं शहाजीनें सर्व संशयाचें निवारण करून सर्वांचीं मनें शुद्ध केलीं. तेव्हां शहाजीची मसलत फार चांगली व उपयोगी आहे असा विचार करून सर्वांनीं त्याच्या मसलतीस रुकार देऊन त्यास सहाय देण्याचें कबूल केलें. निजामशाही वंशापैकीं एखादा मुलगा आणून त्यास तख्तावर बसवून त्याच्या नांवें राज्य चालवावें असे ठरविलें; आणि मुरारीस फौज घेऊन शहाजीच्या मदतीस रवाना केलें. ( मो. १६८, हि. ४७४।७५ ).

शहाजी महाराज श्रीवर्धन किल्ल्याहून निघून कोंकणांत जाऊन निजामशाही वंश कैदेंत होतें त्यांतून दहा वर्षांचा मूल, मूर्तजा नामें होता, त्यास आणून भीमगडी, ( पेमगडीं ) येऊन तक्तावर बसविलें. नंतर शहाजी महाराजानीं श्रीनिवासराव यास मेजवानीस बोलावून कैद करून त्याजकडील किल्ले व प्रांत घेऊन मूर्तजा पादशहास जुन्नरास घेऊन येऊन द्रव्य व सरंजामहि बहुत संग्रह केला. दहा बारा हजार स्वार जमविले.

" हें वर्तमान मोहबतखान यास कळून तो बहुत क्रोधायमान झाला आणि त्यानें शहाजहान पादशाहाच्या आज्ञेवरून बऱ्हाणपुरास आलेल्या शाहाजादा दारा शुकोह याजकडून पराडा किल्ल्यास वेढा घालविला. किल्यांतील फौज तयार होऊन युद्ध करीत होती. असे चार महिने युद्ध चाललें. ते समयीं मोहबतखान यांनीं विचार केला कीं येथें बसून उपयोगी नाहीं; म्हणून कांहीं निमित्य करून बऱ्हाणपुरास गेले." (पत्रे, यादी वगैरे पृ. ४०७-४१२)

शहाजी भोसले यानें खवासखान व मुरारी यांच्या सहायानें निजामशहाच्या वंशापैकीं मूर्तिजा याला आणून पेमगड ( =शाहागड ) येथे तक्तावर बसवून दोन तीन वर्षे निजाम मूर्तिजाशहा याच्या नांवें राज्य चालविलें; आणि बरेंच लष्कर जमवून किल्ले व प्रांत घेण्याचा यत्न सुरू केला. इतक्यांत एकाएकी खवासखान व मुरारपंत मारले गेले; आणि मुस्तफाखान प्रबळ होऊन त्यानें शहाजी भोसल्याचे सर्व बेत फिसकटून टाकले. तो शहाजहान बादशहास मिळाला व शेवटीं शहाजीनें मूर्तिजा निजामशहास शहाजहान बादशहाच्या स्वाधीन केलें; तेव्हांपासून निजामशाहीचा मागमूसहि राहिला नाहीं. ( मो. पृ. १६४ व १७५ )

मुस्तफाखानानें आदिलशाहा व मोगल यांच्यांत हिजरी * १०४५ च्या जिल्हेज महिन्यांत ( शके १५५८ वैशाखांत ) मैत्रीचा तह घडवून आणला.

यानंतर शहाजहान बादशहानें खानजमान यास शहाजी भोसल्याचा बंदोबस्त करण्याच्या कामावर नेमलें. पण त्याच्या हातून तें काम निभेना. तेव्हां त्याच्या मदतीस अदिलशहाकडून रणदुल्लाखान, मलिक रयहान, सिद्दी मरजान वगैरे सरदार गेले. त्यांनीं शहाजीस माहुलीच्या किल्ल्यावर वेढलें असतां त्यांचा पराजय करण्याकरितां शहाजीनें पराकाष्ठेचा प्रयत्न केला; पण त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं तो तहास कबूल झाला. त्यानें मूर्तिजा निजामशहास खानजमानच्या स्वाधीन करून माहुलीचा किल्ला आदिलशहाकडे दिला; आणि आपण आदिलशहाची नोकरी पत्करली÷ ( मो. १७६; हिंदी बु. पृ. ४९४ )

विजापूरच्या इतिहासांत शहाजी संबंधींची माहिती काय आहे याचें दिग्दर्शन येथेवर केलें. याशिवाय मोगलाच्या इतिहासांत म्हणजे 'बादशाहनाम्यांत' असलेली हकीकत प्रो. सरकार, कै. खरे. व प्रसिद्ध सं. राजवाडे यांनीं मांडली असल्यामुळें ती येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. पण बादशहानाम्यासंबंधीं एक दोन विशेष गोष्टी नमूद करणें अवश्य आहे. त्या अशा कीं, त्यातील हकीकत जुलूसी (म्हणजे

---

*शके १५५८ वैशाख शु० १२ ( स० औ. च. पृ. ३४ )

÷ शके १५५८ कार्तिक. ( स. औ. चं. पृ. ४१ )

राज्याभिषेकाच्या ) सालवारीनें लिहिलेली आहे. शहाजहान हि. १०३७ जमादिलाखर मध्यें गादीवर बसला; तेव्हांपासून पुढच्या जमादिलाखरापर्यंत एक वर्षाची हकीकत, जुलूस वर्ष पहिलें, या सदराखालीं दिलेली आहे. यानंतर प्रत्येक वर्षाची हकीकत जुलूस वर्ष अमूक या सदराखालीं आहे. दुसरें असें कीं मोंगली दरबारांतील कागदावरून मोंगलांच्या हालचाली वर्णन करणें हा सदर लेखकाचा मुख्य हेतु आहे. त्यांत शहाजी, जाधवराव, मलिकंबर वगैरे दक्षिणेकडील व्यक्तींची हकिकत आली असली तरी ती जेथल्या तेथेंच आली आहे असें निश्चयाने म्हणतां येत नाहीं. कित्येक ठिकाणीं तर प्रस्तावनेदाखल बरीच मागली हकीकत सांगून नंतर, अशा परिस्थितींत असलेल्या अदिलशाही अगर निजामशाही राज्यावर मोगली बादशहांचा हल्ला झाला, असें सांगण्याचा या लेखकाचा रोख स्पष्ट आहे. तथापि हे दोष असूनहि महाराष्ट्राचा इतिहास लिहिणारास हे मुसलमानी लेख जमेस धरले पाहिजेत; कारण शहाजीची हकिकत मराठींत सांगणाऱ्या एकुणएक बखरी उत्तर पेशवाईतल्या आहेत व बखरकारांना संशोधनाची पद्धति माहित नव्हती, यामुळें त्यांचें लिहिणे विश्वसनीय धरतां येत नाहीं. ( पृ. २१२—२१८ पहा. )

बादशाहानाम्याचें इंग्रजी भाषांतर इलियट व डॉसनकृत हिंदुस्थानच्या इतिहासांत सातव्या खंडांत दिलेलें आहे; पण तें संपूर्ण नाहीं; कांहीं निवडक भागाचें आहे; आणि मधून मधून शहाजीसंबंधाचा कांहीं भाग गाळलेलाहि आहे. प्रो. सरकार यांनीं मूळ फारशी ग्रंथ वाचून शहाजीचें चरित्र स. १९१७ सालीं मॉडर्न रिव्ह्यूच्या सप्टंबरच्या अंकांत दिलें होते तेंहि या कामीं जमेस धरलें पाहिजे. त्यात त्यांनीं इ. स. १६३० पासून १६३५ पर्यंतच्या कित्येक गोष्टींचा काल ठरवून त्या सर्वांच्या पुढे शंकाप्रदर्शक प्रश्नचिन्हें घातलीं आहेत. तथापि या शंकांचा अर्थ इतकाच कीं त्यांतील विशिष्ट गोष्टींच्या कालनिर्देशांत एखाद्या वर्षाची चूक असणें शक्य आहे. जेथें लेखकानें स्पष्ट वर्ष व मिती दिली असेल तेथें ती ग्राह्य आहेच. पण जेथें स्पष्ट उल्लेख नसून हकीकत सांगण्याच्या ओघांत कालाचे मोघम उल्लेख आहेत तेथेंच तर्काचा प्रसंग असतो; व तर्कानें, ही हकीकत घडण्याची नेमकी मिती अशा ठिकाणीं ठरवितां येत नाहीं; फक्त सामान्य कालावधि निश्चित करतां येतो.

बादशहानाम्याची ही जी स्थिती तीच जेधे शकावलीसंबंधीं कांहीं बाबतींत आहे हें विसरतां कामा नये. जेधे शकावलीकारानें नोंद करतांना कालनिर्देश चार प्रकारांनीं केला आहे. (१) नुसता शक; ( २ ) शक व महिना; ( ३ )

शक महिना व तिथि; आणि (४) शक, महिना, तिथि व वार.* पैकी चवथा प्रकार गणितानें तपासून खात्री करून घेतां येते; व वारापर्यंत नोंद करण्याचा लेखकाचा हेतु असून त्याला तशी म्हणजे चौथ्या प्रकारची नोंद करण्यास लागणारे अस्सल मराठी कागद मिळाले होते असें म्हणतां येतें. पण जेथें नुसता शक किंवा शक व महिना इतकीच माहिती शकावलींत नमूद आहे त्या ठिकाणीं म्हणजे ( १ ) व ( २ ) प्रकारांत शकावलीकारास सूक्ष्म माहिती मिळाली नाहीं असेंच म्हणावें लागतें; व सूक्ष्म माहितीच्या अभावीं स्थूलमानानें हिजरी सन देणारें टांचण पाहून शकावलीकारानें ही नोंद केली असली पाहिजे. नुसता शक असेल त्या ठिकाणीं तर या कारणामुळें फारच सावधगिरी ठेवली पाहिजे. कारण तेथें सूक्ष्म माहिती मिळाली नाहीं ही शकावलीकाराचीच कबुली आहे. एवढेंच नव्हे तर, जो शक दिला आहे तो देखील त्यानें तत्कालीन सनावरून तयार करून दिला असला पाहिजे. शहाजहान व शहाजी यांच्या या वेळच्या दहावीस वर्षांतल्या हालचालींच्या कालनिर्देशासंबंधीं एक महत्वाची गोष्ट अशी आहे कीं, ते निर्देश कधीं सुहूरसनांत, तर कधीं हिजरींत असतात. पण या नंतरच्या काळांत म्हणजे शिवाजी महाराजांचा स्वराज्याचा प्रयत्न सुरू झाल्यापासून पूर्वींच्यापैकीं फक्त सुहूर चालू राहिला; आणि त्याखेरीज फसलीत व शालिवाहन शकांत कालनिर्देश करण्याची पद्धति जारी झाली. पैकीं फसलीची गणना तर महाराष्ट्रांत नव्यानेंच चालू झाली व ती सोईची असल्यामुळें पेशवाई अखेर सरसहा चालू होती. हिजरी मात्र शिवशाहींत अगदीं मागें पडला. त्याची माहिती विजापुरी व मोगली दरबाराशीं पत्रव्यवहार करतांना अप्रत्यक्षपणें कांहीं लोकांना असेल; पण सामान्य लोकांना हिजरीचें रूपांतर शकांत कसें करावें याची बिनचूक माहिती असणें अशक्य होतें. मुसलमानी सनांपैकीं हिजरी सनाची बाब अशी आहे कीं, तिनें बहुतेकांना घोटाळ्यांत पाडलें आहे. या सनाचें, सुहूरप्रमाणें इसवींत अगर शकांत रूपांतर करण्याचा सोपा नियम नाहीं. आणि त्यामुळें सन शकासंबंधीच्या चुका झाल्या आहेत, हे अनेक पुराव्यानीं सिद्ध करतां येतें.

उदाहरणार्थ, मोडकांचा विजापूरचा इतिहास घेऊं. हेच उदाहरण घेण्याचें कारण मोडक हे जंत्रीच्या कामांत माहीतगार होते. कोणत्या सनांत किती मिळविलें म्हणजे शक अगर इ. सन होतो वगैरे बाबतीचा विचार त्यांनीं जंत्री तयार करतांना केलेला होता. असें असून त्यांच्या

---

*याखेरीज तिथि, वार, नक्षत्र, योग यांच्या घटकांसहित सूक्ष्म कालनिर्देश कांहीं ठिकाणीं जेथें शकावलीकार अचूक करतो; ही गोष्ट येथें मुद्दाम नमूद करणें इष्ट वाटतें. कारण त्यावरून अशा गोष्टी घडल्या त्याच काळचीं सूक्ष्म नोंदींचीं टिपणें शकावलीलेखकांस मिळालीं असलीं पाहिजेत हें उघड आहे.

हातून शहाजी व शहाजहान यांच्या हकीकती देतांना उघड उघड चुका झाल्या आहेत. त्यांचें स्वरूप असें आहे. शालिवाहन शकांत ७८ मिळवून इ.स. येतो; पण माघ किंवा फाल्गुन महिना असल्यास ७९ मिळवावे लागतात; यामुळें शक+७८ किंवा ७९ = इ. स. असा नियम घ्यावा लागतो. सुहूरसनाच्या व फसलीच्या बाबतींतही असाच नियम सांगतां येतो; पण हिजरीच्या बाबतींत मात्र याच्याहि पुढें जाऊन तिहेरी आंकडा घ्यावा लागतो. शके १५००–१६०० पर्यंतच्या कालांतील हिजरीचा शक करणें झाल्यास त्याची सारणी अशी मांडावी लागेल;

हिजरी +५१० किंवा ५११ किंवा ५१२=शा. शक. आणि ५१० केव्हां मिळवावे व ५११ किंवा ५१२ केव्हां मिळवावे याचा निर्णय करण्यास अधिक महिन्याच्या गुंतागुंतींतून बरेंच गणीत करावें, तेव्हांच पल्ला गांठता येतो. पण हें कांहींच न करतां सरसकट ५१२ मिळवून शक काढण्याचा म्हणजे (५१२+७८=) ५९० मिळवून इ. स. काढण्याचा धोपट मार्ग मोडकांनीं पत्करला आहे; व त्यामुळें त्यांच्या हातून चुका झाल्या आहेत त्यांचीं तीन चार उदाहरणें प्रस्तुत प्रसंगासंबंधाचींच देतों.

पृ. १४७; हिजरी सन १०३३ (इ. स. १६२३) मोंगल व विजापूरकर अहमदनगरावर चालून गेले. येथें हि. स. १०३३=इ. स. १६२४ पाहिजे.

पृ. १४७ हि. स. १०३४ (इ. स. १६२४) मलिकंबर विजापुरावर चालून गेला. येथें इ. स. १६२५ पाहिजे.

पृ. १४८ हि. स. १०३५ (इ. स. १६२५) त मलिकंबर मरण पावला येथें इ. स- १६२६ पाहिजे.

यावरून ५९० मिळविण्याचा नियम मोडकांच्या ग्रंथांत एका वर्षानें नेहमीं चुकतो असें कोणी म्हणेल तर तेंहि खरें नाहीं; कारण पृ. १५३ वर महंमद गादीवर बसल्याचा हिजरी सन १०३७ म्हणजे १६२७ असें म्हटलें आहे तें बरोबर आहे. सारांश, महिना माहीत नसतां इ. स. चा नक्की शक सांगतां येत नाहीं; पण ७८ किंवा ७९ मिळवावे असें निश्चयानें म्हणतां येतें. पण हिजरीच्या वेळीं महिना माहीत असूनहि त्याचा शक व हिंदी महिना किंवा इ. स. बिनचूक सांगणें फार कठीण असतें.

ही चूक मोडकांच्याच हातून झाली असें समजण्याचें कारण नाहीं. ग्रँट डफ ऐतिहासिक माहिती मिळविण्यासाठीं खुद्द विजापूरास गेला असतां तेथल्या अत्यंत माहितगार मुसलमान वृद्ध गृहस्थानें तयार केलेला विजापूरचा इतिहास त्यानें पाहिला; तेव्हां देखील या वृद्धाच्या हातून हिजरीच्या रूपांतराचा घोटाळा

झालेला आहे अशी तक्रार त्याला करावी *लागली. खुद्द शिवकालीन शकावलीकारांतहि कांहीं ठिकाणीं मतभेद कां आहे याचा खुलासा यानें चांगला मिळतो. राज्याभिषेक शकावलींत ' फत्तेखानास सोडून मजालसी दिल्ही ' ( पृ. ५४ पहा ) ही गोष्ट शके १५५१ मध्यें नमूद आहे; पण राजाराम शकावलींत म्हणजे जेधे शकावलींत (पृ १६ पहा ) तीच गोष्ट शके १५५२ मधली म्हणून दिली आहे; आणि प्रो. सरकार यानीं ती (इ. स. १६३१ ) शके १५५३ मधली ठरविली आहे. याचें कारण ही गोष्ट ज्या अस्सल कागदाच्या आधारावर लिहिण्यांत आली त्यांत हिजरी १०४१ असें आहे; व त्याचें शकांत रूपांतर करतांना एकानें ५१० दुसऱ्यानें ५११ आणि तिसऱ्यानें ५१२ मिळविले. सूक्ष्म तिथिवार देणारी शहाजीकालीन जंत्री हातीं नसता ढोकळ मानानें हिजरीचा शक करूं गेल्यास असा तिहेरी मतभेद होणें अपरिहार्य आहे.

हा उहापोह येथें करण्याचें कारण एवढेंच कीं,जेधे वगैरे शकावलींत जेथे तिथिवार नक्षत्रापर्यंत सूक्ष्म माहिती दिली असेल तेथें ती गणिताचा पडताळा पाहिल्यानंतर अस्सल जन्म टिपणांवरूनच बिनचूक दिली असली पाहिजे, अशी आपणांस खात्री देतां येते. कारण, नक्षत्रादिक माहिती मुसलमानी कागदांतून असणें शक्य नाहीं;पण निजामशाही,अदिलशाही, मोगली व शहाजीविषयक राजकीय घडामोडींचें काल देतांना शकावलीकारांपुढें प्रामुख्यानें हिजरी सनाचे उल्लेख असलेले कागद होते व त्यांना त्यांचें शकात रूपांतर करावें लागलें; यामुळें कांहीं ठिकाणीं शकावलींकारांत मतभेद निर्माण झाला व चुकाहि झाल्या असण्याचा संभव आहे. अशा स्थितींत मोगली मोहिमांच्या काल निर्णयांत शकावलीकारांपेक्षा मूळ आधारावर म्हणजे मोगली लेखकावर अधिक विश्वास ठेवणें न्याय्य आहे. उदाहरणार्थ, शहाजहानाचा राज्याभिषेक जेधे शकावलीकारानें शके १५५०त

---

* A History of Beejapoor, written by Syud Moideen Peerzaduh, suggested by numerous inquiries put to him by English officers, who have been much in the habit of visiting Beejapur since the last Mahratta War. It was finished in January 1821 and although great pains have been taken, the author's dates, by confusing the *Sour Sun* and Heej ree eras, are frequently much misplaced. His industry however is very commendable.

[ Grant Duffs History of M. 3rd edition p. 45 Note ]

दिला व दिल्लीच्या समकालीन इतिहासकारानें १५४९त दिला; तर १५४९ हाच ग्राह्य मानला पाहिजे; त्याचप्रमाणे शहाजी आदिलशाही नोकर बनल्याचा काल शकावलींत १५५७ आहे पण मोगलाच्या आधारावरून तो १५५८ म्हणावा लागेल. हा विषय यापेक्षां विस्ताराने मांडण्याचें हें स्थळ नसल्यामुळें येथे दिग्दर्शन मात्र करून हा विषय येथे संपवितों.

---

## ३४ तंजावरचा शिलालेख.

( शिवजन्म विषयक भाग. पृष्ठें १२–२५ राजवाडे प्रत )

तदनंतरें शाहाजी राजे, विजयदुर्ग म्हणावेंयाचें विजापुरांत अस्ते दिवसांतच, त्यांचे दुसरे स्त्री जिजाईचे उदरी शालिवाहन शके १५५७ अक्षय संवत्सर प्रथम पुत्र संभाजी राजे जन्मले। त्यामागूनहि क्रमें कडून चौघे पुत्र जाहले परंतु वर्धमान दशेस पावले नाहींत। ऐसें अस्तां देवदुर्गचे राज्य करणार निजामशाहाचा सेनापति, शाहजी राजासी मत्सर केला तो, अंबरखान देवगतीस पावला। येथें विजापुरांत अल्ली यदलशहाचा बाप इभराईमखान तोहि दैवगतीस पावला। तेव्हां दिल्लेश्वर ऐसा जहांगीर पादशहानें......निजामशहाची चर्या नीट नाहीं ऐशा समयांत त्याजवरी राजकारण केलिया स्वाधीन होईल म्हणून तजवीज करून निजामशहावरी युद्धास सैन्य देऊन दर्याखान म्हणार सरदारास पाठविलें। हें वर्तमान निजामशहास कळून निजामशहानी " आम्हाकडील शहाजी राजे व यादव राजे उभयताहि आम्हांकडून गेल्याकरितां म्हणे पराजय हीं आला आतां ही दर्याखानानें चाली केली आहे"। आतां सर्व प्रयत्न कडून शाहजी राजे व यादव राजे उभयतांस हीं अंतरंगें कडून संविधान पाठविलें; त्यावरून यादव राजे मोगलाचे इलाखेत होते तेहीं व शाहजी राजे विजापुरांत होते ते हीं उभयतां निजामशहाची मुलुक देवागिरी समीप धारागिरी म्हणावयाचे स्थलास येऊन पावले। त्या धारागिरी समीप शिवनेरीगड म्हणून येक स्थळ; त्या शिवनेरीगडचा यजमान, विश्वासराय याच्या वंशांत जन्मला तो विजय राजा म्हण्णार; त्या शिवनेरी गडचे राज्य करीत होता। त्या विजय राजानी " आपली कन्या जयंतिबाई म्हणारीस शाहजी राजाचे ज्येष्ठ पुत्र संभाजी राजास देतों " म्हणून सांगून पाठविले; तेव्हां शाहजी राजांनी, त्या मुलीस व आपले पुत्र संभाजी राजासही घटीत पाहून, तदनंतरें विजापुरांतून आपल्या संसारास हीं बलाऊन पाठऊन, शिवनेरीगडास जाऊन, संभाजी राजाची लग्नसिद्धी केले। तेव्हां निजामशाहानी शाहजी राजास मोगलाची

फौज घेऊन येणार दर्याखावनरी, आपल्या स्तोमकडून जा म्हणून निरोपून, यादव राजास " आपल्या भेटीस या " म्हणून बलाऊन पाठविले। तेव्हां शाहजी राजाची दुसरी स्त्री जिजाईबाई साहेब पूर्ण गर्भ होते; त्यांस व कित्तेक सैन्यहीं त्यांचे रक्षणास शिवनेरीगडांतच ठेऊन, वरकड सैन्यानिशीं आपण दर्याखानाचे मोकाबिलेस गेले। गेल्या ठाई दर्याखानासी युद्ध करून, मोगलाची फौजा समवेत दर्याखानास पळऊन, जय पाऊन, शाहजी राजे परतून शिवनेरी गडास येतो, इतक्यांत जिजाबाईसाहेब यांस पूर्ण गर्भ होता तो शालिवाहन शके १५५१ त्यास इंग्रजी वर्ष सन् १६२८ इसवी प्रमोदूत सवत्सरी प्रसव होऊन पुत्रोच्छव जाहला। सवेंच शाहजीसाहेब यांचे पोटी पुत्रसंतान जाहले। त्या पुत्रास येकोजी राजे म्हणून नाव ठेविले। हे येकोजी राजे वंशात चारे येकोजी राजे जन्मले ते। शालिवाहन शके १५५२ प्रजोत्पति संवत्सर पेसजी शाहजी राजांनीं निजामशहाचे साहायास्तव शिवनेरीगडांत आपल संसार ठेऊन, मोंगलाचा सरदार दर्याखानावरी जाऊन, लडाई करून त्या दर्याखानास पळऊन आले होते कीं तो दर्याखान शाहाजी राजाकडून पराजय पाऊन माघारला। तो पलीकडे न जातां तासी नदीतीरीतच आपल्या फौजेनिशीं राहिला होता। त्यातें या निजामशहाची अव्यवस्थ स्तिति व यादव राजे स्वर्गस्थ जाहले ते विध, शाहजी राजे निश्चयेकडून विमनस्क होऊन स्वस्थळास जाऊन पावल ते, असें हे समग्र कळून घेतल्यावरी "आता निजामशहाचे राज्य स्वाधीन करूय्ये" म्हणावयाचा दृढ बुद्धीनें निजामशाहावरी चालि करून आलो।

---

## ३५ शिवभारतांतील शिवजन्म प्रसंग

( ले. स. मा, दिवेकर व द. वि. आपटे )

शिवचरित्रावर प्रकाश पाडणाऱ्या अनेक शकावल्या उपलब्ध झाल्या आहेत; पण शहाजीच्या चरित्रासंबंधानें तसें म्हणतां येत नाहीं. कारण प्रस्तुत शकावल्यांत येणारे शहाजी विषयक उल्लेख फार त्रोटक आहेत व मुसलमानी ग्रंथांतील हकीकतहि तितकी समाधानकारक नाहीं. पण शिवभारत उपलब्ध झाल्यापासून ही उणीव भरून काढण्याचें एक उत्तम साधन निर्माण झालें आहे. या ग्रंथांत शिवचरित्रविषयक अनेक प्रसंगांची हकीकत शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरूनच दिलेली असल्यामुळें ती पूर्णपणें विश्वसनीय आहे. त्यापैकीं येथें शिवजन्मविषयक भाग सारांश रूपानें संदर्भासाठीं दिला आहे. शिवभारत लौकरच प्रसिद्ध होणार असल्यामुळें विस्तरशः हा भाग वाचूं इच्छिणाऱ्याचीहि सोय होणार आहे.

भातवडीच्या युद्धांत मलिकंबराला मोगली व अदिलशाही सैन्यावर जय मिळविता आला हें भोसल्यांच्या बाहुबलाचें फळ होतें. पुढें खेळोजी वगैरे विठोजीचे मुलगे भाऊबंदकीमुळें शहाजीचा फार द्वेष करूं लागले; व त्यांनीं मलिकंबराचा आश्रय केला. अशा रीतीनें आपल्या घराण्यांत फूट उत्पन्न झालेली पाहून शहाजीनें मलिकंबर, निजाम व आपले चुलत भाऊ यांचा तिरस्कार करून आपल्या जहागिरीकडे प्रयाण केले.

भेद पाडण्यास ही संधी चांगली आहे असें पाहून निजामशाहाची स्पर्धा करणाऱ्या आदिलशहाने शहाजीस आपणाकडे आणवून तो स्वतःस अजिंक्य मानू लागला. शहाजनिहि मलिकंबराचा पराभव करून दाखविला; निजामशहाचा गर्व जिरविला; मुधोजी फलटणकरावर स्वारी केली; आणि कर्नाटक व केरळ प्रांतावर मोहिम करून इब्राहिम अदिलहाचें राज्य वाढविलें. यानंतर मलिकंबर मरण पावला व निजामशहाला दुसरा चागला प्रधान न मिळाल्यामुळें आपलें राज्य कसें टिकतें याची शंका झाली; विजापुरास शहाणा इब्राहिम अदिलशहा दिवंगत होऊन त्याचा उन्मत्त मुलगा महंमद त्याच्या गादीवर आला; तसेंच शहाजहान दिल्लीचा बादशहा झाला व त्याचें सैन्य दक्षिण जिंकण्यासाठीं आलें. अशा वेळीं आपला पुरातन संबंध ओळखून निजामशहाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें बलाढ्य शहाजी राजा विजापूर सोडून त्याच्याकडे आला. जाधवराव देखील मोगलाची बाजू सोडून दौलताबादेस निजामशहाकडे आला.

दरम्यान विजयराज नांवाचा निजामाचा विश्वासू सरदार शिवनेरीस रहात होता त्यानें आपली जयंती नांवाची मुलगी शहाजीचा पुत्र संभाजी यास देऊ केली. शहाजीलाहि हा शरीरसंबंध इष्ट वाटला; आणि हा लग्नसमारंभ शिवनेरी किल्यावर मोठ्या थाटाने झाला. नंतर कांहीं दिवसांनीं आपल्या गरोदर पत्नीस स्वजनासह त्याच किल्ल्यावर ठेऊन शहाजी राजा दर्याखानास जिंकण्यास निघाला.

गर्विष्ट अशा दर्याखान पठाणाबरोबर निकराचें युद्ध करण्यासाठीं शहाजी परप्रांतीं गेला असतां देवावर अनुग्रह आणि दैत्यांचा निग्रह करण्यासाठीं जगत्प्रभूनें भोसल्यांच्या कुळांत शके १५५१ फाल्गुन कृ. ३ रोजीं रात्रीं अवतार घेतला. त्या प्रभूचें जातकर्म पुरोहितानीं केलें. शिवनेरी किल्ल्यावर त्या पुरुषश्रेष्टाचा जन्म झाला, म्हणून त्याचें 'शिव' असें नांव ठेवलें. पुढें त्या बाळकांस सूर्यदर्शन करून उपवेशन व अन्न प्राशन हे संस्कार यथाविधी व यथाक्रम करण्यांत आले. नंतर दर्याखानास आपल्या बाणांनीं विद्र करून आणि त्याचा गर्व हरण करून विजयी होत्साता शहाजी राजा शिवनेरीस आला; व त्यानें शिवाजीचें मुखावलोकन केलें.

इकडे मोंगलांची बाजू सोडून जाधवराव निजामशहाकडे आल्यानंतर निजामशहाची बुध्दी फिरली. त्यानें हमीदादि दुष्ट सेनापतींच्या सल्ल्यानें जाधवरावास कैद करण्याचे योजिले; आणि जाधवराव मुजरा करण्यासाठीं एकदां दरबारांत आला असता निजामशहानें त्याचा अपमान केला; व त्यामुळें तो संतापला. अशा स्थितींत मारेकऱ्यांनीं त्याला दारापाशीं गांठून ठार केलें.

सासऱ्याची ही गति ऐकून शहाजीनें निजामास सहाय करण्याचें सोडून दिलें. नंतर तापी नदीच्या तीरावरून त्वरेनें आलेल्या मोगलांच्या सैन्य नें दौलताबादेस वेढा दिला. त्याच वेळीं अदिलशहानेंहि दौलताबादेवर सैन्य पाठविले. यामुळें शहाजहानाच्या व महंमूद आदिलशहाच्या सैन्यामध्यें दररोज लढाई होऊं लागली. स्वतः निजामशहा देवगिरीच्या माथ्यावरून या दोन्हीं सैन्याशीं लढत असे; पण शेवटीं निजामशहाचा अदिलशहाकडून व मोगलाकडून पराभव झाला. तेव्हां तो आपला परिवार, विपुल खजीना व मंत्री फत्तेखान यांसुध्दां मोगलाच्या स्वाधीन झाला.

निजामशाही राज्य बुडण्याचीं कारणे अशीं आहेत कीं, मलिकंबरानंतर फत्तेखानाच्या अमदानींत जनतेला फार पीडा झाली; पुढे हमीदाच्या सल्ल्यनें जाधवराव मारला गेला तेव्हा शहाजीप्रभृति सर्व मराठे व मुसलमानी सरदार याचीं मनें विटून गेलीं; त्यापैकीं कित्येक अदिलशहास मिळाले व कित्येकानीं दिल्लीच्या बादशहाचा आश्रय केला; आणि कित्येक तर तटस्थ राहिले. शिवाय अवर्षणानें लोकाचे फार हाल होऊं लागले; अत्यंत महागाई झाली; पशूस पशू व माणसास माणसें खाऊं लागलीं ! अशा रीतीनें भयंकर अवर्षण, परचक्र आणि पिढीजाद जुन्या प्रधानांचा व विपुल सैन्याचा अभाव, या कारणांनीं क्षीण झालेले निजामशहा व फत्तेखान मोंगलांच्या हातीं सापडले. हा विपरीत काळाचा प्रभाव आहे.

पुढे देवगिरी प्राप्त झाल्यामुळें दिल्लीच्या बादशहास आनंद झाला व विजापूरच्या महंमदशहास विषाद वाटला; अशा संधींत निजामशाही राज्यांतले शिवनेरी वगैरे किल्ले, गोदावरी, प्रवरा, नीरा, भीमा यांच्या काठचा व सह्याद्री लगतचा कांहीं प्रदेश शहाजीने हस्तगत केला. त्यावेळीं घाटगे, काटे, महाडीक मोहिते, घोरपडे, वगैरे अनेक महाराष्ट्रीय राजे त्याला मिळाले. तेव्हां शहाजहाननें अदिलशहाबरोबर तह केला व त्यानीं भीमा नदी ही परस्परांच्या मुलखांतली हद्द ठरविली. शहाजीनें आदिलशाही व मोगली सैन्याशीं तीन वर्षें युध्द केलें. नंतर " यवनाचा संहार करण्याचें काम शिवाजीच्या हातून व्हावयाचें आहे; तुझ्या हातून तें होणार नाहीं " असा दृष्टात शहाजीला स्वप्नांत झाल्यावरून त्यानें आपला देश वगळून राहिलेल्या निजामशाहीच्या राज्यापैकीं

कांहीं मुलूख दिल्लीच्या बादशहास व कांहीं अदिलशहास दिला. शहाजी हट्टी स्वभावाचा होता तरी शंकराच्या आज्ञेवरून त्याला आपला हट्ट सोडून दिल्लीचा बादशहा व अदिलशहा यांच्याशीं तह करावा लागला.

त्यानंतर मोंगऱ्यांचे सैन्य परत फिरलें तेव्हां अदिलशहाला मात्र असें वाटलें कीं "ज्या सामर्थ्यवान मोगलांनीं निजामशहास युध्दांत बुडविलें ते मलाहि बहुधा बुडवितील. म्हणून शहाजीस मदतीस घेऊन मी आपले इष्टकार्य साधीन. पूर्वी माझा बाप इब्राहीम शहाजीच्याच सहायानें शत्रूंचा विध्वंस करून निश्चिंत होता; पण त्याच्या मृत्यूनंतर मीं त्याचा मूर्खपणानें अपमान केल्यामुळें तो मानी शहाजी मला सोडून गेला. इब्राहीम शहाजीवर मजपेक्षां अधिक प्रेम करीत असे; व त्यानें त्याला चांगल्या योग्यतेस चढविलें होतें." असा विचार करून महमूदशहानें लागलीच शहाजीकडे आपले अमात्य पाठविले. त्यांनीं शहाजीचें मन वळवून त्याला अदिलशाहाकडे नेलें. तेव्हां महमूदशहानें आनंदित होऊन शहाजीस रणदुल्लाखानासह कर्नाटक प्रांत जिंकण्यास पाठविलें.

---

# ३६ शिवाजी महाराजांची खरी जन्मतिथी

**एकश्चन्द्रस्तमो हन्ति न च तारागणोऽपि च ।**

सुभाषित.

१ **पूर्वेतिहासः**—श्रीशिवाजी महाराजांचा जन्मकाल आधुनिक चिकित्सक पद्धतीनें ठरविण्याचा पहिला प्रयत्न सुप्रसिद्ध इ. सं. वि. का. राजवाडे यानीं चौथ्या खंडांत प्रस्तावनालेखनप्रसंगीं पचवीस वर्षांपूर्वी शके १८२२ मध्यें केला; आणि कै. लोकमान्यांनीं या पद्धतीची शास्त्रशुद्धता सदर खंडाच्या परीक्षण प्रसंगीं केसरींतील लेखांतून त्याचवेळीं जाहीर रीतीनें मान्य केली. त्यापूर्वीपासूनहि ही जन्मतिथी वैशाख शुद्ध २ शके १५४९ अशी असली पाहिजे असें सामान्यतः मानण्यांत येत होतें. 'सामान्यतः' असें म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, **त्यावेळीं देखील जन्मतिथीबद्दल एकवाक्यता नव्हती**. राजवाडे यानीं वैशाख शु. ५ विश्वसनीय धरली; लोकमान्यानीं वैशाख शु. प्रतिपदा ही शिवजन्मतिथी असली पाहिजे, असें प्रतिपादन केलें आणि सामान्य लोक द्वितीया खरी असें समजून त्या तिथीस उत्सव करीत राहिले. असा मतभेद होण्याचें कारण त्यावेळीं या प्रश्नाचा निर्णय करण्यास जो पुरावा उपलब्ध होता तो अपुरा व अविश्वसनीय असा होता. आणि याच कारणामुळे "आजच्या अंकांत उपस्थित केलेल्या वादाचा निकाल लागण्यास आणखी थोडा काळ गेला पाहिजे" असा इषारा देऊन ठेवणें लोकमान्यांना आवश्यक वाटलें. पण हा 'थोडा काळ' म्हणजे

किती वर्षे याची कल्पना त्यावेळीं कोणासच करतां येण्याजोगी नव्हती; ही केवळ योगायोगाची गोष्ट होती.

२ **खऱ्या तिथीचा उदयः**—त्यानंतर सोळा वर्षांनीं भा. इ. सं. मंडळाच्या चतुर्थ संमेलन प्रसंगीं लोकमान्यांनीं 'जधे शकावली' पुढें मांडल्यामुळें हा यागायोग जुळून आला. वस्तुतः हा योग या पूर्वीं ९।१० वर्षें येण्याजोगा होता; कारण कै. दयाजीराव सर्जेराव ऊर्फ दाजीसाहेब जेधे देशमुख यानीं आपल्या संग्रहांतली ही शकावली शके १८२८ च्याच सुमारास लोकमान्यांच्या स्वाधीन केली होती. परंतु लोकमान्यांवर त्या सुमारास कारागृहाचा प्रसंग आल्यामुळें शकावलीच्या प्रसिद्धीकरणाचा योग ते कारागृहांतून परत येईपर्यंत येऊं शकला नाहीं. अशीच चुकामूक राजवाडे यांच्याहि बाबतींत यावेळीं घडून आली. त्यांनीं अठराव्या खंडांत पुण्याच्या होनप देशपांड्यांच्या संग्रहांतली जी एक शकावली शके १८३६ मध्यें छापली ती, जेधे शकावली प्रमाणें शिवचरित्रांतील सूक्ष्म मित्या देणारीच आहे; व तिच्यांत शिवजन्मतिथि जेधे प्रमाणेंच असली पाहिजे, असें आपण आता, तिच्या दुसऱ्या उपलब्ध प्रतीवरून, निश्चयानें म्हणूं शकतों. पण राजवाडे यांच्या हातीं आलेली शकावली त्रुटित असून तिचा प्रारंभीचा भाग फाटून गेला होता; यामुळे त्यांत शिवजन्मतिथि प्रसिद्ध होऊं शकली नाहीं.

अशा रीतीनें होनप शकावलीचा प्रारंभीचा भाग फाटल्याने व जेधे शकावली लोकमान्यांच्या कारागृहवासानें अप्रकाशित राहिल्यामुळें खरी शिवजन्मतिथि शके १८३८ पर्यंत लोकांपुढें येऊ शकली नाहीं. आणि ती लोकांपुढें मांडताना देखील लोकमान्यांना " प्रसिद्ध व अप्रसिद्ध बखरींत या जन्मतिथीबद्दल अत्यंत विसंगतता आहे; सबब या बाबीचा जितका जास्त खल होईल तितका पाहिजेच आहे; " एवढें नमूद करण्यापलीकडे कांहीं अधिक करतां आलें नाहीं. याचें कारण हा खल करण्यास लागणारी साधनसामुग्री त्यावेळीं उपलब्ध नव्हती. पण जेधे शकावलीची व त्याबरोबरच त्यात दिलेल्या शिवजन्मतिथीची विश्वसनीयता सर्वमान्य होईल ही गोष्ट श्री. सरदार मेहेंदळे व कै० पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांच्या लक्षांत त्याच वेळीं आली होती असें म्हणतां येतें. कारण, मूळ शकावली बारकाईनें पाहून तिची नक्कल करण्याचें व तिची चाचणी पाहण्याचें काम त्यांनीं केलें होतें. परंतु या विषयाचा सांगोपांग विचार त्यावेळीं त्यांनाहि करतां आला नाहीं.

ऐतिहासिक तिथिनिर्णयाचा प्रश्न शास्त्रशुद्ध रीतीनें सोडविण्यास प्रत्यंतर पुरावा व गणिताचीं कांहीं सूक्ष्म कोष्टकें हाताशीं असावीं लागतात; त्यांच्या अभावीं या बाबतींत समाधानकारक काम होऊं शकत नाहीं. जेधे मिती प्रसिद्ध झाल्यापासून तिची यथार्थता विद्वानांना मान्य होण्यास कांहीं काळ लोटावा लागला याचें कारण प्रत्यंतर पुरावा व गणिताचें साधन त्यावेळीं उपलब्ध नव्हतें हें आहे. या उणीवा

भरून काढण्याचें श्रेय कै. गणपतराव खरे व रा. सदाशिवराव दिवेकर यांना आहे. खरे यांची 'शिवकालीन जंत्री' तयार झाल्यापासून जेधे शकावलींतील मित्या, तत्कालीन युरोपियन पत्रे व मुसलमानी लेख यांतून आढळणाऱ्या तारखांशीं, ताडून पाहणें शक्य झालें; व दिवेकरांनीं 'शिवभारताची' प्रत शोधून काढल्यापासून शिवजन्मातिथीस उत्तम प्रकारचा प्रत्यंतर पुरावाहि मिळाला. या साधनांचा उपयोग करून जेधमिती ग्राह्य धरली पाहिजे, असे प्रतिपादन करण्याचें पहिलें श्रेय कै. वासुदेवशास्त्री खरे यांचें आहे. त्यानंतर त्यांना दुजोरा देण्याचें काम रा. चांदोरकर यांनीं शके १८४३ मध्ये केले व रा. ज. स. करंदीकर यांनीं शके १८४६ मध्यें (२०।५।२४ केसरींतून) ही गोष्ट जाहीर रीतीने मांडून 'यापुढें ही तिथी खरी धरून उत्सव केला पाहिजे,' असें सुचविलें.

या खेरीज रा. डिस्कळकर यांनीं मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसाइटींतला फोर्ब्स कलेक्शन पाहून त्यांतली मिती भा. इ. स. मंडळापुढें मांडली; प्रसिद्ध ज्योतिर्विद वें. बा. केतकर यांनीं अनेक उल्लेखांचे सरासरी मानाने १५५१पक्षास मिळणारें गणित मंडळापुढे वाचलें आणि मीं जधे शकावलींतल्या वाक्याचा अर्थ करतांना कोणती पद्धति स्वीकारावी लागते व कित्येक शंकांचे निरसन कसें करता येतें, याचा विचार संमेलनप्रसंगीं केला. अशा रीतीने भा. इ. सं. मंडळापुढें वेळोवेळीं आलेला पुरावा ज्यांना पाहण्यास मिळाला त्याना जेधेमितीची ग्राह्यता पटली होती; आणि त्यास अनुसरून शिवजन्मतिथीचा उत्सव ( आधींपासून रा. करंदीकर यांनीं सुचविल्याप्रमाणें ) फाल्गुन व. ३ रोजीं करण्याची कल्पना रा. दिवेकर यांनीं गुदस्तां काढली; तेव्हां ती बहुतेकांना मान्य झाली; ( केसरी १९२४ फेब्रु. ) आणि त्याप्रमाणें शिवनेरीस या तिथीचा पहिला उत्सव करण्यांत आला.

३ आक्षेपक–तथापि वडोद्यांतील कांहीं विद्वानांना या बाबतींत घाई होत आहे असें वाटून त्यांनीं वर्तमानपत्रांतून व मासिकांतून जेधे तिथीविरुद्ध आक्षेप घेण्यास सुरवात केली. तेव्हां, हे आक्षेप व त्यांचीं उत्तरें लोकांपुढे मांडतां आल्यास या प्रश्नाचा साधकबाधक विचार करणाऱ्यास चांगलें साधन होईल अशा विचारानें मीं रियासतकार रा. गोविंदराव सरदेसाई यांना असा एक लेख प्रस्तुत पुस्तकांत घालण्यासाठीं पाठविण्याची विनंति केली. तिला मान देऊन रा. सरदेसाई, रा. वाकसकर व रा. दा. ना. आपटे यांच्या सहीने एक लेख माझ्याकडे पाठविण्यांतहि आला. परंतु त्यानतर या तिघांनीं मुंबईच्या नव्याकाळांत, लोकमान्यांत, श्रीशिवाजींत व केसरींत अनेक लेख लिहून जेधेतिथीवर किती आक्षेप घेतां येतात हें दाखवून दिलें; आणि त्या आक्षेपांचीं उत्तरें मींहि केसरींत दिलीं. यामुळें रा. सरदेसाई यांना लेख पाठविण्याविषयीं विनंति केली तेव्हांच्या परिस्थितींत पुष्कळ बदल झाला. मजकडे लेख पाठविल्यानंतर रा. सरदेसाई वगैरे

विद्वानांना आणखी कांहीं आक्षेप सुचले व ते त्यांनीं जाहीर केले; त्या अर्थी ते आक्षेपांच्या बाजूस जमा धरणें प्राप्त झालें. आणि त्याप्रमाणे विरुद्धपक्षानें घेतलेले सर्व आक्षेप जमेस धरून त्यांचीं उत्तरें सहज ताडून पाहतां येतील अशा रीतीनें एखाद्या ग्रंथांत दाखविणेंच श्रेयस्कर आहे अशी सूचना कित्येकांनीं केली व ती मला इष्ट दिसली. याचें कारण वर्तमानपत्रांतून कै. लोकमान्यांसारख्या उत्तम अधिकारी पुरुषांनीं लिहिलेले लेख देखील कालांतराने संदर्भास उपयोगी पडत नाहींत असें प्रस्तुत वादांत माझ्या निदर्शनास आलें होतें. तें असें कीं, वैशाख शुद्ध द्वितीया अगर पंचमी अग्राह्य कां, याचे विवेचन कै. टिळकांनीं पचवीस वर्षांपूर्वी केसरींत विस्तृत रीतीने केले असून तें रा. सरदेसाई यांसारख्या कसलेल्या सकलनकारांस वाचावयास मिळाले नाहींत व त्यामुळे त्याजकडून जुने आक्षेप प्रस्तुत वादांत पुढे माडले गेले आणि त्यास पूर्वी देण्यांत आलेलींच उत्तरें पुनः कांहीं बाबतीत मला द्यावीं लागलीं; आणि अशा रीतीनें चर्वितचर्वण अवश्य झालें. हा प्रसंग टळावा व या बाबतींत पुनः विचार करणारास आजपर्यंतच्या वादाचा निष्कर्ष सहज उपलब्ध व्हावा, या हेतूनें या पुढे दिलेला मजकूर प्रस्तुत ग्रंथांत समाविष्ट केला आहे.

४ आक्षेपकांचे लुले साक्षीदार—जेधे शकावली व शिवभारत यांच्या विरुद्ध आक्षेपकानीं वीस साक्षीदार उभे केले आहेत. ही संख्या त्यांना आणखीही व ढावितां आली असती. कारण गेल्या शंभर वर्षांत ज्यानीं ज्यानीं मराठ्याचा इतिहास अगर शिवचरित्र लिहिलें त्यांनीं शिवजन्माचा शक १५४९ च मानला आहे; आणि याची संख्या शेकड्यांनीं सांगता येईल हें खरें आहे. तेव्हां १५४९ पक्षाच्या साक्षीदारांची संख्या वीस आहे कीं दोनशें आहे हा मुद्दा वादग्रस्त नसून त्यांत मुख्य प्रमाणभूत लेखक कोण आहेत व ग्रंथप्रामाण्यशास्त्राच्या दृष्टीनें त्यांच्या एतद्विषयक लेखाची लायकी काय आहे याचा प्रथम विचार करणें महत्त्वाचे आहे.

आधारभूत ग्रथाची योग्यता ठरवितांना ते कोणत्या कालविभागांतले आहेत याचा प्रथमतः निर्णय केला पाहिजे. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक कालाचे मुख्य तीन विभाग पडतात. पहिला शिवकालीन म्हणजे शाहूच्या आगमनापर्यंतचा; दुसरा पेशवाई अखेर (शके १७३९) पर्यंत आणि तिसरा इंग्रजी राज्य सुरू झाल्यापासूनचा. पैकीं शिवजन्माचा प्रश्न शिवकालीन विभागांतला आहे; त्याअर्थी त्याच्या निर्णयास पेशवाईतल्या अगर इंग्रजींतल्या साक्षीदारांपेक्षां शिवकालीन साक्षीदारांची मातब्बरी अव्वल दर्जाची समजली पाहिजे. पेशवाईतले अगर इंग्रजी अमदानींतले साक्षीदार पाहूंच नयेत असा या म्हणण्याचा अर्थ नाहीं. पण शिवकालीन व पेशवाईतला असे दोन समबल साक्षीदार पुढें आले व त्यांचें सागणें परस्पराशीं विरुध्द असलें तर

समकालीनत्वामुळें शिवकालीन साक्षीदाराच्या म्हणण्यास अधिक मान्यता मिळणें स्वाभाविक आहे. त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, केवळ समकालीन असला म्हणून त्या साक्षिदाराचें म्हणणें सर्वस्वीं प्रमाणभूत असतें असें नव्हे; समकालीनत्वाप्रमाणें साक्षीदाराची माहितगारी, विश्वसनीयता व सुसंगतपणा हेहि गुण अवश्य लक्षात घेतले पाहिजेत. तेव्हां या सर्वच दृष्टीने जेधे पक्ष व व आक्षेपकपक्ष यांच्या साक्षीदाराचें बलाबल ताडून पाहतांना ज्या मुद्यांवर अनुसंधान ठेवणे जरूर आहे ते प्रथम येथें नमूद करून ठेवतों.

| खऱ्या जन्मतिथीचे साक्षीदार | आक्षेपकांचे साक्षीदार |
| --- | --- |
| १ शिवकालीन आहेत. | १ शिवकालीन नाहींत. पेशवाईतले व इंग्रजी अमदानींतले आहेत. |
| २ त्यांची शिवजन्माची तपशीलवार मिती गणिताच्या कसोटीस तंतोतंत उतरते. | २ एकाचीहि शिवजन्माची मिती गणिताच्या कसोटीस उतरत नाहीं. (पृ. २०० ) |
| ३ ते शिवचरित्रांतील मित्यांचे पूर्ण माहितगार असून दीडशें पेक्षाही जास्त गोष्टींचे काल बरोबर सागतात. | ३ ते शिवचरित्रांतील मित्याविषयीं गैरमाहितगार आहेत; दहाबारांपेक्षां अधिक मित्या त्यांना माहीत नाहींत. (पृ. २०० पहा. ) |
| ४ त्यांचा एकमेकांच्या म्हणण्याशीं मेळ आहे. | ४ परस्परांत मेळ नाहीं; यामुळें कांहींच निश्चित ठरत नाहीं. ( पृ. २००—२१९ ) |
| ५ त्यांच्यांत शेंकडां २।४ चुका असतील. | ५ त्यांच्यात शेंकडां २।४ मित्या बरोबर असतील. (पृ. १९८ पहा. ) |

५ साक्षीदारांचा काल— शके १५४९ पक्षाचे सर्व साक्षीदार पेशवाईतले व इंग्रजी अमदानींतले आहेत; ते शिवकालीन नाहींत, हें दाखविण्यासाठीं त्यांचे काल येथें क्रमानें नमूद करतों.

## आधारग्रंथांचा कालनिर्णय.

| | | शके |
| --- | --- | --- |
| १ रायरीबखर | } | १६८२-९२ |
| २ एक्याणव कलमी बखर | } | |
| ३ तरीख-इ-शिवाजी | उत्तर पेशवाईतले | १६९२-१७०२ |
| ४ प्रभानवल्ली शकावली | | १७२० |
| ५ धडफळे यादी | | १७२९ |
| ६ चिटणिशी बखर | | १७३२ |
| ७ म. सा. छोटीबखर | | १७३९ |
| ८ शिवदिग्विजय | | १७४० |

९ नागपू. भोस. बखर १७४४
१० छत्र. वंशा. यादी १७४४
११ शिवाजी प्रताप १७५१
१२ रामदासी शकावली १७५३
१३ विजयदुर्गची हकीकत १७५७
१४ पंतप्रतिनिधींची बखर १७६६
१५ पंडितरावांची बखर १७७०
१६ शेडगांवकर बखर १७७६
१७ भिडे यांचा इतिहास १७८८

इंग्रजी आमदानींतील.

वरील यादींत दिलेले बहुतेक काल ज्या त्या ग्रंथांत शेवटीं दिले आहेत तेव्हां ते वादग्रस्त नाहींत. पण तीन चार ग्रंथांचे काल कसे ठरविले तें येथें सांगितलें पाहिजे.

शिवदिग्विजय हा ग्रंथ शके १६४० मध्यें लिहिला असें त्या ग्रंथांत म्हटलें आहे. पण ते चुकीचे असून त्याचा खरा शक १७४० हा आहे; ही गोष्ट कै० ज्योतिर्विद शंकर बाळकृष्ण दीक्षित यानीं दाखवून दिली होती व राजवाडे यानीं चौथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत ( पृ. १३ ) यास मान्यता दिली आहे. सबब येथे जास्त विवेचन नको.

एक्याणव कलमी बखर, रायरी बखर व तरीख-इ-शिवाजी या तीनहि बखरी जवळ जवळ एकच आहेत हें त्या एकमेकींशीं ताडून पाहणारास सहज दिसून येईल. त्या शिवकालीन आहेत असा कित्येकांचा समज आहे पण तो चुकीचा आहे. कारण या तीनही बखरींतून व्यंकोजीच्या दोन मुलांचा निर्वंश होऊन तिसऱ्याचा म्हणजे तुकोजीचा वंश 'हाली असे' असें बखरकारानीं स्पष्टच म्हटलें आहे; व त्यावरून या बखरी पेशवाईतल्या आहेत याबद्दल संशयास जागाच रहात नाहीं.

तरीख इ शिवाजी ही बखर फारशी असली तरी ती मराठी बखरीचें भाषांतर आहे व त्यांतहि वरील उल्लेख आहे [ The first two died without issue, but Tukoji had a son whose descendants are still reigning at Tanjore ]; यावरून याचा रचनाकाल सवाई माधवरावाच्या वेळचा असला पाहिजे असे ठरतें.

विश्वसनीयतेच्या दृष्टीनेंहि हा फारशी ग्रंथ महत्त्वाचा नाहीं; त्यांत भाकडकथाच फार आहेत, ही गोष्ट या बखरीचे पुरस्कर्ते प्रो. यदुनाथ सरकार यांच्या शब्दात अशी सांगता येते:

" Legends abound, no critical spirit or sense of proportion is shown in the narrative " " From internal evidence I conclude that it is a translation from Marathi Sources and was composed about 1780 "
Modern Review Janu. 1910.

बर्जेस शकावलींतील मराठ्यांच्या इतिहासांतल्या मित्या ग्रँडफच्या ग्रंथावरून घेतलेल्या आहेत; व ग्रँडफनें या बाबतींत चिटणिसांचा आधार घेतला आहे; त्याअर्थी चिटणिसांचा ग्रंथ जमेस धरला म्हणजे तदनुयायी इतर ग्रंथांचा स्वतंत्र विचार करण्याचें कारण नाहीं.

अशा रीतीनें आक्षेपकांचे कांहीं साक्षीदार उत्तर पेशवाईतले व बाकीचे ( २० पैकीं १३ ) तर इंग्रजी अमदानींतले आहेत; त्या अर्थी दीड दोनशें वर्षांपूर्वींची हकीकत सांगतांना त्यांच्या हातून पुष्कळ चुका झाल्या यांत नवल कसलें !

६ गणिताची कसोटीः–तिथिनिर्णयाच्या कामीं कोणती कसोटी योजावी, हें रा. राजवाडे यांनीं चौथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे व त्या कसोटींची युक्तता कै. लोकमान्यांनीं सदर ग्रंथाच्या परीक्षण प्रसंगीं मान्य केली आहे ती अशी " कालनिर्णयाच्या कामीं शक, संवत्सर, महिना, तिथि, वार, नक्षत्र, करण इत्यादि जास्त जास्त तपशीलवार माहिती जर कोणी दिली असेल व ती गणितानें खरी ठरत असेल तर तीच तिथि खरी व विश्वसनीय मानणे अधिक न्याय्य व समंजस आहे." (पृ. ७ पहा). आणि या कसोटीवर त्या वेळीं उपलब्ध असलेल्या चौदा आधारांतील मित्या तपासून "तीथ आहे तर वार नाहीं आणि वार आहे तर नक्षत्र नाहीं; आणि तीथवार जुळला तर साल जुळत नाहीं. अशी स्थिती हल्लीं उपलब्ध असलेल्या लेखावरून निष्पन्न होते " असा निर्णय तेव्हांच लोकमान्यांनीं दिला होता. ( पृ. ९ पहा. )

हीच गोष्ट स्पष्ट होण्याकरितां, आक्षेपकांच्या सत्राहि साक्षीदारांचें म्हणणें व त्याचें उत्तर येथें देऊन ठेवतों. त्यावरून त्यांच्या विधानांतील विसंगतपणा सहज लक्षांत येण्याजोगा आहे. हा विसंगतपणा ओळखण्यास शके १५४९ ला प्रभव संवत्सर होता व त्या वर्षी वैशाख शुध्द द्वितीयेस शनवार असून भरणी नक्षत्र होतें, आणि पंचमीस मंगळवारीं आर्द्रानक्षत्र होतें (पृ. ७ पहा) हें विसरतां कामा नये.

| बखरींतील विधान | उत्तर |
|---|---|
| १ रॉयरी बखर—(फारेस्ट प्रत). राजवाडे प्रत शके १५४८ **१५४८ क्षय** वैशाख शु. ५ **चंद्रवार** | १ शक, संवत्सर व वार तीनहि चुकीचे आहेत. |
| २ एक्याणव कलमी बखर (भा. व.) **१५५९. क्षय** वै. शु. ५ **सोमवार.** | २ शक, संवत्सर व वार तीनहि चुकीचे आहेत. |
| ३ तरीख-इ-शिवाजी. शके १५४९ **क्षय** ( किंवा **जय** ) वै. शु. ५ | ३ संवत्सर चूक; वार दिला नाही. |
| ४ प्रभानवल्ली शकावली. **१५४९ विभव** | ४ संवत्सर चूक; महिना, तिथी व वार दिला नाही. |
| ५ धडफळे यादी. १५४९ प्रभव **वै. शु.** | ५ वार व तिथी दिली नाही. |
| ६ चिटणीशी बखर. १५४९ प्रभव वै. शु. २ **गुरुवार.** | ६ तिथीचा वाराशीं मेळ नाहीं. |
| ७ रामदासी शकावली. १५४९ शके | ७ संवत्सर, महिना, तिथी व वार ह्यांपैकी कांहीं दिलेले नाही. |
| ८ शिवदिग्विजय. १५४९ प्रभव वैशा. शु. २ **गुरुवार रोहिणी** | ८ तिथी,वार व नक्षत्र यांचा मेळ नाही. |
| ९ नागपूरकर भोसल्यांची बखर. १५४९ प्रभव वै शु.**२ गुरुवार** | ९ तिथिवारांचा मेळ नाहीं. |
| १० छत्रपतींची वंशावलीबद्ध यादी. १५४९ वै. शु. ५ | १० संवत्सर व वार दिला नाहीं. |
| ११ शिवाजीप्रताप १५४९ **रक्ताक्षि** | ११ संवत्सर चुकला. इतर तपशील कांहींच नाहीं. |
| १२ म. सा. छोटी बखर. १५४९ **क्षय** वै. शु. ५ **चंद्रवार.** | १२ संवत्सर व वार चूक. |
| १३ विजयदुर्गची हकीकत. **संमान अशरीन अलफ,** **१५४९** प्रभव वैशाख **बहुल २** | १३ सुहूर सन व पक्ष चुकला. वार दिला नाहीं. |

| | |
|---|---|
| १४ पंतप्रतिनिधींची बखर<br>१५४९ प्रभव वैशा. शु. १५<br>**चंद्रवार.** | १४ तिथि व वार चूक. |
| १५ पंडितरावांची बखर.<br>१५४९ प्रभव | १५ महिना, तिथी व वार दिले नाहींत. |
| १६ शेडगांवकर बखर.<br>१५४९ प्रभव वैशाख शु. ३<br>**शनिवार रोहिणी कर्कलग्न.** | १६ तिथिवाराचा व नक्षत्र लग्नाचा मेळ नाहीं. |
| १७ भिडे यांचा इतिहास.<br>१५४९ वै.शु. ३ शानिवार. | १७ तिथिवाराचा मेळ नाहीं. |

---

यावरून सत्राहि साक्षीदारांचे लिहिणें कालनिर्णयाच्या कसोटीस कसें उतरत नाहीं हें स्पष्ट होईल. ' शक-संवत्सर—तिथिवारनक्षत्र वगैरे तपशीलवार माहिती दिलेली असावी व ती गणितानें खरी ठरावी, ' ही कसोटी लावण्याचा हेतु असा असतो कीं, तत्कालीन अस्सल नोंद पहाण्यास मिळाल्यावांचून हा तपशील बिनचूक देतां येत नाहीं; आणि तत्कालीन नोंद न पाहतां अनमानधबक्यानें अगर कर्णोपकर्णी मिळालेल्या माहितीवरून तपशील देणाऱ्याच्या लिहिण्यांत विसंगति आल्यावांचून रहात नाहीं. त्यांतून आमच्या परंपरागत पद्धतींत शक आंकड्यांत तर संवत्सराचें नाव अक्षरीं; आणि तिथी आंकड्यांत तर वार अक्षरांत लिहिण्याचा प्रघात असल्यामुळें अस्सल कागदाच्या आधारें कोण लिहितो व तर्कानें कोण लिहितो याची परीक्षा तिथिवाराच्या मेळावरून अगर बिनमेळावरून तत्काळ करतां येते. हुंडींत ज्याप्रमाणें आंकड्यांनीं व अक्षरांनीं सांगितलेली रक्कम तंतोतंत एक असली पाहिजे; आणि त्यांत फरक असला तर हुंडी अग्राह्य ठरते,तोच प्रकार तिथिवाराच्या नोंदीसंबंधानें आहे हें लक्षांत ठेवलें असतां सर्वहि बखरकारांच्या लिहिण्यांत " वदतो व्याघात" आहे व त्यामुळें त्यांचें लिहिणें **'पांडव किती? तर बाजल्याच्या खुराइतके तीन दोन—एक'** असें म्हणणाऱ्याच्या विधानाप्रमाणें अविश्वसनीय आहे, हे विस्तारानें सांगण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें जेधे शकावली व शिवभारत यांतील शिवजन्मतिथीचे उल्लेख तपशीलवार असून गणिताच्या कसोटीस उतरणारे आहेत (पृ.८०।८१पहा.) यावरून ते तत्कालीन अस्सल कागदांच्या आधारानें लिहिले असले पाहिजेत हेंहि आपोआप ठरत आहे.

वरील सत्रा साक्षीदारांच्या लिहिण्यावरून **तिथीनिर्णय होण्या ऐवजींघोटाळा** मात्र उत्पन्न होतो; कारण पांच साक्षीदार पंचमी देतात; तीघे द्वितीया देतात;

दोघे तृतीया देतात, एक जण पौर्णिमा व दुसरा एक वद्य द्वितीया देतो आणि पांचजण तिथीच देत नाहींत ! यामुळें द्वितीया, तृतीया पंचमी, पौर्णिमा व वद्य२ यांतून कशाची निवड करावी हें ठरविणें दुरापास्त आहे. संवत्सराच्या बाबतींत सहा बखरींत संवत्सर व शक यांचा बिलकुल मेळ नाहीं; म्हणजे संवत्सर खरा धरल्यास शकाचा आंकडा चुकतो आणि शकाचा आंकडा खरा धरल्यास संवत्सराचें नांव चुकतें ! याच ठिकाणीं नकलकाराच्या हातून लेखप्रमाद झाला असें म्हणावें तर तेंहि संभवत नाहीं;कारण सत्रापैकीं एकाच्याहि लिहिण्यांत शुद्धता नाहीं! आणि इतर प्रसंगांचे बखरींतले शकहि किती विसंगत आहेत याचें विस्तृत विवेचन रा. शंकरराव जोशी यांच्या निबंधांत (पृ. १९७-२१९) आले आहे त्यावरून तिथिनिर्णयाच्या कामीं वरील साक्षीदार केवल कुचकामाचे आहेत हेंच ठरतें.

७ शिवकालीन शकावल्या—येथें दिलेल्या सहा शकावल्या वअठराव्या खंडांतील एक आणि फोर्ब्स कलेक्शनमधील एक, मिळून आठ शकावल्या शिवकालीन मित्यांचा निर्णय करण्यास उपयोगी पडण्याजोग्या उपलब्ध झालेल्या आहेत. त्या सर्व शकावल्यांतून शिवजन्मातिथी दिलेली आहे असें नव्हे; पण हस्तदोष पाहण्यास, पाठांतराची शुद्धाशुद्धता ठरविण्यास आणि एकंदरींत शिवकालीन मित्यांचा विचार करण्यास जितक्या जास्त शकावल्या मिळतील तितक्या मिळवून त्या एकमेकींशीं ताडून पाहिल्या पाहिजेत. कालिदासादि कवींचे ग्रंथ छापतांना असेच अनेक पाठभेद तपासून व्याकरणदृष्ट्या व संदर्भदृष्ट्या शुद्ध पाठ कोणता याचा निर्णय करतात ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. तोच न्याय प्रस्तुतच्या शकावल्यांना लावून संदर्भ व गणित यांच्या साह्यानें हस्तदोष निवडून काढून शुद्धपाठ ठरविले पाहिजेत. ही शुद्धता साधण्याची पद्धत सांगण्यापूर्वीं प्रथम शकावलींचीं नांवें व व त्यांच्या मूळ लेखनाचा काल नमूद केला पाहिजे. नांवें दोन पद्धतींनीं देतां येतील:

( १ ) त्यांच्या रचनाकालावरून; किंवा ( २ ) संग्राहकांच्या नांवावरून. येथे सुबोधतेसाठीं फक्त एकेकच नावें देऊन ठेवतों.

( १ ) शाहाजीकालीन शकावली ( पृ. ७० )

( २ ) राज्याभिषेक शकावली ( पृ. ५३–६५ )

( ३ ) होनप देशपांडे शकावली ( खंड १८ पृ. १३–१६)

( ४ ) फोर्ब्स अथवा शिवापूरकर वहींतलि शकावली.

( ५ ) शिवनिधन शकावली ( पृ. ५०–५३ )

( ६ ) दासपंचायतन शकावली ( पृ. ७० )

( ७ ) राजारामकालीन अथवा जेधे शकावली ( पृ. १५–३९ )

(८) संपूर्ण शिवकालीन शकावली (पृ. ६६–६९)

शकावल्यांचा रचनाकाल ठरविण्यास उत्तम गमक म्हणजे त्यांतली कालदृष्ट्या शेवटली नोंद. त्या नोंदीवरून शकावलीच्या रचनाकालाची पूर्वमर्यादा ठरते; म्हणजे त्या नोंदीपूर्वी ही शकावली रचली गेली नाहीं असें निश्चितपणें म्हणतां येतें. पण शेवटल्या नोंदीनंतर किती वर्षांनें शकावली लिहिली गेली, याविषयीं म्हणजे तिच्या रचनकालाची, उत्तरमर्यादा ठरविणें पुष्कळ वेळां अशक्य असतें. तथापि, शकावली रचणारे साधारणपणे आपल्या वेळेपर्यंतच्या गोष्टी नमूद करीत, असें धरून चालण्यास हरकत नाहीं.

नकलेविषयीं मात्र असें म्हणतां येणार नाहीं. मूळ शकावलींत ज्या शकापर्यंतच्या नोंदी असतील तितक्याच लिहून काढण्यासाठीं नकल करावयाची असल्यामुळें नकलेचा लेखनकाल व नकलेतील शेवटची नोंद यांत कितीही वर्षांचें अंतर असूं शकतें. आणि नकलेचा काल अक्षरांच्या वळणावरून व अवांतर पुराव्यावरून ठरवावा लागतो. उदाहरणार्थ—राज्याभिषेक शकावली शके १५९६च्या सुमारास रचली गेली. कारण त्यांत तेथपर्यंतचेच शक दिले आहेत; पण तिच्या तीन नकला उपलब्ध असून त्या नकलांचे काल निरनिराळे आहेत, हें त्यांच्या अक्षरावरून व शब्दांच्या बारीकसारीक बदलावरून ठरते. यांपैकीं अठराव्या खंडांत राजवाडे यांनीं होनप देशपांडे यांच्या कागदांत छापलेली शकावलीची प्रत अगदीं जुनी आहे, हें तिच्या भाषेवरून निश्चित होतें. पण फोर्ब्स कलेक्शन मधली प्रत इंग्रजी अमलांतली आहे हें अक्षराच्या वळणावरून ठरवितां येतें. सारांश, नकलेचा काल ठरविण्याची कसोटी रचनाकालाच्या कसोटीहून निराळी आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

आणखी एका किरकोळ (परंतु प्रस्तुत प्रश्नाशीं निकट संबंध असलेल्या अशा) बाबीचा म्हणजे जुन्या पद्धतीचा उल्लेख केला पाहिजे. पेशवाईत किंवा त्याही पूर्वीच्या काळांत अनेक घराण्यांत बाडें लिहविण्याची पद्धति होती. या बाडांत काव्यांचा अगर शकावल्यांचा संग्रह असे. काव्यांच्या बाडांत ज्याप्रमाणें ज्ञानेश्वरापासून अनंतफंदीपर्यंतच्या अनेक कवींनीं केलेल्या पद्यांचा संग्रह असे, त्याचप्रमाणें ऐतिहासिक बाडांची स्थिती असे. उदाहरणार्थ—फोर्बस कलेक्शनमध्यें म्हणजे शिवापूरकरांच्या बाडांत अनेक शकावल्यांचा व ऐतिहासिक टिपणांचा एकत्र संग्रह केलेला आहे. त्यावरून त्या शकावल्यांचा व टिपणांचा नकलकाल अक्षरवळणावरून निश्चित होईल; पण त्या सर्वांचा रचनाकाल एकच आहे असें म्हणतां येणार नाहीं. रचनाकाल ठरविण्यास त्यांत एक शकावली संपून दुसरी शकावली कोठें सुरु होते, हें आधीं निश्चित करून प्रत्येक शकावलीचा स्वतंत्रपणें विचार केला पाहिजे. एरव्हीं त्यांतील विश्वसनीय भाग कोणता व अविश्वसनीय कोणता याची शहानिशा करतां येणार नाहीं. अशा

प्रसंगीं ' सरसकट बारा टक्के ' या न्यायानें त्या बाडांतील १५४९ व १५५१ शकांतले उल्लेख पाहून त्यांत बहुमत कोणत्या शकाचें आहे एवढेंच पाहून निर्णय देणें न्यायाचें ठरत नाहीं. फोर्बस कलेक्शनमधील राज्याभिषेक शकावली संबंधानें विचार करतांना तर आणखी एक विशेष आहे तो असा कीं, या शकावलीची स्वतंत्र व जुनी प्रत उपलब्ध असून ती १८व्या खंडांत छापलेली आहे. तेव्हां बाडांत या शकावलीचा प्रारंभ व शेवट कोठें समजावा, हें ओळखण्यास कांहींच अडचण पडण्यासारखी नाहीं.

८ **शकावल्यांचा रचनाकाल**–आपल्या पुढें आलेली शकावली प्रथम केव्हां लिहिली गेली म्हणजे तिचा रचनाकाल कोणता हे निश्चित करण्यास, माझ्या मतें, असे नियम सांगता येतात. त्यांत शाहूच्या आगमनापर्यंतचा ' शिवकाल ' नंतर ' इंग्रजी ' सुरु होईपर्यंत ' पेशवाई ' अशी परिभाषा गृहीत धरली आहे.

१ शिवकालीन शकावलींतले सर्व शक शाहूच्या आगमनकालापूर्वींचे असले पाहिजेत.

२ पेशवाईतला अगर इंग्रजींतला उल्लेख त्यांत एकहि नसावा.

३ तिथि–वार–नक्षत्रापर्यंतची जास्तींत जास्त सूक्ष्म माहिती देणारे कांहीं तरी उल्लेख तिच्यांत असावे व गणितदृष्ट्या ते बिनचूक असावे.

४ त्यांतील मित्यांची संख्या भरपूर मोठी असावी [ कारण समकालीन लेखकाला पुष्कळ मित्या देणें सुलभ असतें ].

५ अस्सल पत्रे, समकालीन व विश्वसनीय तवारिखा किंवा हकीकती यांवरून निश्चित झालेल्या मित्यांचा या शकावलींतील नोंदीशीं मेळ असावा.

हे पांच नियम लावून पाहिले असतां विशिष्ट शकावली शिवकालीन आहे किंवा नाहीं हें निश्चित करतां येतें. उदाहरणार्थ, जेधे शकावलींतले

१ सर्व शक १६११ पर्यंतचेच आहेत.

२ पेशवाईतला अगर इंग्रजींतला उल्लेख तिच्यांत एकहि नाहीं.

३ तिथि-वार–नक्षत्रापर्यंतची सूक्ष्म माहिती देणारे उल्लेख आहेत.

४ उल्लेखांची संख्या भरपूर मोठी म्हणजे २२१ आहे.

५ प्रत्यंतर पुराव्यानें ठिकठिकाणच्या नोंदी खऱ्या ठरल्या आहेत [ त्याचीं उदाहरणे पुढें दिलीं आहेत ].

राज्याभिषेक शकावली व शिवनिधन शकावली वगैरेंना देखील हे नियम पूर्णपणें लागू पडतात हे रा. शंकरराव जोशी यांनी विस्तरशः दाखविलें आहे [ पृ. १९९ ] याकरितां त्याची पुनरावृत्ती करण्याचे कारण नाहीं.

प्रभानवल्ली, रामदासी व घडफळे यांच्या शकावल्या जेधे शकावलीच्या तोडीच्या किंबहुना काकणभर अधिक विश्वसनीय म्हणून आक्षेपकांनीं म्हटलें आहे. पण तें बरोबर नाहीं. याचें कारण

महाबळी अतीबळी । भीम भैगे पराक्रमी ।
सुंदरा पंचगंगा त्या । कृष्णा वेण्या सरस्वती× ॥ १ ॥
गाईत्री सावित्री ब्रह्मा । विष्णु रुद्र गरुडध्वजु ।
उमा महेश्वरा नंदी । सर्व मूषक पंचाननु ॥ २ ॥
उगमु पूर्वभार्गी तो । गायमुखें मनोहरें ।
त्या तळीं सुंदरा बागा । नाना तरु परोपरीं ॥ ३ ॥
नारेळी पोफळी केळी । बाफरी बकुळी तुती ।
केतकी मालती धात्री । काळोत्री तुळसी बहु ॥ ४ ॥
शतपत्री सेवंगी नाना । आरंगुदी जास्वनी बहु ।
पाडळी ढवळी दवनी । नीबाणी रायआंवळी ॥ ५ ॥
आनसी फणसी पेरी । खिरणी कविठी बहू ॥
नारंगी बदरी सर्वा । कर्वंदी तोरणी गुणी ॥ ६ ॥
खर्बुजी तर्बुजी सेदा । सेदण्या रायसेदण्या ॥
वाळकें कांकडया तोसीं । चिबडें तुरंजें बहु ॥ ७ ॥
खजुरी द्राक्ष आंजीरी । बादामें आक्रुटें झटे ।
कलागडी तारवटी केळें । नारेळें बहुजनसी ॥ ८ ॥
हुर्डा वेंब्या उळा ढाळे । वाटाणे फोलाणं चणें ।
राताळें गाजरें वांगीं । दही दुध तक्र नेटकें ॥ ९ ॥
मोहळ कांदे मुळें सेंगा । मुग चौळे परोपरीं ।
उंस काळे काठे पुंडे । वेळा बाळाच शर्करा ॥१०॥

वरील कवनात ओवी ४ ते १० अखेर नुसती अनेक फळवेलींची समृद्धि महाबळेश्वरीं कशी होती त्याची कल्पना दिली आहे. हिंदुस्थानात आरामवाटिका, बागबगीचे नाहींत म्हणून हिंदुस्थानाचा धिःकार बाबर चकताई यानें आपल्या आठवणींत केला आहे. परंतु समर्थांचे ग्रंथ पाहतां त्यांचे काळीं, आणि दक्षिणेंत तरी, तसा प्रकार दिसत नाहीं. ही वृक्षवेलींची नामावळी दासांनी काल्पनिक दिली

---

× कृष्णा, वेण्या, सावित्री व गायत्री या चार नद्या पंचगंगांत मोडतात. पांचवी ककुद्मती अथवा कोयना मानली आहे. ती समर्थांनी कां परिगणिली नाहीं ? तिच्या ऐवजीं सरस्वती दिली आहे. ही सरस्वती क्षेत्रमाहात्म्यांत आली आहे पण ती पांचांत नाहीं. तिची जोडीदारीण सातवी जी भागीरथी तिच्या समवेत हिचा उल्लेख केलेला आढळतो ( धो. म. व. उदास. आ. दु. भाग २ पृ ४५।४६ ) त्याच प्रमाणें प्रस्तुत क्षेत्रीं ब्रह्मा-विष्णु-महेशांचे विषयीं हि उल्लेख क्षेत्रमाहात्म्यांत आहेत. क्षेमा. कधींचें आहे तें माहीत नाहीं. तथापि रामदासकाळीं बहुधा त्या वर्णनाप्रमाणेंच स्थिति होती.

आहे असा आक्षेप यावर येईल. परंतु समर्थांची वर्णनाची बारकाई पाहतां तसा संशय प्रशस्त वाटत नाहीं. महाबळेश्वरचा रमणीय गिरिविराम नवीन झाला, पूर्वी तेथें नुसतें दाट अरण्य होतें अशी कोती समजुत आपली कधींकधीं होते तीं नहरची आजची भरभराट पाहून होते. वास्तविक पाहतां श्रीक्षेत्रमहाबळेश्वराचे रमणीय स्थान फार पूर्वापार प्रसिद्ध आहे. तें क्षेत्र असून रमणीय वनोपवनांनीं अलंकृत झालेलें होतें. तेथील वनाविषयीं तर प्रसिद्धि आहेच व त्याविषयीं एक नवा मुद्दा खालीं देत आहे. उपवनांविषयीं समर्थवाणीचा वर आधार दिला आहे. हल्लीं नवीं पाश्चिमात्य झाडेंफळें महाबळेश्वर पर्वतावर लावण्याचे कामीं चांगलें यश येत आहे. मग पूर्वीं समर्थकाळीं श्रमसायास केले असतां त्या पर्वतावर अनेक फलपुष्पयुक्त वृक्षवल्ली का जोगवतां आल्या नसतील ? आज तें क्षेत्र महाबळेश्वर उघडे आणि पोकें झालें आहे. आतां श्री समर्थांनीं स्थापिलेल्या श्रीमारुतिरायालाच त्याची सर्व लाज आहे ! !

श्रीसमर्थकवनांच्या पहिल्या तीन कडव्यातील मजकूर ऐतिहासिक दृष्टीनें उपयोगाचा आहे. क्षेत्र महाबळेश्वरास अतिबळेश्वर व महाबळेश्वर या दोन असुरबंधूंची अनुक्रमें विष्णु व शिव यांचे नावचीं देवळें झालेलीं आहेत. (सातारा ग्याझे. पृ. ५११ आणि उदास, धौ. म. व. पृ. ५१ आ. दु. ) देवळांचीं नांवें अतिबळेश्वर व महाबळेश्वर अशीं आज हि आहेत. वरील समर्थकवनात 'महाबळी अतिबळी' चा उल्लेख प्रारंभींच आलेला आहे. त्यावरुन ही महाबळी-अतिबळी कथा श्रीसमर्थांच्या वेळीं हि प्रचलित होती. इतकी ही कथा प्राचीन आहे. या कथेचा इतका प्राचीन उल्लेख ( स्कंद पुराण सोडून ) अन्यत्र आढळला नाहीं. महाबळेश्वर हें नांव प्रचलित होण्यापूर्वी 'मामलेश्वर' असे नाव असावें असें राजवाडे याचे मत दिसते व त्यावरुनच प्रस्तुतचें 'मावळ' नांव निघालें असल्याचा संभव आहे. परंतु हा विषय निश्चित निर्णीत होण्याला आवश्यक प्रमाणसंग्रह अद्यापि हवा तेवढा उपलब्ध झाला नाहीं. आज आपण एवढेच निश्चित केलें कीं समर्थकाळीं महाबळअतिबळकथा प्रचलित होती.

तसेंच वरील समर्थकवनांत पंचगंगाचा उल्लेख आणि त्यांवरील गायमुखाचा उल्लेख स्पष्ट आलेला आहे.

रामदासांचा महाबळेश्वर पर्वताशींच तेवढा निकट प्रेमसंबंध होता असे नव्हे तर तेथील जें सुप्रसिद्ध 'ब्रह्मारण्य' त्याचाहि उल्लेख समर्थांच्या काव्यांत आढळतो. पैकीं एक स्थळ श्रीरामदासाची कविता प्रथमखंड या रा. देवसंपादित ग्रंथातच पृ. १४४ वर आलें आहे. तेथील उल्लेख असाः—

क्रियाभ्रष्ट तेणें लोकिकां सोडावें ।
आणी वसवावें ब्रह्मारण्य ॥ ८७ ॥

ब्रह्मारण्य सेवी तो साधु येकला ।
जना नाहीं आला उपेगासी ॥ ८८ ॥ [ ओव्याशत ३ रें ]

या ओव्यांत समर्थांनीं लोकसंग्रह सोडून केवळ आत्मोद्धार करूं पाहणाऱ्या साधूंविषयीं आपली असंमति दर्शविली आहे. परंतु यांत ब्रह्मारण्याचा उल्लेख सामान्यार्थी केला आहे. हें कवन समर्थांनीं तेथें आपला अधिवास असतां केल्यासारखें वाटतें. एरव्हीं ब्रह्मारण्याचा असा परिचयैकगम्य उल्लेख त्यांनी सहसा केला नसता.

असो ! वरील टिपणांतील फलनिष्पत्ती निश्चित म्हटली म्हणजे समर्थांचा व महाबळेश्वराचा परिचय चांगला दाट होता आणि अनुमित म्हटली म्हणजे त्यांच्या कार्याच्या आरंभकालीं म्हणजे* १५६६ शकेंत याच उत्तुंग पर्वतशिखरावरून त्यांनी आपले प्रयत्नप्रबोधप्रचीतीचें शिंग फुकलें असावे !

अश्विन व॥ १३ पुणें दत्तो वामन पोतदार.

---

# ३८ श्री शिवछत्रपतींची राजमुद्रा.

श्री शिवछत्रपतींची राजमुद्रा पुढीलप्रमाणें आहे, म्हणजे यांत खालील अनुष्टुभ् श्लोक गुंफलेला आहे:—

प्रतिपच्चंद्ररेखेव ।
वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शाहसूनोः शिवस्यैषा ।
मुद्रा भद्राय राजते ॥

प्रस्तुत मुद्रेंत खालील प्रतिज्ञा आहे आढळून येते:—

( १ ) शाहाजीचा पुत्र जो शिवाजी त्याची ही मुद्रा आहे.

( २ ) ही मुद्रा लोककल्याणार्थ ( येथें ) शोभत आहे.

( ३ ) ( शुद्ध पक्षांतील ) चंद्रकोर जशी ( रोज रोज ) वाढत जाते तशी ही मुद्रा ( म्हणजेच मुद्रेची सत्ता किंवा मराठी राज्य ) हि अभिवृद्धी पावणार. आणि चंद्रकोर जशी लोकपूजित होते तशीच ही मुद्राहि सर्वमान्य होणार.

अशी ही सुंदर मुद्रा महाराज शिवछत्रपती कधींपासून करूं लागले ? रा. राजवाडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १५ प्रसिद्ध केला आहे,

---

* राजवाडे यांनी हेंच मत मान्य केलें आहे. ( रामदास रामदासी )

त्यांत ले. ४३७ ( चाकण ब्रम्हे ) वर ही मुद्रा असून त्या लेखाचें साल अर्बैन अलफ म्हणजे सुहूर सन १०४० दिलें आहे. सु. १०४० जमादिलाखर ६ म्हणजे शके १५६१ प्रमाथी संवत्सर, आश्विन शु. ८ मंगळवार येतो. [ खरे जंत्री. ] चाकणकर ब्रह्मे यांस चाकण व इंदोरी येथें ज्या इनामवायी पूर्वीपासून चालत होत्या त्या पुढें चालविण्याविषयीं या पत्रांत शिवाजीराजानें हुकुम दिला आहे. पत्रांत " हाली पा। मजकूर साहेबा अर्जानी जाला आहे ' असें लिहिलें आहे, त्यावरून चाकण परगणा यावेळीं शिवाजीकडे आला हें निःसंशय ठरतें. सदर हूकूम देशमुख देशपांडे हाल व इस्तकबाल पा। चाकण यांवर ' राजश्री सिवाजी राजे ' याजकडोन रख्तखान्याहून सुटला असून रीतीप्रमाणें त्याखालीं सुरनिसाची रुजुवात आहे. **लेख अस्सल प्रत १ चा आहे. शिवाजी राजे यांची पवित्र मुद्रा शिरावर धारण करणारा सर्वांत जुना अस्सल लेख आज हा एवढाच आहे.** या लेखाचा विचार करितांना सुचलेल्या कांहीं प्रमेयांचा विचार येथें कर्तव्य आहे.

शिवाजी महाराजांच्या ' वैयाला' [श्रीसांप्रदायाची कागदपत्रें लेखांक ३६८.] प्रारंभ शके १५६२त झाला अशी एक वृत्तपरंपरा आहे. सभासदाच्या मताप्रमाणें शिवाजी महाराज १२ वर्षांचे असताना त्यास शहाजी महाराज यांनीं पेशवे, सुरनीस वगैरे चार पांच अधिकारी बरोबर देऊन पुणें प्रांतीं ठेविलें. पण सभासदानें साल दिलें नाहीं. तथापि या मोघम उल्लेखावरूनही शिवाजी महाराजांची हालचाल पुणें प्रांताकडे त्यांच्या अगदीं बालपणींच सुरू झाली होती असें दिसतें. सामान्य लोकांच्या समजुतींत तोरणा घेऊन शिवाजीनें आपला कार्यारंभ केला असें आहे. आणि तोरणा घेतल्याची मिती जेधे शकावलीप्रमाणें पाहतां शके १५६८ येते. परंतु अलीकडे उपलब्ध झालेल्या विश्वसनीय ऐतिहासिक साहित्याधारें पाहतां शके १५६१।६२ तच शिवाजी महाराजाचे उद्योगास प्रारंभ झाला होता आणि वरील ले. ४३७ चा अस्सल कागद त्याचा स्वच्छ व निःसंदेह पुरावा आहे.याच मुद्याचा जरा विस्तारानें विचार केला पाहिजे.

सभासदाचें वरील विधानच प्रथम देतों:—

" शहाजी राजे यांसि दौलते मध्यें पुणें परगणा होता तेथें दादाजी कोंडदेव शहाणा चौकस ठेविला होता तो बेंगरूळास महाराजांचे भेटीस गेला त्या बरोबर राजश्री शिवाजीराजे व जिजाबाई आऊ ऐशीं गेली ते समयीं राजियास वर्षें बारा होतीं बराबर शामराव निळकंठ ह्मणून पेशवे करून दिले व बाळकृष्ण पंत नारोपंत दीक्षिताचे चुलतभाऊ मजुमदार दिले व सोनोपंत डबीर व रघु-

नाथ बल्लाळ सबनीस ऐसे देऊन दादाजीपंतास व राजेयांसि पुण्यास रवाना केलें." (सभासद—पृ. ६ आ. दु.)

सभासदाच्या या विधानास शिवभारतांतील पुढील उल्लेखानें स्पष्ट बळकटी येत आहे:—

शिववर्मा यदा वर्षे द्वादशं प्रत्यपद्यत ।
तदा नृपश्शाहवर्मा नियोगेन पिनाकिनः ॥ १ ॥
अमुं शंभुकनीयासमाहूय शिवलक्षणम् ।
अर्कद्युतिमुदर्कज्ञः पुण्यदेशेश्वरं व्यधात् ॥ २ ॥

बरावें वर्ष लागल्यावर म्हणजे शके १५६२ च्या अखेरीस ( १५५१ फा. ते १५६२.फा. = १२ वें वर्ष प्रारंभ. ) पुण्यावर शिवाजीची योजना झाली. शिवाजी याप्रमाणें नव्या अधिकारावर निघाला त्यावेळीं भारतकार म्हणतो:—

ततः कतिपयैरेव गजवाजिपदातिभिः ।
मौलैराप्तैरमात्यैश्च ख्यातैरध्यापकैरपि ॥ २५ ॥
विरुदैश्च ध्वजैरुच्चैः कोषेणापि च भूयसा ।
तथा परिजनैरन्यैरनन्यसमकर्मभिः ॥ २६ ॥

येणें प्रमाणें पोख्त सरंजाम शहाजीराजे यांनीं शिवाजीसाठीं योजून त्याची रवानगी पुण्यास केली. पेशवे, सुरनीस व डबीर यांची योजना शिवाजीसमवेत झाल्याचें सभासद लिहितो तें यावरून यथार्थच ठरतें. बृहदीश्वर शिलालेखांतहि अशीच साक्ष आहे कीं "शिवाजी राजास सातारा पुणें प्रांताचे राज्यास शके १५६२ विषु ( वृष १५६३ ला येतो; विक्रम पाहिजे ) संवत्सरी तक्त बांधोन पाठविलें" (राजवाडे-प्रभात पृ. १८) जधे करीन्यांत साक्षात् वर्ष दिलें नाहीं पण तोच विषय व आशय येणेंप्रमाणें सांगितला आहे:—

"त्यावरी महाराजानी राजश्री सिवाजी राजे याजसमागमे राजश्री सामराजपंत पेशवे व माणकोजी दाहातोडे सरनोबत व बालाजी हरी मज्यालसी व कारकून व स्वाराचा जमाव देऊन पुण्यास पाठविले"(जधे-करीना.) चित्रगुप्तानेंहि असेंच वर्णन दिलें आहे. तो लिहितो:—

"शहाजी राजे यांजकडे सरंजामांत पुणे व इंदापूर हे दोन परगणे असोन तेथें दादाजी कोंडदेव म्हणोन शहाणे चौकस ठेविले होते. ते महाराजांचे भेटीस येऊन परगणेचा हिशेब रुजू करून निरोप घेतेसमयीं समागमें शिवाजी राजे व सौभाग्यवती जिजाऊ साहेब यांजबराबर संक्राजी निळकंठ पेशवे व बाळकृष्णपंत हे नारोपंत दीक्षित यांचे चुलते व बाबूराव मुजुमदार व सोनोपंत डबीर व रघुनाथपंत वोकील सबनीस असे देऊन रवाना केले" (चित्रगुप्त पृ. ९)

चिटणिसी चरित्रांतील पुढील उतारा आपणांस तेंच सांगत आहे:—

" धर्म वृद्धिंगत करण्यासाठीं प्राणदौलत गेली तरी जावो परंतु प्रयत्न करावाच करावा हेंच मनःपूर्वक येतें जाले तें समयीं पहिली दौलतींतील माणसें संक्राजी ( शामराज पाहिजे ) नीळकंठ व बाळकृष्णपंत मुजुमदार व सोनोपत व रघुनाथ बल्लाळ कोरडे शिवाय सरदार वगैरे ममतेंत मसलतींत येतील ते ते तसे प्रकारे घेऊन आणखी चांगले मर्द शिपाई नांवाचा माणूस पाहून त्यास जवळ ठेवावे कारकून चांगला कर्ता लिहिणार पाहून ठेवावा असें करूं लागले तशींच राजकारणें करावीं मातवर चहूं जा।ांचे मराठे यांसि आतपणा करावा. [ साने आवृत्ति पृ. ६२ ]......शके १५६२ यांत मसलतीचा आरंभ करिते झाले तों वय तेरा वर्षांचें झाले ( कीर्तने प्रत पृ. ३०. साने प्रत १५६३ व पंधरा सोळा वय देते तें उघड उघड चूक असून कोणी मागाहून अज्ञानानें जुळविलें असावें ) "

शिवदिग्विजयकारानें " अकरा बारा वर्षांचें वय होतां कारभार विचार बारीक मोठा पाहूं लागले. "( पृ. ७२ ) असे सांगून " किल्लेकोट प्रथम घ्यावे मग प्रांत घ्यावा " ( पृ. ११५ किता ) असा पोख्त विचार ठरवून " राजगडचें राजकारण करून आपण खासा जातीनें सरंजाम मावळे लोक घेऊन जाऊन किल्ला सर केला, " ( पृ. ११५ ) मग तेथें " तमाम मावळे व कोंकणे लोकांची राजकारणें येऊं लागली, " ( पृ. ११६ ) सिंहगड, तोरणा वगैरे राजकारणें आलीं, " इत्यादि कृति शके १५६२ विक्रम नामसंवत्सरीं जाली " ( पृ. ११९ ). हा शेवटचा उल्लेख जरा तुटक रीतीनें आलेला आहे. परंतु गचाळ रीतीनें छापलेल्या तथापि अत्यंत महत्वाच्या अशा या दिग्विजयांतील प्रकरणांचा संदर्भ नीट पाहतां हा उल्लेख शिवाजी महाराजांच्या नांवाने सुरू झालेल्या स्वराज्याच्या प्रस्तावनेपैकींच एक भाग होय यांत शंका नाहीं.

हे वर दिलेले सात उतारे किंवा प्रमाणें नीट मननपूर्वक वाचिलीं असतां त्यांवरून शके १५६२ व शिवाजी महाराजांचे वय बारा, असा योग असतां स्वराज्यस्थापनेचा उद्योग प्रसिद्धपणें आरंभिला गेला असें स्पष्ट होतें. पण यावरून म्हणजे १५६२ त एकदम या थोर मसलतीचा प्रारंभ झाला असें मानणें भ्रामक होईल. अशा थोर मसलती बराच काळ चांगल्या शिजाव्या लागतात आणि त्यांचा प्रारंभहि "चंचुप्रवेशात् मुसलप्रवेशः" अशा न्यायानेंच व्हावा लागतो. मुसलमानी सत्तेला जें शिवशाहीचें खग्रास ग्रहण महाराष्ट्रांत लागलें त्याचा उघड प्रारंभ जरी शके १५६२ त लोकविश्रुत झाला असला तरी त्याचा वेध बराच आधीं म्हणजे शहाजीनें पेमगिरीस निजामशाहावरी छत्र धरिलें तेव्हांपासूनच लागला असें समजण्यास चिंता नाहीं. या ग्रहणापैकीं शिवपर्वाच्या प्रारंभाचा शके १५६१ मधील १५६२ पूर्वीचा एक निश्चित पुरावा या लेखाचे प्रारंभींच दर्शविला आहे. कदाचित् त्याहि पूर्वी एखाद दुसरे वर्ष पावेतों ही

सीमा मार्गे ओढली जाण्याचा संभव आहे. बहुशः दादाजी कोंडदेव दक्षिणेंत शहाजीचे भेटीस गेल्यावेळीं हा मनसबा शिजत टाकला गेला असावा. शिवाजी महाराजांचें लग्न परभारा पुण्यास उरकून दादाजी शहाजीचे भेटीस शके १५५९ त गेला असावा. या लग्नाचा उल्लेख करून चिटणीस लिहितोः— "दादाजी कोंडदेव पुणें येथील सुभेदार मोजबा देण्यास आले होते. त्याजबरा-बर जिजाबाईसाहेब व राजे देऊन रवाना केलें शके १५५९ बरावर कारभारी शिवनेरींत होते ते दिले". (वि. वि. प्रत पृ. २८) हे कारभारी कोण कोण त्यांचा उल्लेख वर आलेलाच आहे. या कारभाऱ्यांच्या नांवांची चिकित्सा येथें अप्रस्तुत आहे. परंतु एवढें निश्चित आहे कीं १५६२ त शाहाजीनें शिवाजीस 'तक्त बांधून' दिलें त्यापूर्वी दोनतीन वर्षें या प्रकरणीं उठावणी झाली असावी.

येथें शहाजीच्या हालचालींचा थोडा विचार अवश्य होईल. शहाजीचा पेम-गिरचा बनाव मोडल्यावर तो शके १५५८ त अदिलशाही मनसबदार बनला. आणि लागलीच त्याच्या कर्नाटकांतील हालचाली जोरानें सुरू झाल्या. राय-गिरीच्या वीरभद्राला बुडवून रणदुल्ला व शहाजी १५६० च्या प्रारंभीं विजा-पुरास आले. (रा. रा. मा. वि. चंपू पृ. ८१) हीच वेळ दादाजीपंताच्या व शहाजीच्या भेटीची असावी. आणि हिचाच उल्लेख चिटणिसानें केलेला वर दिला आहे. शके १५६१ प्रमाथी संवत्सरीं शहाजीनें बसवापट्टण सर केलें. (जेधे व रा० चंपू पृ. ८१) रा. राजवाडे यांचे मतें "ह्या वर्षी [ १५६१ ] मोहीम करून विश्रांतीस विजयापुरास परत आल्यावर कनकगिरीच्या सनदा महमदशहानें खुष होऊन शहाजीस बहाल केल्या" [ रा. मा. वि. चं. पृ. ८१ ]. यावरून शके १५५९--६० त एकदा आणि पुनः १५६१--६२ त अशा दोनदा शहाजी शिवाजीच्या भेटी या तीन वर्षांत झाल्या असाव्या. शिवा-जीच्या आयुष्यांतील सातव्या वर्षापासून बाराव्या वर्षाच्या वया पावेतोंचा निश्चित इतिहास फारच अल्प उपलब्ध झाला आहे. शिवभारतांत असें वर्णिलें आहे कीं (अध्याय ९-७०-७३) सातव्या वर्षी लिपिग्रहणसंस्कार म्हणजे शिवाजी महाराजांस लेखनवाचनसंस्कार करविल्यावर त्या तैलबुद्धि पुरुषानें अतित्वरेनें विद्यत गति करून आपल्या गुरूंना विस्मित केलें. शके १५५१ त मुलाचा जन्म झाल्यापासून १५५८ त विजापुराची ताबेदारी पतकरीपावेतों शहाजीराजे यांचीं सहासात वर्षें फार धामधुमींत गेलीं. सातवर्षांत पुत्राची भेट, निदान निवांतपणें अशी, झालीच नाहीं. "तेव्हां" चिटणीस लिहितो, "जिजाबाईसाहेब व पुत्र यांचे भेटीस फार दिवस झाले. पुत्राचें वय सात वर्षांचें झालें. त्यांस अवलोकन करावें कशी इच्छा शहाजी महाराजांस झाली. सात वर्षांचे वयांत विद्याभ्यास केला." ही एक भेट पितापुत्रांची झाली असावी, कारण १५५९ त शिवाजीला सातवें वर्ष चालू होतें. बहुशः याच

भेटींत पुणेप्रांतीचें राजकारण उभें राहिलें असावें. पुणेप्रांत पूर्वी निजामशाही पासून शहाजी राजे यांस जाहागीर चालत आला होता. तो मुलूख अलीकडे वैराण पडला होता त्याची लावणीसंचणी दादाजी कोंडदऊ यांनी मोठ्या उमेदीनें व कर्तबगारीनें केली होती आणि मुलुखास आबादी झाली होती. इकडे शहाजी-राजे 'इदलशाही चाकर' झाल्यापासून "एदिलशाहीतून माहाराजसाहेबास पुणे मोकासा जाहाले ते वख्ती साहेबांस कर्यातीं मावळ व राजश्री संभाजीराजे भोसले यांसि सांडस खुर्द माहाराजसाहेबीं आपणापासून मोकासा दिल्हा **साहेबांचे तर्फेनें कर्यातीं मावळांस हवालदार व कारकून आलाहिदे** गेले" (म. इ. साधने ले. ८ खंड २०) अशी व्यवस्था सुरू झाली. येथें महाराज-साहेब म्हणजे शहाजीराजे व साहेब म्हणजे शिवाजीराजे समजावे. यास्तव बहुशः शके १५५८।५९ पासूनच म्हणजे दादाजी कोंडदेऊ मांजण्याचे अथवा हिशे-बाचे कामीं शहाजीचे भेटीस दक्षिणेत गेल्यापासूनच महाराज शहाजीराजे यांचे मोकास अमलांतच साहेब शिवाजीराजे यांचा **पोटअंमल अलाहिदा ऊर्फ स्वतंत्र** कामगार नेमून सुरू झाला. ले. ४३७ खंड १५ तील शके १५६१ च्या माथ्यावर जी शिवमुद्रा झळकत आहे व जिच्या उत्पत्तिविषयीं व अभि प्रायाविषयीं आपण प्रस्तुत सकूतूहल विचारणा करीत आहोंत ती मुद्रा म्हटली म्हणजे राजोखुषीनें अथवा राजकारणानें उभ्या केलेल्या वरील सवस्या सुभ्याची पताका आहे. याप्रमाणें मागें रेटीत रेटीत आपण शिवसंस्थापित स्वराज्यो-दयाच्या अगदीं प्रारभबिंदूपाशीं पोंचलों म्हणावयास चिंता नाहीं.

येथे एक मोठा मनोरंजक प्रश्न या प्रसंगाची सखोलपणें चाळणा केली असतां मनांत येतो. आणि तसा तो मनांत भरल्यावरून त्याची मननीय चर्चा कै. प्रो. लिमये यांनी 'इंडियन रिव्ह्यू' मासिकात केलेली फेब्रुवारी १९१९ इ. च्या फर्गसन कॉ. क्वार्टर्लीमध्यें उतरून घेतलेली आहे. तो प्रश्न असा कीं या मुद्रेचा यथार्थ अभिप्राय काय आहे ? आणि त्यावरून महाराष्ट्र--स्वराज्य-स्थापनाविषयक कोणतीं अनुमानें सूचित होतात ? मुद्रेचा आशय या लेखाचे प्रारंभींच दिला आहे किंबहुना त्याचा ठाव काढण्यासाठीच तर विवेचनाची एवढी उठाठेव करावी लागली. अखिल--महाराष्ट्र- मुद्रासमप्रांत या शिवराजमुद्रेच्या तोडीची एकहि मुद्रा नाहीं इतकी **ही मुद्रा एकमेवाद्वितीय** आहे. तिचा आशय बहुतच भव्य व दिव्य आहे. आणि तिची व्यंजना तर केवळ अलौकिक आहे. 'विश्ववंदिता' हें पद फारच मननीय आहे आणि हें पद स्वातंत्र्य व सत्ता यांचें निःसंशय दर्शक आहे असें प्रो. लिमये यांनीं दिलेलें मतहि विचारणीय आहे. ("This expresses the idea of Sovereignty, of independent political existence as clearly as words can express it". फित्ता पृ. १६१) स्वराज्यसत्तेच्या चंद्राच्या प्रतिपदेची किंबा प्रारंभाची

केवळ सूक्ष्मदर्शांवांचून इतरांस सहज न दिसणारी, पण कलेकलेनें दिवसेंदिवस चढत जाणारी बारीक कोर उगवली असून ती वाढत वाढत जाऊन पौर्णिमेच्या चंद्रमंडलाप्रमाणें परिपूर्ण होतसाती सर्वत्र शांतता आणि सुख यांचें साम्राज्य पसरवून, सकल विश्वाला संतुष्ट करून, सर्वांच्या आदराला पात्र होईल आणि सर्वांचें मंगल करील, एवढा विलक्षण, रम्य, गंभीर व पवित्र आशय या मुद्रेंत भरलेला आहे. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे शिवाजी महाराजांच्या थोर मनाची ही मुद्रा म्हणजे शुद्ध आणि सत्य प्रतिमा आहे ! मुद्रा असावी तर अशी असावी ! शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या महाराष्ट्र राज्याचा ही मुद्रा म्हणजे सारभूत इतिहास आणि त्या विभूतीच्या चरित्राचें केवळ रहस्य आहे.

अशी हि अलौकिक मुद्रा शिवाजी महाराजानीं स्वतःच कल्पिली असेल काय ? शंकेचें कारण असें कीं ही मुद्रा वर सिद्ध केल्याप्रमाणें महाराज केवळ बारवयी असतां म्हणजे महाराजांचें **वय दहाबारा वर्षांचें** असतां त्यांच्या नांवानें झळकूं लागली आहे. आपण असेंहि पाहिलें कीं महाराजांचे वडील शहाजी महाराज यांच्या खास मोकास अमलांत पुत्र शिवाजी राजे यांचे नांवें शहाजी महाराज यांनी आपण **स्वतः पोट मोकासा** पाडून त्यांस स्वतंत्र अधिकारीमडळ नेमून दिलें.

शिवाजी राजे यांची बुद्धि फार तीक्ष्ण होती, त्यांचें साहस, शौर्य इत्यादि गुण लहानपणापासून प्रत्ययाला येऊं लागले होते याविषयीं संशय नाहीं. परंतु त्यांचें कोवळें वय पाहतां जरी त्यांची उडी मोठी होती आणि बुद्धि विशाल होती तथापि **विचार** तेवढा **परिपक्क** झाला होता असें म्हणतां येत नाहीं. तें सृष्टि-धर्माला जरा विरुद्ध पडते. आपल्या उदरात मोठा गूढ व गंभीर अभिप्राय धारण करणारी मुद्रा स्वयबुद्धीनें निर्माण करण्याइतकी शिवाजी महाराजांची तीव्र बुद्धि प्रौढ झाली असेल असे मानणें युक्तींत येत नाहीं. आणि इतिहासाचीहि साक्ष याच बाजूला झुकत आहे. **स्वतंत्र पोटमोकासा मिळाला तेव्हांच स्वतंत्र मुद्राहि करून मिळाली असली पाहिजे**. आणि हा व्यवहार जरी शिवाजी महाराजांचे कानांवरून गेलेला असला पाहिजे तरी ही घटना घडविणारे शहाजी-दादाजीप्रभृति पिकलेले मुत्सद्दीच असले पाहिजेत. त्यांच्यासारख्या परिणत-प्रज्ञांचेंच तें काम असणार. शिवाजीच्या अंगचें तेज पाहून शहाजी—जिजाऊ—दादाजी--प्रभृति चतुर वृद्धांना सत्तास्थापनेचा डाव पुनः खेळून पाहण्याला आशा वाटली असण्याचा संभव आहे. सहजच आहे कीं साहस करून पाहण्या-सारखा पोराचा डौल दिसत होता तेव्हां तशी उभारणी सावधगिरीनें केली गेली असली पाहिजे. राजकारण नेहमीं ‘ दुलग ’ ठेवावें लागतें. तेव्हां राज-कारणांत असे पर्णाळीप्रमाणें ‘ पाहोन ’ च पाऊल ‘ उचालेलें ’ पाहिजे;

तरच यशःप्राप्तीचा संभव असतो. तदभावीं दीपपतंगन्यायाचा अनुभव हटकून येतो. असो.

शिवाजीला शहाजीनें पोटराज्य करून दिलें तें गुण पाहून दिलें असलें पाहिजे असें वर सुचविलं आहे ,त्याला शिवदिग्विजयकाराचा आधार आहे, तो येथे देतोः—

" शिवाजी महाराज पुणें प्रांतीं राहून दादाजीपंतांनीं विद्याभ्यास करविला मल्लयुद्ध, शस्त्रयुद्ध करावयाच्या गती शिकविल्या, राजे गुणज्ञ एक वेळ सांगितलें म्हणजे पाठ व्हावें ( शिवभारतकार असेंच राजे यांच्या बुद्धीचें वर्णन करितो ) असें बुद्धीचें तैक्ष्ण्य अकरावारा वर्षांचे वय होता कारभार विचार बारीक मोठा पाहूं लागले.न विचारिता केला तरी दादाजीपंताशीं बोलावें ' आम्हीं मूल जालों म्हणून कळवूं नये हें काय ? तुम्ही वडील आम्हांस सांगोन करावें. त्यात न्यूनाधिक्य आमचे बुद्धीनें विचार सुचला तरी सांगूं ग्रहण करावयाजोगा असला तरी तसें करावें. त्यास आमचे युक्तीस येईल ते प्राधान्य. आम्हास शहाणे करावयास वडिलांनीं सांगितलें तुम्ही व्यवस्था लाविली तरी आम्ही कोणत्या रीतीनीं बुद्धिवंत व्हावें ? ' हें ऐकून दादाजीपंतीं कोणताहि विचार जाबसाल लहानमोठा विचारल्याशिवाय करावयाचा सोडून दिला. कचेरींत जे करणें तें करावें. न्याय पंचाईत निवाडे मोठे कडोविकडीचे आले तरी बुद्धिकुशलत्वे दोष काढून वादीवादी त्याचे मुखें खोटाखरा त्याचें त्यानी म्हणावे अशा रीतीनें पंचाईती कराव्या " ( शि. दि. पृ. ७२-७३ )

या लिहिण्याप्रमाणें शिवाजी महाराज लहानपणींच राजकारणात लक्ष्य घालूं लागले होते. लहान मोठेपणाच्या वयाच्या मर्यादा साप्रत लोक मानतात त्याहून मराठी अंमलात निराळ्याच काहीं रूढ होत्या. त्या वेळीं आपापल्या व्यवसायात मुलें सातव्या आठव्या वर्षापासून पडूं लागत. जरी आमचे देशीराजे सोडल तरी बाबर, अकबर प्रभृती चकताई शहांचें किंवा चौदावा लुई अगर बारावा चार्लस या सारख्या युरोपीयनाचे इतिहास वाचले असतां हीच रीति तेथें आढळेल. त्या वेळीं मुलामुलींचे विवाहहि अल्पवयांतच होऊन तीं लवकरच परंपरा चालवूं लागत हें शेंकडों प्रमाणें देऊन सिद्ध करितां येईल.अलीकडील कित्येक लेखकाना हें न कळल्याकारणानें कांहीं अद्वातद्वा शंका त्यांनीं काढिलेल्या दिसून आल्या आहेत. असो. शिवाजीहि त्याच क्रमांत वाढला. अकरावे -बारावे वर्षींच त्यानें लग्न दादापंतांचें विद्यमानें पुण्यांत शहाजीच्या अप्रत्यक्षतेत उरकून घेण्यांत आले. तो प्रसंग वर्णितांना दिग्विजयकारानें लिहिले आहे कीं " महाराज प्रौढ जाले हित अनहित समजों लागले राजकारण करून आक्रमणशक्ति विशेष धरिते जाले जाणोन दादोपंतास राजांनीं पुण्यासच समारंभ करून महाराजाचे

विचारें कार्यसिद्धि करावी म्हणोन आज्ञा पाठविल्यावरून......लग्न केले शके १५६२ विक्रम संवत्सरी वैशाख मास शुद्ध पचमीस यथाविधि पाणि ग्रहण" झाले (पृ. ९८--९९). यावरून अकरा बारावे वर्षी हल्लींपेक्षा मुलांस बरेंच प्रौढत्व आलें असें मानून जुन्या अमदानींत सोळावें वर्षी 'पुत्रे मित्र-वदाचरेत्' हा न्याय लागू होई. वयानें प्रौढपणा असा जरी त्या काळीं लवकर येत होता असे मानावें लागते व अर्थातच बुद्धीहि सांप्रत कालाचे तुलनेनें अधिक लवकर परिपक्क होत असे असें मानणें युक्त होईल तरी देखील शिवाजी महाराजाच्या मुद्रप्रमाणें गूढगंभीर मुद्रा कल्पिण्याइतपत दूरदर्शित्वाचें प्रौढपण बुद्धीला येत असेल असे मानणें चुकीचें होईल.

या पुण्यांतील पहिल्या लग्नानंतर "उभयता वधुवरें पहावीं" म्हणोन त्यांस शहाजी राजे यांनी विजापुरीं आणविलीं. ते वर्तमान पातशापावेतो पोचून त्यानी "तें लग्न काय खेळ जाला दुसरे लग्न येथे करावयाचें (शि. दि. पृ. १११) असा प्रेमाचा हट्ट गाजवून विजापुरास तो समारंभ उरकला असावा. परंतु शिवाजी महाराजांचा एकंदर यवनविरोधाचा प्रकार पाहून हें प्रकरण फारच बिघरेल या भयानें शहाजी राजे यांनी "पुनः (यावरून दोन भेटींचा तर्क बळावतो) पुण्यास रवानगी करुन दिली" (शि. दि. पृ. ११३) हाच अर्थात् १५६२ तली स्वतंत्र सत्ताक्रमणाचा प्रारंभ. तदनंतर मग "तमाम मावळे व कोकणें लोकांची राजकारणें" (किता पृ. ११६).

शके १५५८ ते १५६२ या काळात सावकाशीनें व सावधागिरीने जें राज-कारणाचे थर महाराष्ट्रीयांकडून चढविण्यात येत होते त्याला उत्तरेकडील मोंगलाच्या दक्षिणेत होणाऱ्या फैलाव्यानें मजबूतीच आली असण्याचा संभव आहे. 'स्वराज्याच्या उदयकालच्या चतुःसीमा' या आपल्या विचारपरिलुप्त आणि अत्यंत मननीय लेखांत रा. द. वि. आपटे यांनी -(भा. इ. सं. मं. त्रै. १८४५) 'शिवाजीच्या उलाढालीस मोगलांची अंतस्थ फूस होती कीं काय असा संशय येतो (किता पृ. ९१)"— तो संभव सुचवून ठेविला आहे. निजामशाही कोलमडून पडलेली आणि मोंगलशाहीचा जोर प्रत्यहीं वाढत चाललेला अशा पेंचांत अदिलशाही सांपड-लेली पाहून पुणेप्रांतीं 'स्वराज्य' अंमलांत शहाजीशिवाजी यांचा जो दुरंग—दुरंगी राजकारणाचा डाव चालू होता त्यांतील अगदीं आंतील पापुद्रा शिव-मुद्रेच्या साहाय्यानें या लेखांत पाहण्याचा प्रयत्न केला आहे. केवळ एक मुद्रेच्या डौलावरून राजकारणाच्या भरीव बनावाचें निश्चित अनुमान बांधणें धोक्याचें आहे. प्रो. लिमये यांनी हा धोका जाणला होता परंतु कागदपत्रांच्या मेळानें मुद्रेची तपासणी त्यांनी केली नाहीं म्हणून त्यांस कल्पनेवरच भर द्यावी लागली. परंतु हा धोका कमी करावा यास्तव कागदपत्रें व बखरी यांचे साहाय्यानें

मुद्रेतील आशयाची सूक्ष्म तपासणी करण्याची खटपट येथें केली आहे. बखरींपत्रें व मुद्रा यांची परीक्षा एकमेळानें करण्याचा हा प्रयत्न आहे. उत्तरोत्तर जसजसा आपला ऐतिहासिक प्रमाणसंग्रह वाढत जाईल तसतसा हा तमसावृत परंतु अतिरमणीय इतिहास स्पष्टतर होत जाईल; आणि जसा दादाजी कोंडदेवाचा या मसलतींतील कार्यभाग आज आपणांस अंधुक अनुमानितां येतो तसा या मसलतींत प्रारंभापासून असण्याचा संभव असलेली धोरणी जिजाबाई व तिचे कारभारी, यांचा हि उद्योग आपणांस कळोन येईल. शके १५७३ त जिजाऊआईसाहेब यांनी " चिरंजीव राजश्री सिऊबाचा " इनाम-अनामतीचा हूकूम फिरविल्याचें आपणांस तिच्या अस्सल आज्ञापत्रावरून जसें ज्ञात झालें आहे (भा. इ. सं. मंडळ शके १८४२ चित्राव-वेन्हवडे इनामासंबंधीं श्री. मुजुमदार यांचें टिपण) तसे आणखी हि पुरावे, नजाणों लवकरच प्रगट होतील. आणि मग आज चांचरत चांचरत करावीं लागणारीं अनुमानें निश्चयानें सिद्धांतवत् ग्राह्य होतील.

या भेटीच्या मुक्कामांतच इदीच्या दिवशीं सुद्धा हजरत पातशहांस 'चिमण्या' शिवाजीनें मुजरा केला नाहीं इत्यादि वर्तमान घडलें. " या प्रकारें दोन तीन वर्षें होत आलीं. नंतर आठनऊ वर्षांचें वय जालें "(शि. प्र.पृ. ६२) असें म्हटलें आहे. परंतु यापेक्षां पुढील पृ. ६९ वरील विधानच कमी सैल अतएव अधिक ग्राह्य ठरणारें आहे; तें असेंः–" या प्रकारें वर्ष दीडवर्ष चाललें असतां " दांडग्या कसायाचा शिरच्छेद शिवाजीनें भर शहरांत केला, त्याची स्त्री फिर्याद गेली. पातशहानें शिवाजीस नवाजून स्त्रीस " चार रुपये (पतीच्या शवाच्या) दफणाईस देऊन चोऱ्यावरी शेर रांडरोटी करून दिल्ही ती हा वेळ-पर्यंत चालत आहे. " इ. (पृ. ६९) पुढें शिवाजीविषयीं आईबाप फार उद्विग्न-चित्त झाले आणि तुम्ही मला " दोन पावलें दूर ठेवावें तेथें माझें दैव व मी इच्छेस येईल तसें करीन " हा शिवाजीचा आग्रह त्यांनी अखेर पुरविला तो प्रतापकाराचे मतें असाः—" या प्रमाणें चार सहा महिने काढिले नंतर सुमुहूर्त पाहून जिजाबाईसाहेब व शिवाजी महाराज व अनाजी दत्तो कारभारी यांची रवानगी जुन्नर तालुके पुणें वगैरे महाली केली तेथें जाऊन नेमणुकीप्रमाणें उभयतांचा खर्च पार पाडून बाकी ऐवज राहील तो विजापुरास शहाजी राजे यांजकडे पाठवीत असावा याप्रमाणें वर्ष दोन वर्षें वहिवाटली " (पृ. ७५) "नंतर" लवकरच " महाराजांनीं चाकणचे ठाणें बसवून रुद्रमाळ किल्ल्याचे बेरड फितावून राजगड, पुरंदर किल्ले घेऊन पुण्यांत नवी शिबंदी ठेवून सिंहगड घेतला हें वर्तमान विजापुरास जाहीर जालें " (पृ. ७६) इत्यादि हकीकत शिवप्रताप ग्रंथांत आली आहे. ही बखरहि टाकाऊ समजण्याचा संशोधकांचा

शिरस्ता पडलेला आहे. परंतु बृहदीश्वर शिलालेखाप्रमाणें व दिग्विजयाप्रमाणच हिच्यासंबंधींहि संशोधकांनीं पुनः तपासणी केली पाहिजे. शिवाजी महाराजांची बाल्यदशा यांत :विस्तारानें वर्णिल्याचा या बखरीचा विशेष प्रकाशकानेंहि नमूद करून ठेवला आहे. सातव्या वर्षी शहाजी शिवाजी भेट आणि सुमारें दीड दोन वर्षांनीं पुणें प्रांतीं योजना हीं यांतील ठोकळ मांडणी वर दिलेलीच आहे आणि ती या निबंधाच्या माहितीला बरीच पुष्टि देणारी आहे. मात्र पितापुत्रांचा विचारविरोध हीतहि विस्तारानें वर्णिला आहे तो बखरकाराचे कल्पनेचा विषय असल्यानें तो तसा आल्याचें नवल नाहीं अथवा त्याने आपण अडण्याचेंहि प्रयोजन नाहीं.

शिवाजीमहाराज एक अलौकिक विभूति होते यांत संशय नाहीं; तथापि त्यांनाहि पायावाचून आपलें मंदिर उभारतां आलें नसतें हें ध्यानांत वागविलें पाहिजे. उत्तरेंत शहाजहान तर दक्षिणेंत शहाजी हें ( राधामाधवविलासचंपू) कविवचन केवळ कल्पना किंवा स्वामिस्तवन न मानतां शहाजीची तोलदारीच यथार्थतेनें दर्शविते असेंच मानलें पाहिजे आणि मग शिवाजीमहाराजांनीं आपणांस ' शाहसूनु, ' म्हणून गौरविण्याचें सकारणत्वहि ओघानेंच युक्त ठरतें.

वरील गोष्ट न विसरतां जर शिवचरित्राचें मनन केलें तर आपलीं विधानें निर्दोष निपजतील. तसें न करिता जर आपण शिवाजी महाराजांनी अकरावे-बारावें वर्षींच स्वराज्यस्थापनेचा उद्योग केवळ **स्वबुद्धीनें** प्रारंभिला असें समजूं तर तो इतिहास न होतां ती अद्भुत कथा होईल. शिवाजीच्या नांवाची केलेली मुद्रा केवळ शहाजीचा हक्क वहिवाटणारा मुलगा म्हणूनच केली असती तर प्रतिपच्चंद्राच्या वर्धमान वैभवाचें स्मरण करून देणारी ती तसली मुद्रा करणें साध्यासीध्या मराठी स्वभावास, परंपरेस, व्यवहारास व शिवाजीच्या पोरपेशास जुळतें ना ! ती मुद्रा शिवाजीच्या नांवें करून देणाऱ्यांच्या मनांत नुसत्या पोटमोकासदारीचीक्षुद्र कल्पना वावरत नसून रामराज्यसदृश भव्य अशा भावी स्वराज्याचें सुखस्वप्नच निःसंशय नांदत असलें पाहिजे. उलट पक्षीं, वडिलांच्या विषयीं तिरस्कार मनांत वागवून स्वतःच निराळा, स्वतंत्र असा रस्ता आपण चालूं लागून शहाजी प्रभृतींना सर्वथा वावडा वाटणारा स्वराज्याचा उपक्रम आपणच चार संवगडे मिळून शिवाजीनें, समजा शके १५६८ त तोरणा घेऊन, आरंभिला असें समजलें तर मग पूर्वी १५६१ सालीं गळ्यांत बांधलेली आणि पारतंत्र्याच्या कल्पनेंत जन्मलेली मुद्रा अशुभ आणि अपमानकारक समजून शिवाजीनें दूर भिरकावून देऊन, बापाचें नांव देखील नसलेली नवीनच स्वतंत्रशी मुद्रा केली नसती काय ? शके १५६१ तील मुद्राच शिवछत्रपतींनी राज्याभिषेकोत्तरहि चालविली यावरून त्या मुद्रेची परंपरा शिवप्रभूंस अखेरपावेतों अभिमत होती

असेंच अनुमान प्राप्त होतें. अशा दृष्टीनें विचार केला तरी देखील येथवर केलेल्या विवेचनास पुष्टीच मिळत आहे.

येणें प्रमाणें ही शिवप्रभूची परमादरणीय मुद्रा फारच मोठें ऐतिहासिक कूट सोडविण्याला व अद्‌भुतविध्वंसनाला केवढें साहाय्य आज आपणांला करीत आहे! प्रतिपदेच्या चंद्राचा दृष्टांत केवळ अप्रतिम आहे. प्रतिपदेचा चंद्र सामान्य जनांस दिसत नाहीं परंतु ज्या भाग्यवंतांस दिसतो ते स्वतःस धन्य समजतात. अशा प्रसंगावरून सुचलेला शाखाचंद्रन्याय तर सुप्रसिद्ध आहे. प्रतिपच्चंद्र लहान व बहुजनांना अदृश्य असतो परंतु तो 'विश्ववंदित' असतो तसेंच मावळच्या दरीखोऱ्यांत उभारलें जाणारें हें स्वराज्याचें निशाण लवकर न दिसणारें, परंतु अखेर विश्वजनांच्या अभिवादनाला पात्र होणारें आहे. हा विश्वास अंतरांत जागवूनच झाली ती राजकारणी उभारणी करण्यांत आली. आणि तिचा हेतुहि विश्वोपकारीच होता. चंद्रहि कलेकलेनें वाढून सर्व सृष्टी अमृतसिंचनानें हृष्ट व प्रफुल्लित करतो तद्वतच हें स्वराज्य आपलें सर्वतोभद्रत्व सिद्ध करील हा विश्वास सर्वांनीं राखावा असें ही मुद्रा सुचवीत आहे. मराठी सत्ता वावटळीसारखी किंवा वणव्यासारखी उद्भवली किंवा ती एका कोणातरी लोकोत्तर व्यक्तीची एकट्याचीच करणी होय असे भ्रामक समज ही मुद्रा पाहून आतां कोणी बाळगूं नये आणि मराठी सत्तेची शिवकालीन उभारणी ही पायापासून शिखरापावेतों सुरेख व सशास्त्र उभारलेली, न खचणारी, विश्ववंद्य अशी प्रासादरचना आहे असें पक्कें समजावें आणि या सिद्धांतावर पुनरपि हीच मुद्रा ठोकून तो हृदयांत कायम करावा.*

दत्तो वामन पोतदार.

---

* कनकगिरीची लढाई मारल्यावर चंदीचंदावरास राजे शहाजी यांनीं ठाणे बसविलें. "नंतर शिवाजी राजे सात आठ वर्षांचे जाले जन्मापासून भेटी नाहीं संभाजी राजे वारले सबब जिजाबाई साहेबांस बोलावूं पाठाविलें" आणि आपण "विजापुरानजीक गलगल्यास कृष्णातीरीं येऊन मुक्काम केला. शिवाजी महाराज व जिजाबाई साहेब मुद्धां काराजगीस आल्याचें पत्र आलें." पुढें शहाजी गलगल्याहून "बेगम तलावावरी येऊन उतरले." मग सर्वांच्या भेटी झाल्या. (शिवाजी प्रतात पृ. ६१).

श्री.

# ३९ शिव छत्रपति व कवि भूषण.

काशी नागरी–प्रचारणी त्रैमासिक पत्रिका नवीन संस्करण भाग ६ अंक १ यामध्यें पंडित भागिरथ प्रसाद दीक्षित यानीं 'महाकवि भूषण' या शिरो-लेखाखालीं एक निबंध प्रसिद्ध केला आहे. महाशय दीक्षित यांचा हा समग्र लेख वाचला म्हणजे भूषण हा शिवछत्रपति–कालीन नव्हताच अशा पूर्वग्रहबद्ध भावनेनें विकृत होऊन त्यांनीं आपला निबंध सजाविला आहे असें सहज दिसून येतें. त्यामुळें लेख निर्माण करतांना भूषण कवीच्या कृतींकडे ऐतिहासिक दृष्ट्या न पाहतां शिव व भूषण विषम कालीन होते हें सिद्ध करण्याकरतां शिवराज–भूषण काव्यांतील कालदर्शक अन्तर्गत पुराव्याकडे त्यानीं दुर्लक्ष्य केलें आहे. भूषणानें शिवराजभूषण काव्यांत छत्रपति शिवाजी महाराज यांची गांठ कधीं पडली हें सिद्ध करण्यासारखा स्पष्ट दाखला दिला आहे. काव्याचे प्रारंभीं उपोद्‌घात दिला आहे. भोंसले सूर्यवंशी सिसोदे घराण्यांतले आहेत असें सांगून थोडक्यांत मालोजीराजे व शहाजी महाराज यांचें वर्णन केलें आहे. पुढें शिवाजी महा-राजांचे वर्णनास सुरुवात करून त्यांच्या कर्तबगारीचें वर्णनः—

भूषन भनत बाललीला गढ कोट जीते,
साहिके सिवाजी करि त्यहू चक्क चाह कों।
गोलकुंडा बीजापुर जीत्यो लरिका इहिमैं,
ज्वानी आए जीत्यो दिल्ली पति पातशाहा कों॥

( मुंबई प्रत पृष्ठ २. )

अशा शब्दांत केलें आहे. पुढें रायगड वर्णन करून स्वतः आपलें म्हणजे भूषण कवींचें रायगड येथें आगमन कसें झालें तें दिलें आहे.

तहाँ राजधानी करी, जीति सकल तुरकॉन॥
सिवसरजा रुचि दानमें, किनो सुजसुजहाँन॥ २३॥
देसनि देसनि तें गुनी, आवत जाचन ताही॥
तिनमै आयो एक कवि, भूषण कहियतु जाही॥ २४॥
द्विज कनोज कुल कश्यपी, रतनाकरसुत धीर॥
बसत त्रिविक्रमपुर सदा, तरनि तनूजातीर॥ २५॥
सिवचरित्र लखियों भयों कविभूषणके चित्त॥
भाँति भाँति भूषनानिसौं, भूषित करौं कवित्त॥ २६॥
सुकविनहुकी कृपा कछु, समुझि कविनको पंथ॥
भूषन भूषनमय करत, सिवभूषनमय ग्रंथ॥ २७॥

कुत्र सुलंख चित्रकुटपाति, साहससिल समुद्र ॥
कविभूषण पदवी दई, हृदयरामसुत रुद्र ॥ २८ ॥
( मुंबई प्रत पृष्ठ ४ )

या वरील अवतरणावरून, भूषणाचें आगमन केव्हां झालें, येण्यास प्रयोजन काय, त्याचें कुलगोत्र व निवासस्थान कोणतें याची थोडक्यांत माहिती देऊन शिव-चरित्र म्हणजे शिवराजभूषण काव्य हें लिहिण्याचें कारण काय व कविभूषण ही पदवी कोणीं दिली वगैरे गोष्टी स्पष्ट होत आहेत.

वर दिलेले दोहे काशी येथील प्रतींतहि आहेत. कांहीं पाठभेद मात्र आहेत. तहाँ राजधानी करी म्हणजे रायगड राजधानी करून शिवाजी महाराज शके १५९६ मध्यें छत्राधीश झाले. ह्या गोष्टीस संदर्भून भूषणानें वरील विधान केलें आहे. राज्यारोहणप्रसंगीं दानधर्माची रेलचेल चालली होती. देशींदेशींचे गुणीजन याचनेकरतां छत्रपतींकडे म्हणजे रायगडावर येत होते. त्यांमध्यें मी एक भूषणकवि आलों असें भूषण वरील दोह्यांत स्पष्ट म्हणत आहे. तेव्हां असें म्हणतां येतें कीं, भूषण पहिल्यानें शके १५९६ मध्यें राज्यारोहणसमयीं शिवाजी महाराजांकडे आला. म्हणजे शिवाजी व भूषण यांचें समकालीनत्व चांगलें सिद्ध होतें. तेथें म्हणजे राज्यारोहण समयीं कवी रायगडावर गेला असतां 'शिव-राजभूषण काव्य' निर्माण केलें असेंहि तो वरील दोह्यांत म्हणत आहे. तेव्हां महाशय दीक्षित यांनीं आपले लेखांत "अतः भूषण शिवाजीके सम-कालीन कदापि न थे और न उनके आश्रय मे उन्होंने ग्रंथ रचा।" हें जें विधान केलें आहे तें अगदीं चुकीचें आहे. ग्रंथाचे शेवटीं ग्रंथरचनाकालदर्शक दोहा कवीनें दिला आहे.

सम सत्रहसे तीस ( १७३० ) पर, सुचि बदि तेरस भान ॥
भूषन सिवभूषन कियो पढियो सुनो सुजान ॥ १ ॥
( मुंबई प्रत. पृष्ठ ५१ )

हाच दोहा मिश्रबंधूंच्या काशी प्रतींतहि पाठभेदानें दिलेला आहे तो—

सुभ सत्रह सैतीस पर बुध सुदि तेरसि भान ।
भूषन सिव भूषन कियो पढियो सुनौ सुजान ॥ ३८० ॥
( काशीप्रत. पृष्ठ १२५)

यावरून हा दोहा प्रक्षिप्त नसून तो भूषणाच्याच मूळ काव्यांतील आहे हें निर्विवाद होय. मिश्रबंधूंनीं हस्तलिखित व मुद्रित प्रतींवरून आपली शिवराजभूषणाची आवृत्ती काढली आहे असें ते म्हणतात; परंतु त्यांची प्रत बरेच ठिकाणीं शुद्ध पाठ देत नाहीं असें दिलगिरीनें म्हणणें प्राप्त होतें. वर मिश्रबंधूंच्या काशी प्रतींतील काव्यरचनाकालदर्शक जो दोहा दिला आहे त्याचेखालीं मुद्दाम टीप दिली आहे ती अशीः—

संवत् १७३० बुध सुदी १३ को ग्रन्थ समाप्त हुवा पर किस मास में सो नहीं लिखा।

येथें मिश्रजींनीं महिना दिला नाहीं असें म्हटलें आहे. परंतु मिश्रजींनीं पाठाच्या शुद्धाशुद्धतेकडे लक्ष देऊन आपली प्रत तयार केली असती तर महाशय मिश्रजींकडून अशी चूक झाली नसती. मिश्रजींच्या प्रतींतील दोह्यापेक्षां मुंबई प्रतींतील दोह्यांचे पाठ जास्त शुद्ध आहेत. त्यांवरून काव्यरचना शक, तीथ, वार, महिन्यासुद्धां शुद्ध आहे असें निर्विवाद ठरतें. सम म्हणजे विक्रम संवत् सत्रहसै तीस पर म्हणजे १७३० त

| | | |
|---|---|---|
| सुचि | ,, | ज्येष्ठ मास ( पौर्णिमान्त आषाढ ) |
| वदि | ,, | वद्य |
| तेरस | ,, | त्रयोदशी |
| भान | ,, | भानुवासर ( रविवार ) |

म्हणजे विक्रम संवत् १७३० ज्येष्ठ व॥ १३ रविवार या दिवशीं भूषणानें शिवभूषण काव्य पुरें केलें असें मुंबई प्रतींतील पाठाचे दोह्यावरून स्पष्ट ठरतें. मिश्रजींच्या दोह्यांत अपपाठ असल्यामुळें त्यांतून शुद्ध अर्थ कांहींच निघत नाहीं. आतां आपण वर दिलेला मुंबई प्रतींतील स्पष्ट काल पंचांगदृष्ट्या खरा ठरतो कीं नाहीं तें पाहूं. विक्रम संवत् कार्तिकांत सुरू होतो शालीवाहन शक चैत्रांत सुरू होतो. तेव्हां विक्रम संवतावरून शालीवाहन शक काढावयाचा म्हणजे चैत्रापासून कार्तिकापर्यंतच्या विक्रम संवतांतून १३४ व कार्तिक ते चैत्र पावेतोंच्या विक्रम संवतांतून १३५ वजा केले असतां शक निघतो. आपला मास ज्येष्ठ; तेव्हां संवत् १७३० तून १३४ वजा केले पाहिजेत. असें केलें असतां इष्ट शक १५९६ येतो; म्हणजे रचनाकाल शालिवाहन शकाच्या भाषेंत शके १५९६ ज्येष्ठ व॥ १३ रविवार असा होतो. वरील शक कै. खरे यांच्या जंत्रीशीं ताडून पाहतां शके १५९६ च्या ज्येष्ठ व॥ १३ स रविवार येतो. तेव्हां मुंबई प्रतींतील दोहा शुद्ध आहे; काशी प्रतींतील अपपाठानें भरलेला आहे. भूषणकवि हा राज्यारोहणसमयीं शिवछत्रपतीचे सभेंत हजर होता. त्यानें आपलें शिवभूषण काव्य राज्यारोहणानंतर बरोबर १५ पंधरा दिवसांनीं पुरें केलें. म्हणून भूषण कवी व छत्रपति शिवाजी महाराज हे समकालीन होते इतक्या गोष्टी तर स्पष्ट होत आहेत, व शिव व भूषण हे विषम कालीन होते हें महाशय दीक्षित ह्यांचें विधान खोटें ठरतें. महाशय दीक्षित यांचा दुसरा आक्षेप म्हणजे शाहू छत्रपती, बाजीराव व चिमाजी आप्पा पेशवे हे भूषणाचे आश्रयदाते होते सबब भूषन शिवसमकालीन नव्हता असा आहे. या आक्षेपांचें निरसन असें कीं शिवाजी व भूषण हे

निर्विवाद समकालीन असूनहि भूषण कवि हा निजाम--उल--मुलुखासारखा दीर्घायु असला पाहिजे; आणि असें धरलें म्हणजे वरील शंकेचें निरसन होते.

सदाशिव महादेव दिवेकर.

---

# ४० शहाजी-विषयक शकावली.

१५४६ कार्तिक, भातवडीचें युद्ध (जे). शहाजीचा अपमान [ शिवभा. ]

१५४७-४९ शहाजी विजापूरकरांकडे अदिलशाहींत [ पृ. २२६; खं. १५ पृ. ४२८ व खं. २० पृ. ३४५ ].

१५५० शहाजी परत निजामशाहींत [ खं. १५ पृ. ४३६; खं. २० पृ. ३४६ ].

१५५० निजामशाहीतर्फे खानदेशांत दर्याखानावर पहिली स्वारी (डाऊ व्हा. ३ पृ. ११० व मॉ. रि. १९१० सप. पृ. २४८ )

१५५१ श्रावण, लुखजी जाधवरावाचा खून ( जे. )
शहाजी पुण्याकडे येऊन आदिलशाही मुलखांत दंगा करतो; (बु. स.) शिवनेरीस संभाजीच्या लग्नासाठीं जिजाबाईसह जातो. लग्नानंतर पुनः दर्याखानाच्या स्वारीवर ( शिवभा० ).

१५५२ दर्याखानाचा पराभव ( शिवभा. ). आश्वीन-कार्तिकांत शहाजीस मोगलाकडून मनसब मिळाली व जुनर संगमनेर घेण्याची कामगिरी त्याजकडे सोंपविली, (इ. खं. ७ पृ. १५ व १७ ) शहाजी जुनरास आला तेव्हां शिवाजीचें प्रथम दर्शन त्याला झालें ( शिवभा. ).

१५५४ शहाजीनें मोंगलांची बाजू सोडून नाशिक, जुनर, संगमनेर वगैरे घेऊन स्वतंत्रपणें पेमगड येथें निजामशाही उभारली.
( इ. खं. ७ पृ. ३५ );

१५५५-५७ निजामशाही वाचविण्यासाठीं मोंगलांशीं युद्ध.
( इ. खं. ७ पृ. ३६-६० व खं. २० पृ. ३६९ ).

१५५८ माहुलीचा वेढा. शहाजी आदिलशाही नोकर बनतो. ( इ.खं.७) त्याला पुणे परगण्याचा मोकासा आदिलशहाकडून मिळतो.
( खं. २० पृ. ३४८ )

---

# Shivaji and the Portuguese.

By *Prof.* **Jadunath Sarkar**, M. A.

## I.

Shivaji's relations with the Portuguese were determined by the geography of their dominions in India in relation to his own. In the late 17th century, the Portuguese had ceased to be an expanding or imperial power, and were content to defend their own possessions as best they could. These possessions in the Goa region ( as opposed to the northern or Daman district ) were very much smaller than they are now, because a belt along the eastern edge of the Goa district ( such as Bicholim ) was still in the hands of Indian princes and was conquered by the Portuguese only in the 18th century.

Shivaji's expansion in the Konkan southwards to the limit of the Ratnagiri district brought him into collision with the various desais of Savant-vadi region, immediately north of Goa, while his penetration south-west into Bijapuri Kanara, through the territories of Bankapur, Bednur and Sunda, made him touch the eastern frontier of Goa. These desais and Kanara princes had diplomatic relations ( varied by occasional wars ) with the Portuguese long before Shivaji's time as well as after, and the Portuguese were sometimes bribed to give them *secret* help in their defence when invaded by Shivaji.

But Shivaji never openly broke with the Portuguese Government,—as his son did in 1683-84. He maintained peace with them, and when any injury was done by his subjects to those of Portugual, he always redressed the wrong, as soon as it was brought to his notice by the Goa Government. He realised the wisdom of keeping on friendly terms with the Portuguese on his west, while his northern and eastern frontiers were pressed by two such powerful enemies as the Mughal Emperor and Adil Shah A wise diplomatist, the

Chhatrapati did not wish to be crushed between *three* enemies, as the hot-heated Shambhaji was.

Moreover, a hostile Portugal could destroy Shivaji's newly-created navy in its weak infancy, and therefore he scrupulously promised to do justice whenever the Portuguese or the English complained to him of any wrong done by his officers or soldiers to their subjects or trade agents. An appeal to his generosity and royal sense of justice by these European nations never failed of effect.

At the same time, Shivaji was not above trying to annex Portuguese lands if he could hope to do it by a successful *coup* or stratagem without being involved in a long or open war with them,—probably because the Portuguese territory was neither rich nor extensive enough to be worth much exertion and sacrifice for their acquisition.

## II.

Translation of a contract of peace and friendship between the great Shivaji Rajah and the Lord Viceroy of Portuguese India, signed at Goa, 5th December 1667, by the Viceroy. [ Biker, vol. IV. pp. 118-122 ].

" Shivaji having repeatedly written to the Viceroy to be excused for having made a raid into Bardes ( district ) against the desais who have their lands there,...the peace with this Government is ratified in the form and on the conditions following:—

I. " That Shivaji Rajah will immediately restore, in good friendship and without deceit, and without taking any ransom for their redemption, all the captives,—men, women, and children,—whom his men took away from the territory of Bardes in the incursion which they made there on 19th November, 1667, and also the cattle and oxen which are found to have belonged to the vassals of the Portuguese King ".*

---

* In the copy of the treaty which Shivaji stamped with his own seal, he added the following words to the above paragraph:—" As soon as the great viceroy will write to me, I shall in compliance with his letter order the prisoners that are detained to be released without taking a single pice from them, and deliver them to the Rev. Father Gonsalo ".

2 " Lakham Savant and Keshava Nayak, desais, who have sought asylum in our territory, shall be warned not to make war of any sort of hostility against Shivaji Rajah, or his vassals and country, while they [ those Desais ] are within the territories of my lord the King [ of Portugal ]; but if they do the contrary...they will be immediately expelled from the territory,...and if after leaving our territory from their own, these Desais make war from thence against Shivaji Rajah, or his vassals, then, on receiving proper notice, we shall not allow them to return or seek asylum in our territory. And the same arrangement is made about Naroba Savant and Malu Shenvi, if they are found in our [ *i.* e., Portuguese ] territory ...and, in order to avoid all causes of disturbance, the aforesaid Desais, when they are in the territory of the king of Portugal, must reside in the city of Goa and by no means in Bardes nor in Salsette.

3. " The merchandise and oxen which come from Balaghat [ i e, the high country beyond the Sahyadri range ] for the island of Goa and the port and territories of Bardes and salsette,—shall not be seized nor detained; and also those that go from the islands and territories of the king of Portugal to Balaghat or to any other part, if they pay the customary duties, -although there may be war between Shivaji Rajah and the king Adil shah; because the free commerce of merchants always redounds to the public benefit. "

[ The above treaty was sealed by Shivaji on 11th December. The orignal Marathi agreement *written* in modi *by Moro Trimbak Pingle* himself, accepting the above terms on behalf of Shivaji, is still preserved in the Goa archives. ]

## III.

Next year an incident happened which is thus described in a letter from Philip Giffard at Carwar to the President of the English Council at Surat, dated 12th Nov. 1668:—

" The vice-king ( of Goa, Jodo Nunes da Cunha, Conde de S. Vicente, who died at Goa on 6th Nov. 1668 ), a little before his death, searching narrowly through all his towns,

found four or five hundred men of Shivaji's hidden up and down in several places, upon which he sent for Shivaji's ambassador and with his own hand took him two or three cuffs in the ear, and turned him and all the prisoners he had taken, out of Goa. Immediately after which Shivaji raises a great army of 8 or 10 thousand foot and one thousand hors , and gives out that he intends against Goa in person, which hath put the Portuguese in arms, building new and mending all old forts,..." [ Factory Records, Surat, Vol. 105, in India office, London. ]

The same subject is treated in Philip Giffard's letter to the Surat Council, dated 16th Dec. 1668:—

" Shivaji having by small parcels and several (=different) pretences got 4 or 5 hundred men into Goa, hoping by degrees to have double the number, did not question ( = doubt ) but such a number would be able, upon a sudden rising in the night to secure him any one of the passes whereby he might enter his men before the Portuguese could have raised any considerable army to resist him, did not doubt of carrying it; but after his arrival at Vingurla, finding his plot discovered, his men seized and the Portuguese well provided to give him a hot reception, desisted from his design, and went and viewed all his castles thereabouts... " [ *Ibid.* ]

## IV.

We have a Portuguese document, signed at Goa, 10th February 1670, entitled " Disposition and confirmation of the peace and amity between the most Illustrious Governor and Captains-general of the State of ( Portuguese ) India and Shivaji Rajah. ( Biker, Vol. IV, pp. 171–175 ) It runs thus: –

" Whereas there have occured various distrusts and discords in the proceedings of the captains of Shivaji Rajah towards the vassals of His Highness (the Portuguese Sovereign), and he has now signified to us, by his letter and a proper envoy, his desire to perpetuate the peace with this state,—the aforesaid Lords have assented to his petition and do confirm the said amity in the form and on the conditions following:—

1. " That Shivaji Rajah should restore immediately without artifice or deceit the 3,000 pagodas which were taken from

our territory in violent breach of good faith and amity,-namely 2000 from Malopā Chatim ( Cheti ) and 1000 from Santopā Gaunso, residents of this city and vassals of His Highness, within the period of two months "

2. " That the merchandise and oxen which come from Balaghat &c. ( as in paragraph 3 of the treaty of 1667. )

3. " That Shivaji Rajah should restore all the ships which are detained in his ports, without any pretext ... and will not demand from the owners of the aforesaid ships any money under the name of expense or costs that he may have incurred on them; these boats will be delivered in sight of the (Portuguese ) fleet which makes vayoge to the North (i. e the northern or Daman province of Portuguese India ) to their owners or their agents, in whose company may go the owners of the ships of the vassals of Shivaji Rajah for taking delivery of the ships which are detained in the fort of Chaul or further north. "

4. " That Shivaji Rajah must not build any fort or house of stone and lime in the neighbourhood of the territories held by their Lordships ... ... "

" The Lords-Governor bind themselves, in the same way, to observe the following capitulations :—

1. " The said Lords-Governor will order the delivery of all the ships which the fleets of the Portuguese Sovereign have taken and kept in detention, both in this city and also in the forts of the North [ *i. e.* Damon province ], freely without charging any costs. "

2. " That passports which are begged by persons under the jurisdiction of Shivaji Rajah for ( voyaging to ) all the ports, not being enemies of the Portnguese Government, will be issued on payment of the ordinary duties and *lawazimas*, in the same way as the vassals of the Great Mughal pay.".....

5. "Whereas the Siddi of Dandā ( Rajpuri ) is a feudatory of the Portuguese Government, and the Lords-Governor are under obligation to defend and aid him, when succour is necessary, by the arms of the Portuguese Sovereign, ... and as this

obligation cannot be exercised without violation of the new friendship which the aforesaid Lords have made with Shivaji, the enemy of the Siddi,... therefore, in order to avoid all distrust ... the said Lords will interpose their authority ... and compose and adjust ( the quarrel ) between Shivaji Rajah and the Siddi, ( thus ) becoming mediators of a good and firm peace in a manner which will satisfy both,—to which effect Shivaji Rajah has sent order and power to his ambassador here, Vittalā Pandit, ... to adjust the said compromise in the form referred to."

Then follow a memorial presented by Shivaji's envoy to the Portuguese, under 7 heads, and the reply of the Governor to the heads of the memorial.

---

# Historical Records at Goa

:o:

( *Sj.* **Surendra Nath Sen.** M. A. ( Calcutta )

The Portuguese were the first European nation to visit India by an entirely maritime route. Vasco da Gama arrived at Calicut in 1498 He was followed by other naval leaders and diplomatic relation was soon established with the petty rulers of the South. They obtained a permanent foothold in India when Albuquerque took possession of Goa for the second time. But they did not confine their activities to commerce alone Some of the Portuguese adventurers committed piracy in Indian waters, while others found a suitable outlet for their military ardour in the armies of native princes. It is commonly believed that the superiority of European arms and military discipline was for the first time demonstrated in India by the French, when Dupleix repulsed from the ramparts of Madras the numerous hordes of Anwaruddin, Nawab of Arcot But long before the event Pacheco and his hundred comrades had earned an eternal fame for their country and countrymen by their gallant defence of Cochin against an army of 50,000 sent by the Zamorin Portuguese military adventurers were thereafter welcomed by every Deccan prince. They fought for the

Raja of Vijayanagar against his Muslim enemies, they enterned the army of the Raja of Canara, they served the artillery of the celebrated Bahadur Shah of Gujrat and the Portuguese pirates soon extended their sphere of activity to the Bay of Bengal. They played an important part in Indian History for more than a century and their records cannot but throw a flood of light in many obscure corners of that History. It is well known that Sewel based his classical work on the History of Vijayanagar upon two Portuguese chronicles published by Prof David Lopez of Lisbon under the title of *Chronica Dos Reys de Bisnaga* Grant Duff makes many references to the Portuguese records in his immortal History of the Marathas. The India Office deputed Frederick Charles Danvers to study the Portuguese records at Lisbon and Evora and the results of his labours have been embodied in two stout volumes on the Portuguese in India. But much has yet to be done. The old kingdom of Vijayanagar and the now defunct Maratha empire were not the only Indian powers with whom the Portuguese had political and commercial dealings. Their correspondence with the kings of Bijapur, whom they call Idalcão or Idalcão, cannot be safely ignored by a student of the history of that kingdom Nor can a historian of Mysore afford to be indifferent to the numerous letters addressed by successive Viceroys and Secretaries of State to Hyder Ali, Tipu, Ayat Saheb, Raghunath Angria, the Admiral of Hyder's fleet and others What light the Portuguese records, can throw on the history of Bengal, when carefully and critically studied, has been shown by the Rev. Fr. Hosten.

Enough has been said to convince any serious student of the History of India that the Portuguese sources may prove invaluable to him. But it was not my main object to examine the Portuguese records from that point of view. The time at my disposal was very limited, I had to finish my work in five weeks and consequently I had to confine myself to my own subject, *viz*, Maratha History alone. As time did not permit me to examine more than one section of the Goa archives, I confined myself, though reluctantly, to the diplomatic corres-

